# आमच्या इंदूचें शिक्षण



ना. म. पटवर्धन, एम्. ए., एल्. टी.



१९३६



१ रुपया

चिरंजीव

इंदू

व

तिची आई

यांस

त्यांच्या प्रेमछत्राखालीं नांदलेल्या

नानाकडून

सप्रेम व सादर अर्पण.

# आरंभीं

—:०:—

माझें हें छोटेंसें पुस्तक—वाटल्यास चोपडें म्हणा—म्हणजे धड ना शिक्षणशास्त्र, ना अध्ययनकला; धड ना काल्पनिक गोष्ट ना वास्तविक चरित्र. असें कांहीं तरी विचित्र झालें आहे झालें. करायला गेलों समन्वय, पण झाली मात्र खिचडी!

आणि ही जाणीव असूनहि तें प्रसिद्ध करण्याचा मोह आवरत नाहीं. गेलीं दोनतीन वर्षें मी हस्तलिखित मधून मधून स्वतः वाचून पाहीं, व इतर आप्तेष्टांना वाचून दाखवीं. मधून मधून अधलीं मधलीं दोनतीन प्रकरणें निरनिराळ्या नियतकालिकांतून लोकमत अजमावून पाहण्याच्या इराद्यानें मासला म्हणून छापविलीं; व स्वतःलाच नव्हे तर इतरांनाहि तीं थोडींफार आवडलीं असें दिसून आल्यावर सर्वच मजकूर पुस्तकरूपानें प्रसिद्ध करण्याचें धाडस केलें. पण अजूनहि एकदां वाटतें कीं तें धाडसच आहे. कसेंहि असो.

प्रस्तुत पुस्तकाच्या कल्पनेचें बीजारोपण प्रसिद्ध तत्त्वज्ञ विल् ड्यूरंट व बरट्रँड रसेल यांच्या ग्रंथांतील कल्पनांकडून झालें असून आद्यजनक या नात्यानें त्यांना शतशः प्रणाम असोत. पुस्तकाची पुढची वाढ मात्र त्याची स्वतःचीच आहे. आणि हें सृष्टिनियमाला धरूनच झालें असें नव्हे का? अपत्याला लाधलेलें सुरूप त्याच्या आद्य जनकांचें आहे, कुरूप अर्थातच त्याचें स्वतःचें आहे, हें लक्षांत ठेवणें बरें.

शास्त्र आणि कला यांची संतति नीट निघाली तर ठीक, नाहीं तर भलतेंच होतें. 'बौद्धिक राक्षस' बर्नार्ड शॉ यांचेपासून स्वतःस संतानप्राप्ति झाल्यास तें संतान आपल्या पित्याप्रमाणें अत्यंत बुद्धिमान व मातेप्रमाणें नितान्तसुंदर होईल असें एका सौंदर्यसुंदरीला वाटलें असें म्हणतात; व त्याप्रमाणें तिनें शॉशीं बोलणेंहि केलें! पण शॉ कसला विक्षिप्त! त्यानें तिला म्हटलें, "तुम्ही म्हणतां तसें झाल्यास ठीकच. पण समजा आपल्या संतानांत माझी रूपसंपदा आणि तुमची बुद्धिमत्ता उतरली तर काय करायचें!"

या ऐकीव गोष्टीचा प्रस्तुताशीं कितपत संबंध आहे कोणास ठाऊक! पण गोष्ट सुचलीच आहे त्या अर्थी कांहीं तरी संबंध असलाच पाहिजे.

सदरहु पुस्तकांत कोणकोणते शैक्षणिक प्रश्न आले आहेत याची एक जंत्री

अनुक्रमणिकेच्या रूपानें दिली आहे. त्यांपैकीं पुष्कळांचा उल्लेख निव्वळ नांवाचाच असून त्यापेक्षां जास्त कांहीं बोध होत नाहीं याची जाणीव लेखकाला पूर्णपणें आहे. पण हे शैक्षणिक प्रश्न तरी काय आहेत, ते समजावून घेतले पाहिजेत अशी शिक्षकांना व आईबापांना जिज्ञासा झाली आणि प्रत्यक्ष शिक्षणशास्त्रांत डोकावण्याच्या इच्छेनें ते त्याच्या उंबरठ्यापर्यंत गेले म्हणजे या पुस्तकाचें अवतारकार्य संपलें असें होईल.

या पुस्तकाचें नक्की स्वरूप कोणतें याचा मुळांतच गोंधळ असल्यामुळें त्यांत मजकूर, लिहिण्याची पद्धति, काल्पनिकता, वास्तविकता, स्थल-कालसंगति वगैरेसंबंधीं किती तरी दोष राहून गेले आहेत; आणि झालेले दोष पुरेसे नाहींत म्हणूनच कीं काय छापण्यांत काहीं चुका राहून गेल्या आहेत. उदाहरणार्थ २१ व्या पानावर Weak अशा शब्दाऐवजीं Week असा पडला आहे, २३ व्या पानावरील २७ व्या ओळींत Herbart असा शब्द पाहिजे तो Herbert असा पडला आहे, २२ पानावरील ३ ऱ्या ओळींत Joking असा पाहिजे तो Joacking असा पडला आहे! ( What a Joke! ). पण मुद्राराक्षसांबद्दल जर 'खिळाऱ्यां'ना जबाबदार धरायचें तर मजकुरासंबंधींची जबाबदारीहि लेखकानें स्वतःवर घेण्यास पुढें झालें पाहिजे.

लेखकाला उत्तेजन देण्याकरितां म्हणून ज्या ज्या थोर व्यक्तींनीं (आदरणीय आतांच्या नांवाचा उल्लेख करावयाचा नाहीं असा दंडक आपल्यामध्यें असल्यामुळें) या लिखाणाचा गौरव करून त्याचा पुरस्कार केला त्यांचेसंबंधीं लेखक नेहमीं कृतज्ञताबुद्धि ठेवील यापेक्षां जास्त तें तो काय म्हणणार?

वर्षप्रतिपदा, १८५८.
सरस्वती मंदिर, सोलापूर.

**ना. म. पटवर्धन**

**ता. क.**— "यशोदा-चिंतामणि" ट्रस्टनें सदरहू पुस्तकाला १९३६ चें दुसरें बक्षीस देऊन त्याचा जो गौरव केला त्याबद्दल सदरहू ट्रस्टच्या चालकांचे अत्यंत आदरपूर्वक आभार मानतों. असें 'सद्यःफल' मिळाल्यास कोणाला नवीन उमेद येणार नाहीं?

सोलापूर.
ता. २४-६-३६.

**ना. म. पटवर्धन**

# प्रत्येक प्रकरणांत ओघानें आलेले शैक्षणिक विषय



---

# अभिप्राय



रा. रा. पटवर्धन यांस कृ. सा. न. वि. वि.—

'आमच्या इंदूचें शिक्षण' या तुमच्या पुस्तकाची छापील १४४ पानें तुम्हीं मजकडे ठेवून गेलां तीं मीं मधून मधून रिकामपणीं रात्रीं बसून वाचलीं. बालवाङ्मयाचीं पुस्तकें माझे वाचनांत फारशीं येत नाहींत. परंतु जीं आजवर आलीं त्यांत मनोरंजकतेच्या दृष्टीनें तुमचें पुस्तक प्रमुख स्थान मिळवील असें मला वाटतें. पण मनोरंजकता साधली याचा अर्थ तुम्हीं काल्पनिक कादंबरी लिहिली असा नव्हे. प्रथम मी कादंबरीची कल्पनाच मनांत वागवून वाचूं लागलों; पण लवकरच हें माझ्या लक्षांत आलें कीं, इंदू मुलगी व तिचे आईबाप हीं तीनच मुख्य पात्रें घेऊन त्यांच्या साहाय्यानें बालशुश्रूषेपासून तारुण्योन्मुख विद्यार्थिनीपर्यंतच्या बालिका-शिक्षणाची माहिती तुम्हीं भरपूर व मार्मिक दिली आहे. बालमानसशास्त्र मुख्यतः मनांत धरून तदनुरोधानें शिक्षण कसें द्यावें याची चर्चा पुस्तकांत फार चांगली साधली आहे. पण ही चर्चा मनोरंजक होण्याला तुम्हीं जीं उदाहरणें पदोपदीं दिलीं आहेत तीं कारणीभूत झालीं आहेत असें म्हणावें लागतें. उदाहरणांशिवाय मानसशास्त्र रूक्ष होतें. तुमच्या उदाहरणांनीं त्या शास्त्राला कादंबरीचें स्वरूप आलें आहे. मात्र अल्प वयांतहि प्रजाजनन-शास्त्र शिकविणें हें शास्त्रीयरीत्या ठीक असलें तरी पुस्तकांतील तो भाग शिकविणाराला जडच जाईल असें वाटतें.

पुणें.
ता. १३।३।३६.

न. चिं. केळकर.



'मुलांशीं कसें वागावें' हें थोडक्यांत व सुंदर रीतीनें एखाद्या पुस्तकांत सांगितलें आहे काय असें आईबापांनीं व शिक्षकांनीं मला विचारल्यास 'आमच्या इंदूचें शिक्षण' या पुस्तकाचें नांव मी त्यांस सांगेन.

या कल्पनारम्य पुस्तकांतील नायकाचें नांव 'नाना' आहे. पुस्तकाच्या कर्त्याचें नांवहि 'नाना' आहे. नायकाच्या मुलीचें नांव 'इंदु' आहे, लेखकाच्या मुलीचें नांवहि 'इंदु' होतें. पुस्तकांत वर्णन केलेले कांहीं प्रसंग व कांहीं अनुभव सत्यसृष्टींतले आहेत असें मी म्हणूं शकतों. पण सत्यसृष्टींतल्या खऱ्या गोष्टींचें या पुस्तकांत कलात्मक व मनोहर रूपान्तर केलें आहे. सत्यसृष्टींतल्या उपाधींनीं सत्याचें स्वरूप कित्येक वेळां झांकलें जातें, कित्येक वेळां त्याला विकृत रूप येतें व कित्येक वेळां त्यांत कटुत्व भासतें. सत्य वास्तविक 'शिव' व 'सुंदर' असतें पण तें उपाधींमुळें तसें भासत नाहीं. भासलें तरी पटत नाहीं व पटलें तरी अंगीं बाणत नाहीं.

या पुस्तकाचे कर्ते माझे मित्र नाना पटवर्धन यांनीं कांहीं सत्यांचें खरें स्वरूप ओळखलें आहे. त्यांतील कटुत्व कष्टानें अनुभवून व प्रयत्नपूर्वक जिरवून त्यांतील शिवत्वाचा व सौंदर्याचा आतां ते आनंदानें आस्वाद घेत आहेत व इतरांना आस्वाद घेण्याची संधि देत आहेत. मोठ्या गोष्टींची लहान गोष्टींशीं तुलना करण्याचा दोष पत्करून थोडक्यांत असें म्हणतां येईल कीं, शंकरानें विश्वाचें दहन करणारें विष खाऊन व पचवून जगाला जसें 'शिव' स्वरूप दाखविलें तसें नाना पटवर्धनांनीं संसारांतलें विष पचवून जगाला संसारांतलीं रम्य चित्रें दाखविलीं आहेत. या पुस्तकांत बोध आहे, कला आहे, विनोद आहे, कोट्या आहेत व एकंदर वातावरण आल्हाददायक आहे. लेखक स्वतः एम्. ए., एल्. टी. आहेत, त्यांस अध्यापनाचा अनुभव आहे. लहान मुलांची त्यांस आवड आहे, ते मार्मिक आहेत, रसिक आहेत, विनोदी आहेत व कोमल मनाचे व उदारवृत्तीचे आहेत. त्यांचे हे सर्व गुण या पुस्तकांत उतरले आहेत असें थोडासा अतिशयोक्ति-दोष पतकरूनहि म्हणण्यास हरकत नाहीं.

पुणें ४.<br>
१६-३-३६.

वा. म. जोशी.

---

माझे मित्र श्री. नाना पटवर्धन यांनीं लिहिलेलें 'आमच्या इंदूचें शिक्षण' हें मराठी भाषेंतील एक अपूर्व पुस्तक म्हणून ठरणार आहे. ही एक शिक्षण-शास्त्रावरील हृदयंगम कादंबरीच आहे म्हणाना. मात्र या कादंबरीची बैठक केवळ कल्पनेची नसून वाचन, अनुभव, अवलोकन व शास्त्रीय विचारसरणी यांच्या चिरेबंदी चबुतऱ्यावरच या गोष्टीची उभारणी केली आहे. सुप्रसिद्ध शिक्षणशास्त्रज्ञ रूसो याच्या 'एमिल' किंवा पेस्टॅलॉत्सीच्या 'गर्ट्रूडनें आपल्या मुलांना दिलेलें शिक्षण' या कथात्मक स्वरूपांच्या शैक्षणिक पुस्तकांप्रमाणेंच या पुस्तकाची रचना केलेली आहे. बालमानसशास्त्रावरचीं व शिक्षणपद्धतींचीं अनेक पुस्तकें वाचून जें ज्ञान पदरांत पडणार नाहीं तें या एका पुस्तकाच्या परिशीलनानें प्राप्त झाल्याशिवाय राहणार नाहीं. लहान मुलांची शैशवावस्थेंतील शारीरिक व मानसिक वाढ, सहजप्रवृत्तींचा विकास, संवयींचें संवर्धन, भावनांची जोपासना, गृहपरिस्थितीचा परिणाम, त्यानंतरच्या काळांतील त्यांच्या स्वभावांत होणारा बदल, शिवाय बालशिक्षणाच्या निरनिराळ्या पद्धति, अध्यापनाचीं तत्त्वें, वसतिगृहांतील वातावरणाचे मनावर होणारे परिणाम, शाळांतील मुलांनीं चालविलेल्या चळवळी, शिक्षक व शिस्त अशा शिक्षणशास्त्रांतील अनेक लहानमोठ्या महत्त्वाच्या गोष्टींची चर्चा रा. पटवर्धन यांनीं मोठ्या कौशल्यानें चाणाक्षपणानें व मार्मिकतेनें या गोष्टीच्या ओघांत केलेली आढळून येईल. कांहीं कांहीं नाजुक विषयांवरचे पापुद्रे हलक्या हातानें व निर्भय वृत्तीनें दूर करतांना रा. पटवर्धन यांनीं दर्शवलेली कुशलाई वाखाणण्यासारखी आहे. शालेय सृष्टींतील ग्रंथांत आढळून येणारी भाषेची व भावनांची रूक्षता व विचारांचा ओबडधोबडपणा यांचा लवलेशहि या पुस्तकांत आढळून येणार नाहीं. जिवंत अनुभवांतून उसळणारे व रेखीव शब्दांच्या पाटांतून झुळझुळ वाहणारे विचाराचे रुपेरी ओहोळ या ठिकाणीं जागोजाग दिसतील व त्यांवरून वाहणाऱ्या विनोदाच्या वायुलहरींनीं वाहून आणलेले शीतळ तुषार तर रसिकांच्या अंगावर हर्षाचे रोमांच उभे केल्याशिवाय राहणार नाहींत. हळव्या मनाचा प्रेमळ व ममताळु पिता, मोठेपणांतहि 'मूल-पणा'ला पारखा न झालेला आनंदी शिक्षक, अनुभवाच्या कसोटीवर पुस्तकी ज्ञान घासून .घेणारा चोखंदळ टीकाकार अशा तीन भूमिकांचें संमिश्रण रा. पटवर्धन यांच्या ठिकाणीं झालेलें असल्यानें त्यांच्या आजपर्यंतच्या

अनुभवाचा ऐनजिनसी सलंग गाभाच या पुस्तकांत उतरलेला आहे असा मी निर्वाळा देतों. शिक्षणशास्त्र अलीकडे 'माणसाळत' चालल्याचें आपण ऐकतों. तें खरें असेल तर त्याचा हा उत्तम पुरावाच आहे! ट्रेनिंग कॉलेजांतून असल्या जातिवंत वाङ्मयाचा कधींतरी प्रवेश होईल काय ?

प्रल्हाद केशव अत्रे

---

'इंदूचें शिक्षण' फार सुंदर आहे. असें छानदार पुस्तक लिहिल्याबद्दल आपलें मनःपूर्वक अभिनंदन करितों. हें पुस्तक लिहिण्यांत आपण फार मार्मिकता दाखवली आहे. शरिराची सर्वांगीण जोपासना व वाढ व्हावयाची असेल तर विविध प्रकारच्या अन्नांतूनच जीवनरस मिळविले पाहिजेत. ते शरिरांत 'इंजेक्ट' करून भागायचें नाहीं. 'केमिकल फुड'प्रमाणेंच रूक्ष बाल-मानसशास्त्राचें तर्कनिष्ठ विवेचनहि उपयोगी पडत नाहीं. मनोरंजक गोष्टींच्या कथानकाच्या द्वारें आपण सोदाहरण केलेलें विवेचन उपकारक ठरेल. मार्मिक भाषा, सुंदर दाखले, विनोद, उपहास, चिमटे व बोचकरे या आधुनिक साधनांनीं या कंटाळवाण्या विषयाला आपण चित्ताकर्षक केलें आहे. आपण 'खिचडी'च केलीत, पण ती मसालेदार आहे; व माझ्यासारख्या गुजरातमध्यें बाळपण गेलेल्या माणसास ती प्रिय आहे.

आपण शिक्षणविषयक वाङ्मयाच्या बाबतींत पहिल्या प्रतीची कामगिरी करीत आहां. आतां इंदूच्या शिक्षणासारख्या मोठ्या व हिंगण्याच्या मराठी भाषेंतल्या पुस्तकाऐवजीं एक लहानसें सोलापुरी भाषेंतलें खमंग, बालमानस-शास्त्रावर चरित्रात्मक किंवा त्या धर्तीचें एखादें पुस्तक लिहाल तर प्राथमिक शिक्षक व बहुजन समाज आपले उपकारी होतील. मग--घ्या लेखणी हातीं.

आपला

**विठ्ठलराव घाटे**

---

**आमच्या इंदूचें शिक्षण.** लेखक—**ना. म. पटवर्धन,** एम्. ए., एल्. टी. सरस्वतीमंदिर गर्ल्स् हायस्कूल, सोलापूर.

लहान मुलें वाढविणें व त्यांना शिक्षण देणें ही मोठी महत्त्वाची व कठीण बाब आहे. पुष्कळ सुशिक्षित पालकांना या बाबतींत काय करावें हें समजत नाहीं. प्रत्येक पालकाला वाटतें कीं, आपला मुलगा मोठा व्हावा, तो सद्गुणी निघावा व त्यानें आपलें आणि आपल्या कुटुंबाचें नांव जगांत वर काढावें. पण या बाबतींत थोड्याच पालकांना समाधान मिळतें. पुष्कळांना आपल्या मुलांच्या बाबतींत दुःखी-कष्टी व्हावें लागतें. असें कां ?

" आमच्या इंदूचें शिक्षण " या पुस्तकांत त्याचें उत्तर मिळेल. आई मुलांकडे कोणत्या दृष्टीनें पाहते व वडिलांची दृष्टि कोणत्या प्रकारची असते हें या पुस्तकांत मार्मिक तऱ्हेनें दिलेलें आहे. इंदूचे वडील स्वतः अध्यापक आहेत. आई सुशिक्षित आहे. आईला बालसंगोपन शास्त्राची माहिती आहे. वडिलांना बालमानसशास्त्र व शिक्षणशास्त्र अवगत आहे. दोघां-नाहि आपली मुलगी नमुनेदार व्हावी असें वाटतें व त्या तऱ्हेनें ते प्रयत्न करितात. अशा तऱ्हेचा योगायोग क्वचित् आढळतो. मुलांच्या शिक्षणाच्या बाबतींत— विशेषतः मुलींच्या शिक्षणाच्या बाबतींत— मध्यम वर्गांतील कुटुंबांत येणारे अनुभव या पुस्तकांत ग्रथित केलेले आहेत. मानसशास्त्राचे अगर शिक्षणशास्त्राचे सिद्धांत न सांगता प्रत्यक्ष या बाबतींत काय करावें हें या पुस्तकांत प्रसंगा-प्रसंगानें सांगितलें आहे. शिक्षकांना व पालकांना हें पुस्तक फारच उपयुक्त झालें आहे. पुस्तकाची भाषा सरळ व सोपी आहे. वाचतांना कंटाळा येत नाहीं. प्रो. पटवर्धन यांनीं अशा तऱ्हेचें उपयुक्त पुस्तक मराठींत लिहिल्याबद्दल आम्ही त्यांचें अभिनंदन करितों.

ट्रेनिंग कॉलेज फॉर मेन,<br>पुणें, ता. २२-३-१९३६.

**सी. रा. तावडे,**<br>प्रिन्सिपल

---

वाङ्मयाच्या मुदपाक-खान्यांत रा. पटवर्धन यांचें हें कांहीं पहिलेंच पदार्पण नाहीं. आजपर्यंत लहान मुलांना त्यांनीं कित्येक गोडधोड पदार्थ तयार करून घातले आहेत. त्यांनीं मोठ्या मंडळीकरितां तयार केलेली 'खिचडी'हि मोठी रुचकर झाली आहे. ह्या खिचडींतील मानसशास्त्राची डाळ इतकी गुलगुलीत शिजली आहे, कीं तोंडांत घातल्याबरोबर ती विरघळून जाते. खिचडीवर घातलेला भावनापूर्ण भाषेचा लोण्याचा गोळा, आणि विनोदाचें खोबरें यांनीं रुचींत फार भर पडली असून अनुभवाच्या मसाल्यामुळें खिचडीला उत्तम स्वाद आलेला आहे. थंडीच्या कडाक्यांत धुंधुरमासाच्या वेळीं गरम गरम खिचडी खातांना जी कांहीं और मजा उपभोगायला सांपडते ती या पुस्तकानें वाचकांना मिळणार आहे. साध्या भाषेंत सांगा-वयाचें तर आईबाप व शिक्षक यांना तर या पुस्तकांत अभ्यसनीय असा कितीतरी भाग सांपडेलच, पण इतर वाचकांनाहि निव्वळ मनोरंजनाकरितां हें पुस्तक वाचनीय झालें आहे. शैक्षणिक व मानसशास्त्रीय तत्त्वें सहज समजतील इतक्या घरगुती तऱ्हेनें मांडल्याचें हें पहिलेंच उदाहरण आहे. आपल्या मुलांच्या शिक्षणाची आस्था वाटणाऱ्या प्रत्येक आईबापानें व शिक्षकानें हें पुस्तक नुसतें वाचावें इतकेंच नव्हे तर त्याचा अभ्यास करून लेखकाच्या अनुभवांशीं स्वतःच्या अनुभवांची तुलना करून पहावी म्हणजे पुस्तकापासून पुष्कळ फायदा होईल. हें पुस्तक लिहून मराठी भाषेंतील शिक्षणविषयक ग्रंथांत चांगली भर घातल्याबद्दल रा. ना. म. पटवर्धन यांचें अभिनंदन करणें जरूर आहे.

ता. २१-३-१९३६. } भा. धों. कर्वे.

---

अपत्य-वात्सल्य हा आम्हां महाराष्ट्रीयांचा मोठा कौतुकास्पद गुण-विशेष आहे. आपलीं कच्चींबच्चीं सुखी रहावीं म्हणून पडतील ते काबाडकष्ट व येतील त्या हाल-अपेष्टा सोसण्यास आम्ही सदैव तयार असतों; व या बाबतींत मातेच्या त्यागास तर मोजमापच नसतें. परंतु वाईट येवढेंच वाटतें कीं, ह्या प्रेमास ज्ञानाची जोड जितकी असावयास पाहिजे तितकी नसते. बाल-मन, त्यांतील सहज प्रवृत्तीचें रंगरूप, त्यांचा उद्गम, विकास व परिपोष वगैरेबाबत अनेक भ्रामक व घातुक कल्पना उराशीं बाळगल्यामुळें तेजस्वी, स्वावलंबी व धडाडीची अशी पिढी निर्माण होण्याऐवजीं घाबरट, भेदरट व न्यूनगंडानें सदैव पछाडलेली अशा पिढीची भर होत असते. मुलींच्या वागणुकींत तर या दुर्गुणांची पराकाष्ठाच झालेली दिसून येते. यावर उपाय म्हणजे पालकांनीं बाल-मानसशास्त्राचा अभ्यास केला पाहिजे. बाल-मनोवृत्तींचें जग हें प्रौढांच्या जगाची एखादी छोटी आवृत्ति नसून तें एक निराळेंच जग आहे हें तत्त्व प्रथम उमगलें पाहिजे. ह्या बहुमोल शास्त्राची तोंड-ओळख, रा. ना. म. पटवर्धन यांनीं आपल्या 'इंदूचें शिक्षण' या छोट्याशा अभिनव ग्रंथांत मोठ्या गोड, विनोदी व दृष्टान्तयुक्त भाषेंत करून देऊन मराठी वाङ्मयांत एक नवें दालन उघडून दिलें आहे. महाराष्ट्रीय जनतेनें या ग्रंथाचें परिशीलन करून त्यांतील मोलवान् तत्त्वें आचरणांत आणल्यास बालकांच्या स्वातंत्र्याची ध्वजा फडकाविली जाऊन त्यांच्या जीवनांत एक प्रकारचा सात्त्विक आनंद निर्माण होईल.

पुणें, १२-६-१९३६. } ना. ग. नारळकर.

# आमच्या इंदूचें शिक्षण



— १ —

मीच फाजील प्रेमळ म्हणून म्हणा किंवा पोरच इतर मुलांपेक्षां जास्त चांगली म्हणून म्हणा, मला आमच्या इंदूबद्दल इतर बापांना आपल्या मुलांबद्दल वाटतं त्यापेक्षां जास्त प्रेम व कौतुक वाटतं हें कांहीं खोटं नाहीं. इतर बाबतींत इतका चोखंदळ व निरखून-पारखून पाहणारा मी, पण तिच्या बाबतींत मात्र अगदीं आंधळा बनतों! तिचं तें नकटसं नाक, किलकिले डोळे, कपाळावर भुरभुर उडणारे केस—सगळं, सगळं कसं तिला अगदीं शोभून दिसतंसं मला वाटतं. शेजारीं-पाजारीं इतर पोरं काय कमी का आहेत, पण एकाला तरी आमच्या इंदूची सर! तिच्या आईला आपल्या मुलीबद्दल वास्तविक माझ्याहिपेक्षां जास्त वाटत असलं पाहिजे; पण ती बरीच शिकली-सवरलेली असल्यामुळं व शिकल्या-सवरल्या बायकांनीं मुलांवर इतकं प्रेम करणं चांगलं नाहीं—आणि असलेलं दाखविणं तर त्याहून वाईट—असं तिनं वाचलं असल्यामुळें ती स्वतः इंदूबद्दल फारसं प्रेम दाखवीत नाहीं—उलट मलाच नेहमीं हसते, व शेजारच्या विनायकरावांचं उदाहरण देऊन 'पुरुषाच्या जातीनं मुलांचं इतकं कौतुक करणं चांगलं नाहीं बरं का' अशी अप्रत्यक्षरीत्या माझी कानउघाडणी करण्याचा प्रयत्न करते. पण हें सगळं वरवरचंच. कारण मी किंवा दुसरं कोणी तिथं नाहीं असं समजून ती इंदूचे मटामट मुके घेतांना मीं समोरच्या आरशांतून कितीदा तरी पाहिलं आहे!

इंदु जन्मास येण्याच्या पूर्वीपासूनच मी व तिची आई आमच्या भावी मुलासंबंधींच्या विचारांत व त्या अनुरोधानें परस्परांची थट्टामस्करी करण्यांत गढून जात असूं. मुलगा का मुलगी हवी असें विचारलें म्हणजे ती 'मुलगी' असें म्हणे, पण तें वरकरणींच असावें. कारण इंदु झाल्यावर पहिल्या-पहिल्यांदा कितीतरी दिवस तिची आई फारशी खुशींत दिसत नसे. मला मात्र मुलगी झालेली ऐकून खरोखरीच बरें वाटलें. बायकांना मुलगे व पुरुषांना मुली जात्याच आवडतात

असें दिसतें. या आवडीच्या मुळाशीं लौकिक व व्यावहारिक कारणें असतीलच; पण त्यांशिवाय कदाचित् त्याचें कारण फ्राइडसाहेब म्हणतात त्याप्रमाणें एकादी सुप्त वासनाहि असण्याचा संभव आहे. पण त्यांच्या मानसावगाहन शास्त्रांत आपण न पडलेलेंच बरें. जात्याच लहान मुलांची आवड, पहिलं मूल आणि त्यांतून मी शिशुमानसशास्त्राचा नवथर अभ्यासू. तेव्हां इतर मानसशास्त्रज्ञांप्रमाणें आपणहि आपल्या मुलाचें लहानपणापासून निरीक्षण केलें पाहिजे ही अभिमानयुक्त भावना मनांत जागृत झाली. अर्थात् इंदूच्या शारीरिक वाढीकडे व मानसिक विकासाकडे मी एकाद्या शास्त्रज्ञाच्या ऐटीनें लक्ष देऊन पाहूं लागलों. मनाच्या अस्तित्वाच्या पहिल्या खुणा कोणत्या? मूल प्रथम रडतें तें कां? कवी म्हणतात त्याप्रमाणें दिव्यलोकाची आठवण होऊन का दुसरीच्या पुस्तकांतील लहानगी यमुना म्हणते त्याप्रमाणें भुकेच्या शिकवणुकीमुळें? मन व आत्मा यांत फरक काय व तो केव्हां दृष्टीस पडेल? या व अशा प्रकारच्या कितीतरी शंका माझे मनांत घोळत होत्या; व आपल्याला देवानें मूल दिलें म्हणजे या सगळ्या शंकांचीं उत्तरें आपलीं आपणच मिळवूं अशी मला फार दिवसांची आशा होती. पण माझ्या या सगळ्या आशा कश्या फोल झाल्या हें मी कशाला सांगूं? जेथें सुइणीसारख्या अडाणी आयाबायांना प्रवेश मिळतो तेथें मुलीच्या प्रत्यक्ष बापाला—व तो शिशुमानसशास्त्रज्ञ असतांना—मिळूं नये याचा मला सात्त्विक संताप येऊन वाईटहि वाटलें. पहिल्या १०-१२ दिवसांतल्या गोष्टी पहावयाचें जरी जमलें नाहीं तरी पुढें १५–२० दिवसांनीं इंदूच्या पाळण्यापर्यंत माझा प्रवेश होऊं लागला, व त्याचा शक्य तो फायदा घेण्याचा मीं बेत केला. मी घटका-घटका इंदूच्या पाळण्याशीं उभा राहून तिचे ते बाळसेदार हातपाय, घारे डोळे, तांबूस ओठ, भुरके केस, चकाकणारी श्याम कांति पाहत बसावें. या गोष्टी पाहत असतांनाच ज्या जिवाचे किंवा आत्म्याचें शरीर हें एक बाह्य कवच किंवा स्वरूप आहे त्या जिवाच्या किंवा आत्म्याच्या वाढत्या सामर्थ्याची प्रतीति होऊं लागावी. याच जिवाला आतां कालांतरानें राग, लोभ, भीति, प्रेम, जिज्ञासा वगैरेंची जोड मिळून तो जीव जास्त जास्त समृद्ध होत जाणार, असे विचार मनांत येऊन मानसिक विकासाचें मोठें कौतुक वाटावें, व या कौतुकाच्या भरांतच मीं इंदूच्या आईला मानसिक विकासासंबंधीं मोठया तात्त्विक गोष्टी सांगाव्या असें किती तरी दिवस चाललें होतें.

एके दिवशीं मी इंदूच्या पाळण्यावर वांकून तिला हसविण्याचा प्रयत्न करीत होतों. पापे काय घेतले, कानांत कुर्रर काय केलें, पण ती पोर कसली खराब! सारखी रडतच होती! तिचें तें रडणें ऐकून तिची आई तेथें धांवत धांवत आली, व तिनें इंदूच्या खालचें दुपटें बदललें; आणि तत्काळ ती खट्याळ पोर रडायची थांबून हसायला कीं हो लागली! तिची आई माझ्याकडे पाहून हसली व मी खालीं पाहून हसूं लागलों. तिघें हसलोंच, पण तिघांच्या हास्याचीं कारणें किती निरनिराळीं! सुखदुःखादि गोष्टींचा शरिराशीं किती निकटचा संबंध आहे हें त्या वेळीं जसें मला पटलें तसें त्यापूर्वीं पटलें नव्हतें. त्या प्रसंगानें दुसऱ्याहि एका गोष्टीची जाणीव झाली. पुरुषांनीं स्वतःला मानसशास्त्रज्ञ म्हणवून लहान मुलांसंबंधींच्या ज्ञानाची कितीहि प्रौढी मारली, तरी आयांना आपल्या मुलाचें मानसशास्त्र जितकें चांगलें समजतें तितकें कांहीं शिशुमानसशास्त्राच्या प्रोफेसरालाहि समजत नाहीं. कालिदासानें सांगितलेलें 'स्त्रीणां अशिक्षितपटुत्व' तें हेंच! मानसिक गोष्टी शारीरिक गोष्टींवर कश्या अवलंबून आहेत याची जाणीव झाल्या वेळेपासून आपण तिच्या मनोविकासासंबंधीं निराळी काळजी घेण्याचें कांहीं कारण नाहीं; शरिराची काळजी घेतली व तें निरोगी स्थितींत ठेवलें म्हणजे मनासंबंधींच्या सर्व गोष्टी आपोआप साधतील असें आम्हीं ठरविलें, व इंदूच्या आरोग्याकडेच जास्त लक्ष देऊं लागलों. पै-पैची काळजी घेतली कीं, पैशाची निराळी घ्यावी लागत नाहीं.

अगदीं तान्हेपणीं दुपटें वाटेल तेव्हां ओलें होत असे, आणि पोर किंचाळली म्हणजेच तें समजून येत असे. पण पुढें लौकरच तिच्या आईनें या बाबतींत तिला शिस्त लावली. पहिल्या-पहिल्यांदा तो एक समारंभच होऊन बसला होता. त्याला आम्ही थट्टेनें 'शू ऽऽऽ'चा समारंभ म्हणत असूं! इंदु अर्धवट जागी होऊन जरा चळवळ करूं लागली, किंवा जागेपणींहि कांहीं ठराविक काळ लोटला म्हणजे तिची आई तिला अंथरुणांतून बाहेर काढून तोंडानें 'शूऽऽऽ' करी. आणि 'तिनें' तसें केलें, कीं पुढच्या प्रकाराला सुरुवात होई. 'शूऽऽऽ'च्या समारंभाप्रमाणेंच दुसरा एक 'शी'चा समारंभ मधून मधून साजरा करावा लागत असे. हे दोन्ही समारंभ पुढें पुढें इतके नियमितपणें व कुणीकडल्या कुणीकडे पार पडत, कीं त्याचा कोणाला मागमूसहि लागत नसे. चांगल्या संवयी लावायच्याच झाल्या तर येवढया लहानपणापासूनसुद्धां कश्या लावतां येतात याचें हें चांगलें उदाहरण आहे. आयांनीं मुलांच्या या

शरीरधर्मांची इतर बाबतींतल्याप्रमाणें जरा टूक संभाळली म्हणजे झालें हें लक्षांत आणून देण्याकरतांच या जराश्या घाणेरड्या प्रकारांचें पाल्हाळानें वर्णन केलें.

लहान मुलांच्या खाण्यापिण्याचे बाबतींत आपल्याला कांहीं समजत नाहीं तेव्हां डॉक्टराचेच सल्ल्यानें चालणें बरें असें आम्हीं उभयतांनीं ठरविलें. अंगावरच्या दुधासारखें लहान मुलाला दुसरें अन्न नाहीं असें आम्हीं आमच्या आयांआज्यांकडून ऐकलें होतें; परंतु तेवढयानें समाधान न होऊन आम्हीं एका नुकत्याच शिकून आलेल्या व तज्ज्ञ म्हणून नांवाजलेल्या डॉक्टराला विचारलें. त्यानें बाकीच्या सर्वांना मूर्खांत काढून अंगावरचें दूध कसें वाईट असतें, आईचे रोग दुधावाटे मुलांत उतरण्याची कशी भीति असते, चांगल्या दुधाची सर्व उत्तमोत्तम तत्त्वें या बाटलींतील दुधांत कशीं सामावलेलीं आहेत, त्या बाटलींतील दुधाची निरनिराळ्या निष्णात डॉक्टरांनीं कशी प्रशंसा केली आहे इत्यादि गोष्टी सांगून आमच्या हातून आमच्या पोटच्या गोळ्याची कशी आबाळ होत आहे वगैरे गोष्टी आमच्या गळीं उतरविण्याचा प्रयत्न केला; व त्याचें म्हणणें आम्हांला पटलेंहि. बरं झालं ना? देव भेटला! नाहींतर पोरीची काय दशा झाली असती असें मनांत म्हणून आम्ही इंदूला बाटलींतील दूध पाजायला लागलों. पहिल्यापहिल्यांदा ती पोर किरकिर करायची; पण आंधळ्या प्रेमाला बळी न पडतां डॉक्टरच्या म्हणण्याप्रमाणें चालायचें असें आम्हीं ठरविलें. पोरीच्या किराकिरण्याकडे किंवा तिच्या रडण्याकडे आम्हीं बिलकुल लक्ष दिलें नाहीं. उलट ती वाळूं लागली आहे तेव्हां अंगावरील फाजील मांस झडून पोर आतां सुटसुटित व सशक्त होणार असें आम्हांला वाटूं लागलें; पण इंदूची किरकिर व रोडावणं हीं सारखीं वाढतच चाललीं. तेव्हां तिला अंगावर पाजण्याला सुरुवात करावी अशी मींच गोष्ट काढली. इंदूच्या आईच्या मनांतून तें होतेंच; पण आया प्रेमांधळ्या असतात हा आरोप खोटा ठरविण्याकरितां उसना खंबीरपणा अंगीं आणून ती प्रथम मलाच माझ्या हळव्या प्रेमाबद्दल हसूं लागली. कांहीं दिवसांनीं जसं कांहीं आपण पतीच्या शब्दाला मान देतों आहों, वास्तविक आणखी कांहीं दिवस वाट पाहण्याची आपली तयारी आहे असें मला भासवीत तिनें इंदूला अंगावर पाजण्याला सुरुवात केली. आणि चमत्कार असा झाला, कीं अवघ्या चारपांच दिवसांत पोर चांगली टकटकीत दिसूं लागली! अर्थात् 'तरी सांगत होतों' असं म्हणून तिला हिणवायला मींहि कांहीं कमी केलं नाहीं! तेव्हांपासून आम्ही मनानं ठरवलं, कीं डॉक्टरच्या नुसत्या

डिग्र्यांकडे पाहण्यांत अर्थ नाहीं. त्याचं वय व वयाबरोबर येणारा अनुभव हींहि लक्षांत घ्यावयाचीं. तरण्या डॉक्टराचा जो इंदूच्या बाबतींत आम्हांला अनुभव आला तोच मला माझे बाबतींत एका म्हाताऱ्या न्हाव्याचा आला. बेटयानें दिसत नसल्यामुळें नखाऐवजीं करंगळीच कापून काढण्याचा घाट घातला होता! आणि मी मूळचा कवि नसतांहि एकदम पुढील ओळ माझे तोंडून बाहेर पडली–" तरणा डॉक्टर अन् म्हातारा न्हावी, यांची संगत कुणा न व्हावी."

इंदूच्या खाण्यापिण्यासंबंधीं आमचे हातून अजाणतां कितीतरी चुका झाल्या आहेत. ती माती काय खायची, भिंती काय चाटायची ! आणि एकदां तर तिनें एकाद्या 'समलोष्टाश्मकांचन' योग्याप्रमाणें स्वतःची विष्टाच चिवडून पाहिली ! या गोष्टी आठवल्या म्हणजे अजूनहि अंगावर शहारे येतात. आणि खरोखरच मनुष्याचे सर्व अपराध पोटांत घालून मनुष्याचें रक्षण व संगोपन त्याला अज्ञात अशा एका विशिष्ट पद्धतीनें करणारी एकादी दैवी शक्ति आहे म्हणून हें जग चाललें आहे असा विचार मनांत येऊन त्या शक्तीचें कौतुक वाटूं लागतें. अपत्याविषयक जबाबदाऱ्या न ओळखतां पातकांवर पातकें करणारे आम्ही आईबापहि भलेभक्कम, अन् त्यांच्या पातकांना भीक न घालतां त्यांच्या पोरांचं रक्षण करणारा देवहि भला बहाद्दर ! दोघांचीहि शर्थ आहे !

---

आमची इंदू ते तसले घाणेरडे पदार्थ खाऊनपिऊनहि जगली याचें बरेंचसें श्रेय जसें त्या दैवी शक्तीला आहे तसेंच तें कांहींसें हवा, ऊन्ह इत्यादि दैवी देणग्यांनाहि आहे.

पहिल्यापहिल्यांदा आम्ही तिला माजघरांत उघडयावर बांधलेल्या एका सुंदरशा पाळण्यांत घालून जातां येतां हलवीत असूं. या हलविण्याचा इंदूला इतका नाद लागला, कीं तिच्या आईला उभ्या उभ्याहि तिला डोलवावें लागे! कित्येक वेळां असेंहि होई, कीं मुलगी निमूटपणें खांद्यावर पडली असूनहि आई नेहमींच्या सरावानें हत्तीसारखी उगीचच मागेंपुढें झुलत राही! डोलवण्याला कंटाळून ती जेव्हां डोलण्याच्या या वाईट खोडीबद्दल मुलीला खोटया आविर्भावानें रागे भरे तेव्हां मीहि तिची स्वतःची ही डुलण्याची खोड काढून तिचा मनोभंग करीत असें. खोड—मग ती मुलीला असो, कीं आईला असो; डुलण्याची असो, कीं डोलवण्याची असो—खोड म्हटली कीं ती वाईटच.

पुढें पुढें आम्ही तिला एका हातगाडींत घालून मोकळ्या स्वच्छ हवेंत मुबलक हिंडवीत असूं. आणि प्राण्याचं अगदीं पहिलं जीवन हवाच नाहीं का? अन्नपाणी हीं मागाहूनचीं. मोकळ्या हवेचें हें महत्त्व जाणून आम्ही तिला त्या वेळीं हिंडवीत असूं, कां इतर फॅशनेबल जोडपीं मुलाला घेऊन हिंडायला जातात म्हणून आम्ही तसें करीत असूं, हें आतां मला नक्की सांगतां येत नाहीं. पण स्वतःच्या सुखाकरितां कां होईना, आम्ही जें इंदूला हिंडवीत असूं तें तिला फारच चांगलें मानवलें हें स्वानुभवानें समजलें असल्यामुळें तरुण होतकरू जोडपीं माझ्याकडे येतात तेव्हां मी आपण होऊनच त्यांना मोकळ्या व मुबलक हवेचें महत्त्व पटवून देतों. या हवेच्या बाबतींत तर मी पुढें पुढें इतका नादी बनलों, कीं बाहेर थंडीचा कडाका पडला असतांना किंवा उजेडाचा त्रास होत असतांनाहि मी इंदूच्या निजावयाच्या खोलीच्या खिडक्या सताड उघडया ठेवीत असें.

ऋतुमानांत बदल होऊन त्यामुळें येणारीं पडसें, खोकला, ताप इत्यादि नित्याचीं दुखणीं, व गोंवर, कांजिण्या, दांत वगैरेसारखीं नैमित्तिक दुखणीं इंदूला आलीं व गेलीं; परंतु त्यामुळें तिला फारसा त्रास झालेला मात्र आठवत नाहीं. कारण एक तर या दुखण्यांचा फारसा बाऊ करावयाचा नाहीं, व बऱ्याच-

त्या गोष्टी निसर्गावर सोपवावयाच्या असें आमचें यासंबंधींचें सामान्य धोरण ठरलें होतें. दुसरें असें, कीं इंदूच्या आईनें या बालरोगांची चालचालऊ माहिती– ते होऊं नयेत म्हणून घ्यावयाची खबरदारी व झाले असतां करावयाची उपाययोजना– यांची माहिती करून घेतली होती. शिवाय माझी जशी हवेवर श्रद्धा बसली होती तशी तिची शुश्रूषेवर बसली होती. आणि तिनें घरांतील किती तरी दुखणीं नुसत्या नर्सिंग्च्या जोरावर पार पाडलीं होतीं. आजाऱ्याच्या अंवतींभंवतीं येवढासुद्धां घामटपणा तिला सोसत नाहीं. एकदां इंदू अशीच कशानेंशी आजारी होती, आणि मी बाहेरून आल्याबरोबर तिच्या खोलीकडे तिला घ्यावयाला म्हणून गेलों. दुसरी कोणी बाई असती तर माझा तो प्रेमभाव ओळखून मला तिनें इंदूला खुशाल घेऊं दिलें असतें; पण तिच्या आईला मी माझ्या कपडयानिशीं तिच्या खोलींत जाणें बिलकुल आवडलें नाहीं व तिनें या बाबतींतला कडूपणाहि सोसला ! हीं नैमित्तिक दुखणीं सोडलीं म्हणजे इंदूला आमच्या हलगर्जीपणामुळें किंवा लाडामुळें दुखणें आल्याचें मला स्मरत नाहीं. नाहीं म्हणजे नुसतं पोट कसं दुखतं हें सुद्धां तिला माहीत नाहीं.

इंदूला हें जें प्रकृतिस्वास्थ्य लाधलें त्याला आणखीहि दोन गोष्टी कारण झाल्या आहेत. एक खेळ व दुसरी विश्रांति. माझे आईबाप जुन्या परंपरेचे असल्यामुळें त्यांना मुलांना मोकळेपणानें खेळूं देणें कसेंसेंच वाटे. त्यांना खेळांतील चांगूलपणा कळता तर त्यांनीं आम्हां मुलांना खेळूं दिलें नसतें असें मला वाटत नाहीं. आमच्या सुखार्थ इतर ज्या ज्या गोष्टी त्यांना माहीत होत्या त्या त्या त्यांनीं स्वार्थत्यागपूर्वक नाहीं का केल्या ? त्यांच्या त्या मला खेळूं न देण्याचा परिणाम मात्र असा झाला, कीं मी स्वतः खेळण्याचे बाबतींत शेवटपर्यंत अडाणी राहिलों येवढेंच नव्हे, तर खेळणें म्हणजे कालाचा अपव्यय करणें आहे, तें पोरकटपणाचें आहे, त्यानें मुलें उद्धट बनतात, अश्या चमत्कारिक कल्पना कितीतरी दिवस माझ्या बनून राहिल्या होत्या. परंतु इंदूच्या जन्मानें व माझ्या वाचनानें खेळण्याकडे पाहण्याची एक नवीन दृष्टि मला प्राप्त झाली. पूर्वीं मी खेळण्याच्या इतका विरुद्ध, पण आतां मला स्वतःला खेळणें लहान मुलांपेक्षांहि जास्त आवडूं लागलें आहे. स्वतःला एकदां खेळाचें महत्त्व पटल्याबरोबर आणि लहानपणींच खेळाची आवड उत्पन्न झाली नाहीं तर पुढें मोठेपणीं ती उत्पन्न होत नाहीं व मग आयुष्य फार कंटाळवाणें जातें

असा अनुभव आल्यामुळें व प्रतिक्रियेच्या नियमानें, मी इंदूचे बाबतींत खेळा-संबंधीं फारच उदार बनलों होतों. हात, पाय, मान, डोकें, कमर वगैरे निरनिराळ्या अवयवांना व नाक, कान, डोळे वगैरे इंद्रियांना ज्यांनीं भरपूर व्यायाम मिळेल अशीं निरनिराळीं रंगीबेरंगी खेळणीं मी इंदूला आणून देई. कोणतेंहि नवीन खेळणें दिसलें, कीं मग मी पैशाकडे किंवा देशीविदेशीकडे न पाहतां खरेदी करीत असें. माझ्या या उधळेपणाला शेजारीपाजारी—व कधीं कधीं तर इंदूची आईहि—मला हंसत; पण बिचाऱ्यांना काय माहीत, कीं माझ्या इंदूचा चुणचुणीतपणा, चलाखपणा, तिचें तें तोलांत उभें राहणें, अवसानांत चालणें, तालबद्ध धावणें, तिच्या बसण्याउठण्यांतील झोक व रुबाब, तिचे ते पाणीदार डोळे, तीक्ष्ण कान, तो चकचकीत चेहरा, व मोहक बांधा वगैरे सर्व कांहीं या खेळण्यामुळें तिला प्राप्त झालें होतें. माझें हल्लीं असें ठाम मत होऊं लागलें आहे, कीं नुसत्या सुंदर नाकाडोळ्यांपेक्षां तजेलदार चेहरा जास्त चांगला व सुंदर चेहऱ्यापेक्षांहि सुंदर बांधा जास्त चांगला. आणि हें बांध्याचें सौंदर्य प्राप्त करून घ्यावयाचें तर त्याला खेळण्यासारखें दुसरें साधन नाहीं.

फार पुढची गोष्ट आहे पण आतां ओघानें आठवलीच आहे म्हणून सांगतों. इंदु ७-८ वर्षांची झाल्याबरोबर मी तिला एक लहानशी पायगाडी घेऊन दिली. अगोदर पोरीची जात, त्यांतून ती इतकी लहान असतांना, अन् त्यांतूनहि बसतां येण्यापूर्वींच मीं तिला सायकल घेऊन दिली हें तिच्या आईलासुद्धां फारसें आवडलें नाहीं, आणि तिनें मला नको म्हणावयाचें तें म्हटलेंहि. पण जेव्हां इंदु शेजारच्या वश्याचें पाहून पाहून ४-५ दिवसांत सायकलच्या बारमधून तिडवा पाय घालून सायकल जोराजोरानें हाणूं लागलेली तिनें पाहिली तेव्हां तीच माझ्याकडे येऊन ओशाळलेल्या आवाजानें म्हणते, 'पाहिलं का इंदू कशी बसायला लागली ती ? मला वाटलं होतं ती पडेल-झडेल, सायकल मोडील,अन् उगीचच एक नसतं दुखणं घरांत आणील; म्हणून मीं तेव्हां नको म्हटलं.' तिचा तो ओशाळलेला चेहरा व अभिमानगलित वृत्ति पाहून मीहि जरा विर-घळलों व 'या वयांत सायकल चालवणंच काय, आणखी कितीतरी करामती इंदु करून दाखवील; तिच्या बापाला तिच्याकडून करवून घेण्याची बुद्धि व सामर्थ्य पाहिजे येवढंच!' असें कांहींसें जरा गर्हिवरून म्हणालों. खरोखरच इंदु त्या ४-५ दिवसांत इतकी चांगली बसायला कशी शिकली याचें मलाहि मोठें आश्चर्य वाटतें. मी बसायला शिकलों तेव्हां किती उरस्फोड करावी

लागली होती !. रोज रात्रीं ११ ते १, सर्व रहदारी थांबली म्हणजे एका उघडया पटांगणांत एक भाडोत्री सायकल, अन् जनोबा व लखोबा धरायला अशा सरंजामानें तबल १५ दिवस धडाक्याचा कार्यक्रम चालला होता ! शेवटीं सायकलवर बसलों, सोडलं नाहीं ! पण एकंदर झटापटींत १ चष्मा व १ घडयाळ गारद होऊन धोतर अन् अंग किती फाटलं अन् खरचटलं असेल याची तर गणतीच नाहीं ! त्या मानानें इंदूला कांहींहि इजा किंवा त्रास झाला नाहीं. एकदां वाटतं हापटी मिळून तिच्या नडगीला बरंचसं लागलं होतं; पण तें तिनं आपल्या आईला किंवा मला कळविलंसुद्धां नाहीं. रात्रीं जेव्हां झोपेंत ती कण्हूंविवळूं लागली तेव्हां तें उघडकीस आलं; पण लगेच दुसऱ्या दिवशीं खपली धरून पार निकाल ! लहान मुलांना झालेल्या इजा इतक्या ताबडतोबीनें बऱ्या करण्याची कोण ही सृष्टीची तत्परता ! नाहींतर मोठीं माणसं जरा कोठें पडलीं, कीं कायमचीं पडून राहायचीं !

पुढच्याच उन्हाळ्यांत मीं इंदूला पोहायलाहि शिकविलें. या वेळीं मात्र तिची आई आड आली नाहीं. उलट तीच मुलीच्या लाजेकाजेनें का होईना– इंदूबरोबर पोहावयास शिकली. तिला इंदूपेक्षां फारसे जास्त दिवस लागले नाहींत किंवा फारसे जास्त श्रमहि पडले नाहींत; तथापि दोघींच्या पोहण्यांत सुबकपणाच्या दृष्टीनें फारच फरक दिसे. इंदूचें तें संथ पोहणें कोणीकडे, व तिच्या आईची ती धाड्धाड् कोणीकडे ? इंदु माशासारखा पाण्यांतल्या पाण्यांत इकडून तिकडे सुरंदिशी व ऐटींत जाई, तर तिची आई गटांगळ्या खात खात व धडपडत पार पडे! इंदु तोंडानें चुळा टाकून इंद्रधनुष्याच्या रंगांचा खेळ करी तर तिच्या आईच्या नाकातोंडांतून पाणी जाऊन जीव गुदमरण्याची पाळी येई. हें सर्व लिहिण्यांत इंदूची स्तुति करावी व तिच्या आईची निंदा करावी असा माझा हेतु नाहीं. तसा असेल कसा ? दोघीहि माझ्याच ना ? पण मला येवढेंच दाखवायचें आहे, कीं कांहीं कांहीं गोष्टी योग्य त्या वयांतच शिकल्या नाहींत तर त्या पुढें अगदीं असाध्यच नसल्या तरी जश्या साधायला पाहिजेत तश्या साधत नाहींत. शरिराचा लवचीकपणा जाऊन तें ताठर बनलें म्हणजे शारीरिक संवयी लागणें कसें शक्य आहे ?

इंदूच्या प्रकृतीची काळजी घेतांना तिनें भरपूर खेळावें असा जसा माझा कटाक्ष असे, तसाच तिला झोंपहि भरपूर मिळाली पाहिजे असाहि एक असे. सबंध दिवसभर खेळण्याच्या रूपानें होणारी शरिराची झीज लक्षांत घेतां

लहान मुलाला जितकी जास्त झोंप मिळेल तितकी चांगली असें आम्हांस माहीत असल्यामुळें तिच्या झोंपेविषयीं आम्ही भारी दक्ष असूं. थोडासा आडोसा केला, किंचित् मांडी हलविली, डाव्या हातानें हळूहळू थोपटून उजव्या हातानें जरा वारा घातला म्हणजे पोर अशी कांहीं सुखावे व त्या सुखांतच तिनें असें कांहीं हसत झोंपीं जावें, कीं तिचें मोठेपणीचें आयुष्यहि असेंच सुखपर्यवसायी होईल ना अशी पाहणाराचे मनांत एक भित्री शंका पटदिशीं येऊन जावी. सबंध झोंपभर तिचा तो हसरा चेहरा तसाच राही. मग झोंपेंत कोण कोण सगेसोबती आपला दिव्यलोक सोडून आपल्या पूर्वजन्मीच्या मैत्रिणीला भेटायला येत असतील कोणास ठाऊक! जितक्या आनंदानें इंदु झोंपीं जाई तितक्याच आनंदानें ती जागी व्हावी म्हणूनहि आम्ही काळजी घेत असूं. पाळण्यांत तिच्या कानाशीं तोंड नेऊन इंऽऽदे म्हणून अशी कांहीं मंजुळ हसरी हांक मारीत असूं, कीं ती ऐकून पोर हसत हसतच टक्दिशीं डोळे उघडी. हा आवाहनसमारंभहि ठरलेल्या वेळींच होत असल्यामुळें इंदु पुढेंपुढें आपोआपच ठरलेल्या वेळीं जागी होई, पण आई किंवा बाप उठवायला यायची वाट पाहत लुच्ची तशीच पडून राही! ती जसजशी मोठी होऊं लागली, तसससे हे निजवण्याउठवण्याचे समारंभ बंद पडून तिचें झोंपेचें प्रमाणहि कमी कमी पडूं लागलें. पुढेंपुढें तर तिला मोठ्या माणसांच्या बरोबरीनें उठावेंसें व निजावेंसें वाटे. पण कांहीं झालें तरी तिनें रात्रीं आठाचे पुढें जागायचें नाहीं असा आम्हीं नियमच केला होता. पहिल्यापहिल्यांदा ती निजायला जायला जरा नाखूष असे व कांहींतरी निमित्त काढून मला बिलगूनबिलगूनच असे. कधीं माझे डोळेच काय झांकी, कधीं न मागतांच मुके द्यायला काय येई! परंतु मला तिनें गोड गोड मुक्यांची कितीहि लालूच दाखविली तरी ती निजेची वेळ मीं सहसा टळूं दिली नाहीं. अर्थात् यामुळें आम्हांलाहि घरांतच राहावें लागून नाटकसिनेमाच्या सुखाला आंचवावें लागे. मुलीला मोलकरणी-वर सोंपवून दोघांनींहि नाटकाला– निदान सिनेमाला– जाण्याचा तारुण्यांतला मोह मला एकादे वेळीं तरी होई. पण इंदूच्या आईला ही गोष्ट कधींहि खपली नाहीं. आणि तिचेंच बरोबर होतें असें मला वाटतें. पोरांच्या कल्याणांतच आईबापांचे सुख असलें पाहिजे. जेव्हां पाहावें तेव्हां पोरीला झोंप कशी गाढ लागलेली असायची. कण्हणें, विवळणें, भेदरणें, बरळणें–

कांहीं नाहीं. निष्पाप वृत्ति, भरपूर खेळणें, बेताचें खाणेंपिणें इतकीं असल्यावर गाढ झोंप न येईल तरच आश्चर्य ! आतां तिला पूर्वींसारखें दुसरें कोणी उठवावें लागत नसे. उजाडल्याबरोबर स्वतः जागी होऊन इंदु जेव्हां मलाहि उठवायला येई तेव्हां तिचा तो ताजातवाना व प्रसन्न चेहरा पाहून मला जो आनंद होई तो विचारूंच नका. आपला सबंध दिवस सुखानें जाणार याचा जणूं कांहीं तो शुभशकुनच ! आणि अशी भावना झाल्यामुळें जागा झालों असलों तरी ती उठवायला आल्यावांचून मी उठत नसें.



# — २ —

लहान मुलांचें संगोपन कसें करावें याबद्दल आमचे विचार चालूं असतांना त्याचसंबंधींच्या माहितीचें व्याख्यान ऐकण्याचा एक अचानक योग आला. आमच्या विनायकरावांचे एक मित्र विलायतेंतून स्त्रिया व लहान मुलें यांच्या रोगांसंबंधींचा विशेष अभ्यास करून नुकतेच परत आले होते. ते बरेच दिवस तिकडे राहिल्यामुळें त्यांना मराठींत तितकेंसें बोलतां येत नव्हतें. शिवाय त्यांच्यांत मधून मधून खांदे उडविणें, भिवया चढविणें, चवड्यांवर उभे राहणें, डुलणें वगैरे लकबी असल्यामुळें वास्तविक व्याख्यान उपयुक्त माहितीनें भरलेलें असूनहि तिकडे फारसें कोणाचें लक्ष नव्हतें. त्यांतच त्यांनीं एका आंग्ल युवतीशीं लग्नाबिग्न केल्याच्या कंड्याहि ऐकूं येत असल्यामुळें श्रोत्यांचीं मनें त्यांचेसंबंधीं बरींच कलुषित झालेलीं होतीं. ओळख करून देणारानें आपल्या सुरुवातीचे भाषणांत 'आजचे व्याख्याते इंग्लंडहून परत आले आहेत. त्यांना स्त्रियांचे रोगांसंबंधीं प्रत्यक्ष अनुभव असून मुलांचे तर ते स्पेशॅलिस्ट आहेत' अशी माहिती सांगितली; तेव्हां श्रोतृवर्गापैकीं कांहींचे तोंडांवर मिस्किलपणाचें हसूं दिसूं लागलें, व कांहीं चटोर मुलांनीं स्टँपिंग करून 'डॉक्टर F. R. C. S. की जय' असा ओरडाहि केला! वास्तविक त्या गृहस्थानें व्याख्यात्यांसंबंधीं चांगलें बोलायचें ठरविलें असूनहि त्याची त्यांचेसंबंधीं जी एक विकृत भावना बनून राहिली होती तीमुळें त्याचे तोंडून विपरीत अर्थसूचक शब्द बाहेर पडले. सज्जनपणाचा आव वाणीनें कितीहि आणला तरी मन तिच्याकडून खरें वदविल्यावांचून राहत नाहीं असें म्हणतात तेंच खरें. व्याख्यात्यांनीं आपले भाषणास सुरुवात केली. "सभ्य बाया व सभ्य पुरुष, तुम्ही मला या संध्याकाळीं बोलावून मला जे उपकाराखालीं ठेवलें आहे त्याबद्दल मला तुमचे पहिल्यांदा आभार मानूं द्या. आज संध्याकाळचा प्रश्न बालें कशीं वाढवावीं हा आहे. आणि त्याची माहिती मातांना असणें फार महत्त्वाचें आहे. प्रथम मला तुम्हांला हें सांगावेंसें वाटतें, कीं हिंदुस्थानांतील प्रत्येक माता डिलिव्हरीला हॉसपिटल्मध्यें गेली पाहिजे. तरच आपली फ्यूचर पिढी चांगली निघून मिस्टर गांधी हल्लीं जें स्वराज्य मागत आहेत तें उपभोगण्यास लायक होईल. प्रत्येक मुलाला जन्म दिल्याबरोबर त्याला कशा प्रकारचें अन्न, हवा, कपडे, स्नान, विश्रांति झोंप दिली

पाहिजे हें मातांना माहीत असावयास पाहिजे. तसेंच बाळाचें मन कसें वाढतें हेंहि तिनें जाणलें पाहिजे. तेव्हां आपण हे दोन्ही प्रॉब्लेम्स् एकामागून दुसरा घेऊं आणि पाहूं आपल्याला त्याचेविषयीं काय करतां येईल."

व्याख्याते बहुतेक नेहमींचेंच सांगणार, आणि तेंहि विलायती दृष्टीनें व विलायती भाषेंत सांगणार असें वाटून व श्रोत्यांच्या त्या टिंगल करण्याच्या वृत्ती-मुळें व्याख्यान कदाचित् धडपणें पारहि पडणार नाहीं अशी शंका मनांत येऊन आम्ही अर्ध्याच व्याख्यानांतून उठून आलों. पण दुसरे दिवशीच्या 'ज्ञानप्रकाशां'त आदल्या दिवशीच्या व्याख्यानाच्या रिपोर्टावरचे जाड टाइपांतले मथळे पाहून भाषण फार चांगलें झालेलें दिसलें, व आपण उगीचच उठून आलों याचें वाईट वाटूं लागलें. व्याख्यात्यांना वास्तविक जें बोलायचें होतें पण जें त्यांना चांगलेसें बोलून दाखवितां आलें नाहीं तें सर्व समजावून घेऊन रिपोर्टरनें आपला रिपोर्ट लिहिला असल्यामुळें तो मोठा सुंदर झाला होता. रिपोर्टरानें म्हटलें होतें:—" व्याख्यात्यांनीं शिशुसंगोपनाची सर्व साधारण समजूत करून दिल्यावर ते लहान मुलांचा मनोविकास कसा होतो या प्रश्नाकडे वळले. वाईट येवढेंच वाटतें, कीं व्याख्याते या भागाकडे येईतों अर्धी-अधिक मंडळी उठून गेली होती. आणि म्हणून तर या भागाचा अहवाल जरा जास्त विस्तृत व निराळ्या भाषेंत देणें हें लोकशिक्षणाचे दृष्टीनें आम्ही आपलें कर्तव्य समजतों. व्याख्यानाच्या दुसऱ्या भागाला सुरुवात करून व्याख्याते म्हणाले, 'लहान मुलांच्या मनाचा विकास कसा होतो हें पाहतांना पहिली महत्त्वाची गोष्ट आपण ध्यानांत धरली पाहिजे ती ही, कीं त्यांना कांहीं नैसर्गिक प्रेरणा किंवा सहजप्रवृत्ति (Instincts) असतात. तीं नेहमीं शरिरानें व मनानें चळवळ (activity) करीत असतात. या चळवळीचें किंवा हालचालीचे हेतु- किंबहुना सर्वच सहज प्रवृत्तींचे हेतु—व्यक्तीचें पोषण, व वंशरक्षण असें असल्यामुळें त्या चळवळी बंद पाडूं पाहणें म्हणजे मुलांची वाढ खुंटविण्यासारखें आहे. चळवळ–हालचाल म्हणजेच जीवन असून ती बंद करावयास सांगणें म्हणजे मुलाला मरायला सांगण्यासारखेंच आहे. चळवळ करूं नका असें जेव्हां सांगण्यांत येतें तेव्हां ती चळवळ निरर्थक व निरुपयोगी आहे असें वाटूनच सांगण्यांत येतें हें खरें; पण लहान मुलांची चळवळ मोठया माण-सांना निरर्थक वाटली तरी मुलांच्या दृष्टीनें ती सार्थ व साभिप्राय असते. शिवाय एकादी चळवळ मुलांच्या दृष्टीनेंहि निरर्थक व निरुपयोगी वाटली तरी ती

अजिबात बंद करून चालणार नाहीं. तिचें शुद्धीकरण व उदात्तीकरण (sublimation) करून ती उपयोगी करून घेतली पाहिजे. मुलें भिंतीवर कोळशानें रेघोटया मारीत असतील तर त्यांना रेघोटया ओढूं नका येवढेंच सांगून चालणार नाहीं. भिंतींच्या ऐवजीं तीं जमिनीवर किंवा दारांवर व राजरोस नाहीं तर चोरून खरडूं लागतील. शौचकूपांसारख्या घाणेरड्या परंतु बंदिस्त जागेंत चित्रकला व साहित्य येवढी कां माजतात याचें खरें कारण हेंच आहे. तेंच तुम्ही त्यांना फळा किंवा मोठा कागद देऊन त्यावर राजरोसपणें रेघाटूं दिल्यास त्यांच्या त्या रेघोटयांतूनच चांगलीं चांगलीं चित्रें जन्माला येतील. मुलांच्या मानसिक चळवळीलाच आपण जिज्ञासा म्हणतों. मुलें शरिरानें जशीं कधीं स्वस्थ बसणार नाहींत तशीं मनानेंहि बसणार नाहींत. तीं सारखीं हें काय, हें कोणीं केलें, कशाला केलें, कसें केलें असे सारखे प्रश्न विचारून मोठया माणसांना भंडावून सोडतील. पण या त्यांच्या चौकश्या—आपण मोठ्या माणसांनीं त्यांना चांभार-चौकश्या म्हटलें तरी— अगदीं योग्य असून त्या मनाच्या पोषणासाठीं व विकसनासाठीं अगदीं जरूरीच्या आहेत. हालचाल त्यांच्या शरिराला जीवनरस देते तर ही जिज्ञासा त्यांच्या मनाला अन्न पुरविते. म्हणून मुलांनीं विचारलेल्या प्रश्नांचीं उत्तरें देऊन त्यांना जास्त जास्त विचारायला उत्तेजन देणें जरूर आहे. कित्येकदां त्यांच्या प्रश्नांचीं उत्तरें देणें आपणांस शक्य नसेल, किंवा तीं देतां आलीं तरी तसें करणें इष्ट नसेल. परंतु या अडचणींतून कसें पार पडायचें हें सुजाण व अनुभवी पालकांना सांगण्याची जरूरी नाहीं. प्रश्नांचीं उत्तरें तात्पुरतीं देऊन तो प्रसंग साजरा करा, पण कांहीं झालें तरी त्यांना नाहीं म्हणून निरुत्साही करूं नका.

“ दुसरी महत्त्वाची सहज प्रेरणा म्हणचे नवनिर्मितीची (Constructive Instinct) होय. मुलांना जुन्या वस्तु मोडून त्यांचें कांहीं ना कांहीं नवीन करावेंसें वाटतें; आणि कोणतीहि गोष्ट नवीन करायची म्हणजे जुनी मोडायलाच पाहिजे. मुलें जी ही मोडतोड करीत असतात ती या सुप्त हेतूनेंच करीत असतात. त्यांच्या त्या मोडतोडीनें मोठया माणसांचें नुकसान होतें हें खरें, पण असल्या मोडतोडीनेंच मनाचा विकास होत असतो, ही गोष्ट लक्षांत घेऊन थोडासा तोटा सोसला पाहिजे. मुलें करीत असलेली ही मोडतोड नवनिर्मितीच्या कार्याचा अर्धा भाग असून ती करतांना पालकांचें नुकसान करावें असा त्यांचा मुळींच हेतु नसतो. शिवाय त्यांचे हातून जी मोडतोड होते ती

त्यांचे स्नायूंत. तो पदार्थ पेलण्याइतकी पुरेशी शक्ति आलेली नसते म्हणून होते. मुलांचे हातून दुधाचें पातेलें पडतें तें, किंवा बाटलींतील शाई दौतींत ओततांना बैठकीवर सांडते, ती त्यांनीं आईबापांचा सूड घेण्याकरितां पाडलेलें किंवा सांडलेली असते असें नाहीं. तर त्यांना ती बाटली किंवा तें पातेलें पेलत नाहीं म्हणून. बरें स्नायूंत शक्ति येईतों कांहींच उचलूं द्यावयाचें नाहीं असें ठरविल्यास स्नायूंत शक्ति तरी कशी येणार ? त्यांना ती शक्ति पुढें यावी म्हणून ही आगाऊ किंमत द्यावयाची असते. व्यापारी नाहीं का पुढें नफा होईल या आशेनें अगोदरच भांडवल घालीत, किंवा म्हातारपणीं स्वतःला अथवा मरणोत्तर नातेवाईकांना पैसे मिळावेत म्हणून आपणहि नाहीं का विम्याचे हते भरीत ?

" व्याख्यात्यांनीं यासंबंधींचीं आणखी कांहीं उदाहरणें देऊन ते पुढें म्हणाले, तिसरी महत्त्वाची सहजप्रेरणा म्हणजे अनुकरण (Imitation) ही होय. मुलांच्या अनुकरणाला आपण वेडावणें, नक्कल करणें, चेष्टा करणें वगैरे म्हणतों; पण जरा विचार केला तर आपल्याला असें दिसून येईल, कीं मुलांचे सर्व शारीरिक व मानसिक व्यवहार—त्यांचें बोलणें-चालणें, त्यांचे खेळ, त्यांचें विचारणें वगैरे, या अनुकरणशक्तीमुळेंच चालतात; आणि म्हणून मुलांची अनुकरणप्रियता आपल्याला प्रिय असली पाहिजे; येवढेंच नव्हे तर त्यांनीं योग्य गोष्टींचें अनुकरण करावें म्हणून आपण आपलें वागणें अनुकरणयोग्य असें ठेवलें पाहिजे. कित्ता जितका चांगला किंवा वाईट असेल तितकें तो गिरवणाराचें अक्षर सुधाणार किंवा बिघडणार. मुलांच्या आचाराप्रमाणेंच त्यांचे विचार व त्यांच्या भावनाहि प्रथम प्रथम वडील माणसांच्या विचारांचें व भावनांचें अनुकरण करूनच बनतात. आईबापांना जें खरें किंवा खोटें वाटतें, जें बरोबर किंवा चुकीचें वाटतें तेंच व तसेंच त्यांनाहि वाटतें. आईबापांना जें सुंदर किंवा घाणेरडें वाटतें, जें हवेंसें किंवा नकोसें वाटतें—थोडक्यांत म्हणजे जें त्यांना आवडतें किंवा आवडत नाहीं तेंच मुलांना आवडतें किंवा आवडत नाहीं. आणि नीति म्हणजे तरी काय ? घरच्या किंवा समाजाच्या वागणुकीचें अनुकरणच होय.

"—व्याख्यात्यांनीं आणखी कांहीं गोष्टींचें टांचण करून आणलेंसें दिसलें, पण दिवे लागणीची वेळ झाल्यामुळें व दिव्यांची तर व्यवस्था नसल्यामुळें त्यांना आपलें भाषण अपुरेंच संपवावें लागलें. व्याख्यात्यांना मराठींत बोलण्याचा फारसा सराव नसल्यामुळें पहिल्यापहिल्यांदा त्यांची बरीच धांदल उडाली

व त्यामुळेंच बरेचसे लोक उठून गेले. पण ज्यांना शेवटपर्यंत बसण्याची सुबुद्धि झाली त्यांचा या व्याख्यानानें बराच फायदा झाल्यावांचून राहणार नाहीं असें आम्हांला वाटतें. डॉक्टरसाहेबांना आम्ही प्रेमाची अशी सूचना करतों, कीं ज्या गोष्टी केवळ मानसशास्त्राच्या विद्यार्थ्यांनाच कळतात त्या सर्व सामान्य माणसांना समजावून देण्याचा हा जो स्तुत्य यत्न त्यांनीं प्रथमच केला आहे तो तसाच चालूं ठेवावा. भरपूर विचार असले म्हणजे योग्य ती भाषा आज ना उद्यां येणारच."

रिपोर्ट वाचणें संपल्यावर मी सौभाग्यवतीकडे जरा ह्यानें पाहूं लागलों. "हं ! एकाद्या मास्तराप्रमाणें आतां कांहीं एक भाष्य करूं नका. या तुमच्या प्रेरणा का काय त्या लक्षांत घेऊन इंदूला कसं वागवायचं तें सगळं मला समजलं आहे. मी तें पाहून घेईन." मला खरोखरच या निमित्तानें कितीतरी सांगायचं होतं; पण तसें आगाऊच ताडून तिनें मला कांहींच सांगू दिलें नाहीं याचें वाईट वाटलें. मात्र कोणत्याहि गोष्टींचें तत्त्व काढून तें उगाळीत बसण्याची जी मास्तर लोकांची चाल, तिच्यावर तिनें जातां जातां जो टोला दिला त्याचें हसूं आल्यावांचून राहिलें नाहीं. मी थोडासा हिरमुष्टा झाल्याचें पाहून माझी मनधरणी करण्याच्या हेतूनें ती म्हणते, "व्याख्यान कसं छान झालं खरं ! उगाचच लोक एखाद्यासंबंधीं गैरसमज करून घेतात. अन् मी म्हणतें केला असलान् त्यानें तिकडे कांहीं घोटाळा तरी त्याचा राग व्याख्यानावर काढून काय फायदा ? लोकांनीं आतां हा विवेक करायाला शिकलं पाहिजे नाहीं का ?" खरें सांगायाचें म्हणजे इंदूच्या आईला तें व्याख्यान जितकें विद्वत्ताप्रचुर व माहितीनें भरलेलें वाटलें तितकें कांहीं मला वाटलें नाहीं. मानसशास्त्राचें कोणतेंहि पुस्तक उघडलें तरी त्यांत डॉक्टरांनीं सांगितलेल्या माहितीपेक्षां कितीतरी जास्त माहिती आढळून येते. पण मी तसें सांगून तिचें चांगलें झालेलें मत कमी करण्यांत कांहींच स्वारस्य नव्हतें. ती पुढें म्हणाली, "पण काय हो, डॉक्टर लोकांना मुलांच्या मनाची माहिती कशाला असावयास पाहिजे ? शिक्षकांचें सर्व काम मुलांशींच असल्यामुळें त्यांना ती माहिती असणें ठीक आहे." सौभाग्यवतीचे मुखांतून २-३ महत्त्वाचीं तत्त्वें आपाततः बाहेर पडलीं याचें मला कौतुक वाटलें. मला वाटतें त्यापेक्षां ती खरोखरच जास्त चाणाक्ष व सुजाण आहे यांत शंका नाहीं. तिच्या त्या शंकेचें निरसन करण्याच्या हेतूनें मीं म्हटलें, "हल्लीं शारीरिक रोग देखील शक्य तों मानसोपचारांनीं बरे

करण्याची पद्धति पुढारलेल्या राष्ट्रांतून सुरू आहे. आणि म्हणून डॉक्टरांना शारीरशास्त्राबरोबरच मानसशास्त्राची माहितीहि थोडक्यांत असावी लागते. याच्याच उलट शिक्षकालाहि मानसशास्त्राबरोबरच शारीरशास्त्र व आरोग्यशास्त्र यांचीहि माहिती हल्लीं असणें जरूरीचें झालें आहे. मनुष्य, शरीर आणि मन या दोहों मिळून झाला असल्यामुळें, डॉक्टराला काय किंवा शिक्षकाला काय मनुष्यावर कांहींहि परिणाम करायाचा झाला म्हणजे त्याच्या दोन्हीहि घटकां-ची माहिती हवीच हवी. अन् शिवाय असें, कीं एकाद्याचें धंद्याचें वाचन एका विषयाचें असलें तरी आवडीचा व्यासंग दुसऱ्याच विषयाचा असूं शकतो. या डॉक्टरांचेंहि तसेंच झालें असेल." मी पुन्हा खुशींत आल्याचें पाहून तिला हायसें वाटलें; व सुटका करून घेण्याच्या आपल्या नेहमींच्याच क्लृप्तीचा उपयोग करून कोणीं बोलावलें नसतांहि 'आलें ग आलें,' असें म्हणत हसून ती 'हो, उद्यां सकाळीं विनायकरावांना अन् त्यांच्या त्या पाहुण्यांना चहाला बोलवायचं का ? बघावं येतात का' असें सांगून आंत गेली.




आम्ही गांवांतील जरा शिष्ट व सुशिक्षित गणलीं जाणारीं माणसें. व्याख्यानांची वगैरे विशेष आवड कोणास असायची तर ती आम्हांलाच. शिवाय व्याख्याते विनायकरावांचे मित्र; अर्थातच आदल्या दिवशीं आम्ही डॉक्टरांचे व्याख्यानांतून अगोदरच उठून आलों याबद्दल डॉक्टरांचा व कदाचित् विनायकरावांचाहि आमचेबद्दल गैरसमज होतो कीं काय अशी आम्हांला भीति वाटत होती. आणि आतां ही चूक कशी निस्तरायची याचा आम्ही दोघेहि आपआपल्या परीनें विचार करीत होतों. तेव्हां सौभाग्यवतीनें सुचविलेली युक्ति मला ताबडतोब पसंत पडून मी रात्रीचे रात्री त्या दोघांस व लक्ष्मीबाईना दुसऱ्या दिवशीं तिसऱ्या प्रहरीं चार वाजतां चहाला बोलावून आलों. ठरल्याप्रमाणें ते दोघे बरोबर ४ ला आले. बायकांचें ठरल्याप्रमाणें लक्ष्मीबाईहि जरा उशिरां आल्या, व थेट स्वयंपाकघरांत गेल्या. वास्तविक त्यांची व आम्हां पुरुषांपैकीं सर्वांची अगदीं दाट ओळख होती व त्या तश्या कांहीं लाजाळूहि नव्हत्या; पण संवयीचा परिणाम दुसरें काय? त्या दोघी चहा वगैरे घेऊन आम्ही बसलों होतों तेथें आल्यावर मी विलायती शिष्टसंप्रदायाप्रमाणें सौभाग्यवतीची व डॉक्टरांची ओळख करून दिली. डॉक्टरांनींहि जरा हसल्यासारखें केलें, व इंदूकडे आणि तिच्या आईकडे पाहून "And that's Miss Agashe? A chubby child indeed"! असें म्हणून मुलीचा व एका अर्थानें आईचाहि गौरव केला! सौभाग्यवतीचा चेहरा तेवढ्यांतल्या तेवढ्यांत काय पण खुलला! सर्व स्थिरस्थावर झाल्यावर आम्ही आधले दिवशीं मधेंच उठून आलों याबद्दल दिलगिरी प्रदर्शित करण्याकरितां "Well, Doctor, we are really very sorry to have missed your lecture" असें म्हणून मी मोकळा झालों.

"अरेच्या! आपण मधूनच उठून गेलीं याचें इतका वेळ डांचत होतें बरें का राजश्रींचे मनांत! म्हणून का चहाला बोलावून केल्या पापाचें प्रायश्चित्त घेऊन टाकलेंत नाना? पण बुंदसे गयी तो—आहे ना म्हण माहीत?" विनायकराव म्हणाले.

" आपण निघून गेलांत हेंच बरें झालें. नाहींतर मी आणखी nervous झालों असतों. शिवाय व्याख्यान चांगलं असलं कीं श्रोते राहतातच. व्याख्यान interesting नसायचं आणि श्रोत्यांनींहि जातां कामा नये असली दुहेरी

शिक्षा कोण सोसणार? तिकडे विलायतेंत श्रोत्यांवर अशी सक्ति केव्हांच होत नाहीं. मात्र जाणारानें आपल्या जाण्याचा इतरांना Disturbance होणार नाहीं येवढी precaution घेतली म्हणजे झालं. विनायकराव सांगत होते you both are interested in child-psychology. पण मूळ स्वतःचं मूल आवडतं ना? नाहींतर ज्याला मुलं नसतील, किंवा असलीं तरी त्यांचेबद्दल ज्यांना बिलकुल आस्था वाटत नाहीं त्यांना शिशुमानसशास्त्राची फार आवड दिसते! रूसोचं तसंच झालं म्हणतात. काय काय observations केलीं आहेत?"

"अहो, तीं observations मागाहून. अगोदर चहा होऊं द्या. मुलां-संबंधीं पुढें बोलायचेंच आहे. ज्याचा जो विषय असेल तो त्याचेपासून पंप करून काढून घेतल्याशिवाय नाना कांहीं कोणाला सोडणार नाहींत." विनायकराव चहाची केटली पुढें ओढीत म्हणाले.

"That's just like a tactful host! यजमानानें नाहींतरी स्वतः फारसें बोलायचेंच नसतें. आलेल्या पाहुण्याला बोलण्याची संधि देऊन व आपण कोणीतरी बडे आहोंत असें वाटायला लावून त्याला खुशींत ठेवणं हेंच चांगल्या होस्टचं लक्षण गणलं जातं."

डॉक्टरांच्या खुशामतीनें खूष होऊन मी कप भरतां भरतां शेवटीं विचार-लंच, "डॉक्टर, मग खरंच विचारतों, If you don't mind answering? काल तुम्ही आणखी कशावर बोलणार होतां?"

"डॉक्टर, तुम्ही करा सुरुवात; मी सांगतों त्यांना. 'मुलांचें संगोपन व शिक्षण करतांना आईबापांपुढें व शिक्षकांपुढें कोणतें ध्येय असावें?' यावर ते बोलणार होते. पण बरं झालं बोलले नाहींत तेंच. मुलाला मुळीं शिकवूंच नये असं माझं मत आहे; मग मनांत ध्येय धरून शिकविण्याची गोष्ट तर बाजूलाच राहिली. मुलं जशीं जन्माला येतील तशीं वाढूं द्या. झाडें नाहीं का वाढत आपोआप? हल्लींच्या शिक्षणांतील एकेक खुळें पाहून शिकवायला काय घ्याल असं विचारण्यापेक्षां न शिकवायला काय घ्याल असं विचारण्याची आतां पाळी आली आहे. मनांत ध्येय धरून शिक्षण द्यायला निघालं, कीं समजावं नेमकं उलट होणार म्हणून. विनायक करायला बसलं कीं नेमकं वानरच व्हायचं."

"मग आपण आपलं वानरच करायाला बसावं, मग तर आपोआप

विनायक होईल ना ? गणपति पुढं असतो म्हणून माकड बनतं असं नाहीं. तर गणपतीचीच नीटशी कल्पना नसते म्हणून माकड बनतं." आपल्याला कांहींच बोलायला मिळत नाहीं यामुळेंच चिडून जाऊन कीं काय लक्ष्मीबाई जरा मोठयानेंच म्हणाल्या.

" That's fine वहिनी. करतां आलं नाहीं तरी काय करायचं हें माणसाचं नक्की ठरलेलं पाहिजे. आणि हें पहा विनायकराव, तुम्ही म्हणतां ना. कीं मुलांना वाढूं द्या तशींच झाडासारखीं. हें कांहीं आजकालचं अन् तुमचं एकटयाचंच म्हणणं आहे असं नाहीं. शें-दोनशें वर्षांपूर्वी रूसो हेंच म्हणाला; पण स्वतःचं म्हणणं स्वतःलाच न पटून बिचाऱ्यानं मुलाला शिक्षण देववलनच. आणि झाडं तरी कोणीतरी खतपाणी घातल्यावांचून थोडींच वाढताहेत ? कोणींतरी, कांहींतरी निगा घ्यावी लागणारच कीं नाहीं ? तुम्हांला काय वाटतं सुशीलाबाई, मुलांना शिक्षण देतांना आईबापांनीं कोणतं ध्येय डोळ्यांपुढं ठेवलं पाहिजे ? "

वास्तविक हा प्रश्न डॉक्टरांनीं सौभाग्यवतीला विचारला होता; पण तिचा बोलायला धीर झाला नाहीं म्हणून म्हणा, किंवा लक्ष्मीबाई बोलायला अधीर झाल्या होत्या म्हणून म्हणा, त्या एकदम म्हणाल्या, " आम्हांला काय समजणार खुळ्यांना ? आम्ही थोडयाच सुशीलाबाईसारख्या शिकलेल्या आहों ? पण मला आपलं वाटतं, कीं आम्ही जश्या बुजक्या, आडमुठ्या अन् अडाणी राहिलों तसं कांहीं पुढल्या मुलींनीं राहूं नये."

" वहिनी, तुम्ही कशा नेमक्या Russell सारख्या बोललात ! त्यानंहि Courage, sensitiveness आणि intelligence यांवरच भर दिला आहे. मात्र तो आणखी एक गुण सुशिक्षित माणसांत यावयास पाहिजे असं म्हणतो—" डॉक्टर म्हणाले.

" कोणता ? Silence ? " सौभाग्यवती कांहींच बोलत नव्हती म्हणून तिला खिजवण्याकरतां मीं मध्येंच विचारलें.

" नाहीं. सुरळीत चाललेल्या गाडयाला मधेंच विघ्न न आणणें." माझा अभिप्राय ओळखून सौभाग्यवतीनें ठोशास ठोसा दिला. सर्वांचें पोटभर हसून झाल्यावर डॉक्टर पुढें म्हणाले, " चौथा गुण म्हणजे vitality. त्याला तुम्ही जोम, उत्साह, शक्ति—काय वाटेल तें म्हणा. लहानपणापासून माणूस कसं निकोप, धट्टकट्ट, गुटगुटीत, आनंदी, उत्साही, भोंवतालच्या वस्तूंत

किंवा कांहींतरी करण्यांत अगदीं गुंगून गेलेलं असं असलं पाहिजे. Week, indifferent, introvert असतां कामा नाहीं. तुमची इंदूच पहा ना, आतांच त्या हातांतल्या चमच्याशीं झटापट करण्यांत कशी गुंग होऊन गेली आहे. चमचा निसटलाच तर कप घेऊन त्याच्याशीं घांगुसत बसेल, नाहींतर मनगटीच तोंडांत घालून हिरडयांवर घाशीत बसेल; पण स्वस्थ अन् हताश होऊन पडणार नाहीं. That's a healthy child. हातीं घेतलेल्या कामांत उत्साह वाटणें, जगांतील गोष्टींबद्दल आस्था वाटणें, स्वतःशींच रममाण झाल्यामुळें इतरांचा हेवा किंवा मत्सर न वाटणें, वगैरे कितीतरी गुण या एकाच गुणांतून जन्माला येतात. इतर दृष्टया माणसें कितीहि कर्तबगार असलीं तरी त्यांचे ठिकाणीं हें प्रकृतिस्वास्थ्य, जोम, उल्हास वगैरे नसेल तर त्यांना आयुष्यांत राम वाटत नाहीं, व त्यांचे हातून होणारें काम होत नाहीं. आपल्याकडचें उदाहरण मला आतां आठवत नाहीं; पण न्यूटन, लॉक वगैरे लोकांबद्दल असें सांगतात, कीं ते जर प्रकृतीनें चांगले असते तर त्यांचे हातून झाली त्यापेक्षां कितीतरी जास्त कामगिरी झाली असती."

" नाना फडणीस, सवाई माधवराव,–किंवा अलीकडचे गोखले सुद्धां–यांचे-संबंधींहि असेंच म्हणतां येईल; व त्याच्याच उलट टिळकांचें म्हणतां येईल." मी कांहींच बोलत नाहीं असें दिसूं नये, व मलाहि थोडें फार सुचतें असें दिसावें म्हणून मी मधेंच बोललों.

" Exactly, that's right." चहाचा घोट खालीं लोटीत डॉक्टर म्हणाले.

"अहो सुशीलाबाई, तो शिरा करा इकडे. आम्हांला अगोदर धष्टपुष्ट झालं पाहिजे. आतां सुशिक्षित बनायचं ना ? बाकीचे गुण येतील म्हणतां मागाहून ? मग आतांचीं आमचीं मुलं वळूसारखीं चांगलीं मस्त होऊन भटकत आहेतच कीं ? त्यांचं शिक्षण मोठं चांगलं चाललं आहे असंच ना डॉक्टरसाहेब ?" विनायकरावांनीं उपरोधिकपणानें विचारलें.

" भावजी, तुम्ही चेष्टा करा; पण मी 'हो' असंच म्हणेन. मेषमात्र, पाप्याचे पितर, अजागळ, दुर्बळ, जरत्कारू अशीं मुलं हवींत कशाला ? मुळींच न झालेलीं बरीं त्यापेक्षां. अन् चुकून झालींच तर स्पार्टांतल्याप्रमाणं त्यांचा बेलाशक कडेलोट करावा !" सौभाग्यवतींचं पहिलंच भाषण इतकं जोसाचं होईल असं वाटलं नव्हतं.

" माझ्या रागावर त्या बिचाऱ्यांना अगदीं देहान्त प्रायश्चित्त कां ? शिरा वाटल्यास जरा कमी घेतों."

" Joacking apart. या एकाच गुणावर रसेलनें सर्व भर दिला असता तर विनायकराव तुमचं म्हणणं बरोबर होतं. पण म्हणूनच त्यानें vitality ला Courage, Sensibility, Intelligence याहि गुणांची जोड पाहिजे असं म्हटलं आहे."

" या बौद्धिक युगांत Courage चें इतकें काय महत्त्व ? रानटी अवस्थेंत हिंस्त्र पशूंशीं किंवा हेवादावा करणाऱ्या शत्रूशीं जेव्हां झुंजावं लागत असे, तेव्हां त्यावांचून निभाव लागणेंच शक्य नव्हतें. त्या वेळीं धीटपणा, शौर्य वगैरेसारख्या गुणांची जरूरी होती; पण आतां या सुधारलेल्या युगांत त्याचें काय मोठेंसें ? " मीं विचारलें.

" अहाहा ! काय पण सुधारलेलं जग !" शिऱ्याच्या रिकाम्या झालेल्या बशींत बटाटयाची भाजी चमच्यानें ओढीत ओढीत विनायकराव म्हणाले. " पूर्वी म्हणे युद्ध अन् मारामाऱ्या होत होत्या; आणि आतां जश्या त्या नाहींश्या झाल्या आहेत ! रूसो-जपानी युद्ध संपून १० वर्षें झालीं नाहींत तों जर्मन महायुद्धाला सुरुवात झाली. आणि त्याची धग अजून पुरती नाहींशी झाली नाहीं तोंच चीन-जपान, जपान-अमेरिका, वगैरे युद्धांची भाषा सुरू झाली आहे. पूर्वींचीं शत्रुशत्रूंचीं हेव्यादाव्याचीं भांडणें गेलीं तर आतां मित्रामित्रांचीं मतामतांचीं, व बाप-लेक किंवा नवरा-बायको यांचीं प्रेमाप्रेमाचीं भांडणें उत्पन्न होऊं लागलीं आहेत. मारे लीग ऑफ नेशन्स काढा, अन् पीस सेलेब्रेशन्स पाळा; भांडणें कोणत्या ना कोणत्या तरी रूपानें चालूं राहणारच."

" तुमची शंका बरोबर आहे नानासाहेब; आणि तुमचं म्हणणंहि कांहीं खोटं नाहीं विनायकराव. आणि म्हणूनच Courage म्हणजे नुसतं दोन टोले देण्याघेण्याचं, किंवा शरिरानं लढण्याचं धैर्य अशा संकुचित अर्थानं रसेलनं तो शब्द वापरलाच नाहीं. टिळकांना राजकीय सत्तेशीं, आगरकरांना सामाजिक रूढींशीं, गांधींना सनातन्यांशीं ज्या धैर्यानं झुंजावं लागलं, त्या राजकीय, सामाजिक, किंवा धार्मिक धैर्याचा, तसेंच आपलीं खरीं वाटत असलेलीं मतं लोकांपुढं मांडण्याला किंवा झालेली चूक कबूल करण्याला जें नैतिक धैर्य लागतं त्याचाहि समावेश करेज या शब्दांत होतो. शिवाय करेजचा निर्भयता असाहि अर्थ होतो. आणि निर्भयता म्हणजे कशाचीसुद्धां भीति न वाटणं असं नव्हे,

तर भलत्याच गोष्टीची भीति न वाटणं. माझ्या एका वयस्क मित्राला अजून अंधेराची भीति वाटते! आणि माझ्या आजींना आतां जगाचं कसं होणार, काय होणारं, असाच हृद्रोग लागलेला असतो! खऱ्या कारणांची भीति अवश्य वाटायला पाहिजे; पण आपणच कसल्या तरी काल्पनिक भीतींचें बुजगावणें उभें करून त्याला स्वतःच भीत बसतों. धैर्याधैर्यामध्येंहि तकलादु व अस्सल असला फरक केला पाहिजे. बायकांचा धीटपणा त्यांनीं आपला भित्रेपणा झांकण्याकरितां धारण केलेला असतो. म्हाताऱ्यानें आपलें म्हातारपण झांकण्याकरितां जास्तच तरुण दिसण्यासारखाच हा प्रकार!" डॉक्टरांचें शेवटचें वाक्य ऐकून विनायक-राव बायकाकडे मिस्कीलपणें पाहूं लागतात तोंच मला विचारायचें सुचलें.

"तर मग, विनायकरावांचें मलखांब, जोडी, नमस्कार, सर्व याच सदरांत घालायचें वाटतें? बरेच की हो आहां विनायकराव!"

"बायकांच्या बरोबर पुरुषांचंहि निघालं हें बरं झालं." वहिनी म्हणाल्या.

"I mean no offence to either! पण रसेल काय म्हणतो तें सांगितलं. आपण मनांतला भित्रेपणा दडपून टाकण्याकरितां धैर्य दाखविण्याचा प्रयत्न करितों. वास्तविक, भीति मनांतच येऊं नये. सुशिक्षित म्हणून म्हटल्या जाणाऱ्या व्यक्तींत कोणत्याहि अयोग्य प्रकारचा भित्रेपणा असतां कामा नये, व ती व्यक्ति केवळ शरिरानेंच नव्हे तर मनानें आणि नीतीनेंहि धैर्यवान असली पाहिजे असें रसेलचें म्हणणें. हा धीटपणा अंगीं आणण्याला आधीं शरीरप्रकृति तर चांगली पाहिजेच, पण त्याशिवाय अंगीं स्वाभिमानहि पाहिजे. विद्या विनयानें शोभते हें खरें; पण विनय म्हणजे कांहीं बौद्धिक गुलामगिरी नव्हे. नेहमीं दुसऱ्याचे विचारानें व सांगीनें चालणें हें नम्रतेचें लक्षण नसून भेकडपणाचें आहे. तसेंच स्वतःच्या सुखदुःखांचे चिंतनांतच मग्न होऊन बसण्यापेक्षां माणसाला नेहमीं संसाराकडे स्वतःला विसरून पाहतां आलें पाहिजे. जीविताकडे पाहण्याची दृष्टि Impersonal बनली पाहिजे; आणि अशी दृष्टि बनण्याला स्वतःच्या मुलाबाळांची आवड, इतरां-बद्दल सहानुभूति, ज्ञानाची गोडी, कोणत्या ना कोणत्यातरी कलेवर प्रेम— थोडक्यांत बोलायचें म्हणजे Herbert ज्याला many-sided interest म्हणून म्हणतो तें असलें पाहिजे."

"आवड बव्हंगी असावयास पाहिजे म्हणतां? मग चटणीहि चाखून पाहिली पाहिजे. ती करा पाहूं सुशीलाबाई इकडे."

शैक्षणिक तत्त्वज्ञानासारख्या जरा भारी विषयानें आलेला शीण घालविण्याकरितां विनायकरावांच्या असल्या गमतीच्या बोलण्याचा मधून मधून चटणीसारखा उपयोग होत होता हें कांहीं वाईट नव्हतें. डॉक्टर आपलें बोलणें पुढें चालू करणार तोंच आतांपर्यंत एकटीच खेळत पडलेली इंदू किंचाळू लागली. "अहो, तुम्हीच काय नुसत्या खातपीत राहिलां आहां? मुलीच्याहि खाण्यापिण्याची कांहीं सोय कराल कीं नाहीं? कां एव्हांपासूनच तिनें आपलें पोट स्वतःच भरलें पाहिजे अशा मताच्या तुम्ही आहांत?" विनायकराव सौभाग्यवतीकडे पाहून म्हणाले.

"तें कांहीं भुकेचें रडणें नव्हे. अजून अर्धा तास अवकाश आहे दुधाला." सौभाग्यवतीनें घड्याळाकडे पाहून सांगितलें.

"That is like an intelligent mother. लहान मुलांचें खाणें, पिणें, झोंपणें सगळें कांहीं घड्याळावर बसवून टाकलें पाहिजे, विनायकराव! आणि अर्धेमधेंच तीं रडूं अन् ओरडूं लागलीं तरी तिकडे लक्ष देतां कामा नये. असलें रडणें निव्वळ खोट अन् कांगावखोरीचें असून आपल्याकडे आईनें लक्ष द्यावें, आपले लाड करावेत अशाकरतां तें असतें; आणि लहानपणाच्या या कांगावखोरपणाचेंच पुढील आयुष्यांत कुरकुऱ्या स्वभावांत रूपांतर होतें. लहानपणीं आईबाप वगैरे मायेचीं माणसं असतात, तीं तुमचं कोडकौतुक करतात; पण पुढच्या धकाधकीच्या मामल्यांत तुमच्या तक्रारींना आणि कुरकुरींना कोण भीक घालणार आहे? आणि आपल्याकडे कोणीच लक्ष देत नाहीं असं दिसलं म्हणजे मग मनुष्य सबंध जन्मभर असंतुष्ट आणि असमाधानी राहतो. म्हणून खाण्यापिण्याच्या बाबतींतल्या असल्या वक्तशीरपणाला नुसत्या वैद्यकशास्त्राच्या दृष्टीनेंच महत्त्व आहे असें नव्हे तर त्याला नैतिक दृष्टयाहि महत्त्व आहे. लहान मुलं म्हणजे जशीं सर्वस्वीं सैतानाची अवलाद नाहींत, तशीं तीं सर्वस्वीं देवदूतहि नाहींत. त्याच्यांत बरं-वाईट दोन्ही सांपडतं. आतांच पहा ना लुच्चीला इकडे मंडळींत घेऊन येऊन जरा तिचं कौतुक करा, कीं तें रडणं अन् किंचाळणं पार नाहींसं होईल."

आणि डॉक्टरांनीं खरंच इंदूला उचलून आणून आपल्या म्हणण्याचें प्रत्यंतर आणून दिलें. तिचें लक्ष आतां त्यांच्या लाल 'बो'कडे जाऊन ती रडायचें विसरून गेली. रूक्ष तात्त्विक विषयाला व्यावहारिकपणाचा किंचित् ओलावा मिळाल्याबरोबर सगळ्यांच्या—विशेषतः बायकांच्या—चेहऱ्यांवर कसा हिरवळीचा तजेला दिसूं लागला.

" सुशिक्षितपणा मी याला म्हणतों, विनायकराव," डॉक्टर पानाला चुना लावीत लावीत म्हणाले. " सुशीलाबाईंना आपल्या मुलीबद्दलप्रेम वाटत नाहीं, तिच्या सुखाबद्दल त्या indifferent आहेत असं कांहीं नाहीं. तिच्याबद्दल प्रेम तर आहेच; पण त्या प्रेमाबरोबरच त्यांच्यांत विचारशीलताहि असल्यामुळें त्यांच्या हातून भलतं प्रेम होणार नाहीं. प्रेम, राग, भीति, अभिमान वगैरे feelings सुशिक्षित माणसांत दिसलींच पाहिजेत. पण तीं योग्य मर्यादेंत राहण्याकरितां माणसांत विचारशीलताहि असावयास पाहिजे. सुखदुःखमूलक भावनांचा मनावर परिणाम होऊं शकणं यालाच Russell नें Sensitiveness असं जरा चमत्कारिक नांव दिलं आहे. तुम्ही त्याला सहृदयता, रसिकता, किंवा सरसता सुद्धां म्हणाल. आणि ही सहृदयता सुशिक्षित माणसांत अवश्य असावयास पाहिजे. A man of heart म्हणजे तरी काय? काम क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर वगैरेंचा परिणाम त्याचे मनावर अवश्य झाला पाहिजे. नाहींतर त्याला नुसता शुंभ दगडच म्हणणं बरं."

" अहो, हे तर षड्रिपू ना? आणि ते सुशिक्षित माणसांत असावयास पाहिजेत असं कसं म्हणतां?" विनायकराव विडा खात म्हणाले.

" कोण म्हणतं यांना षड्रिपू? ते तर मनुष्याच्या जीवनाचे झरे-(Springs) च आहेत. हां—ते शत्रु होतील, पण केव्हां? त्यांच्यावर कोणाचा ताबा नसेल तर. आणि म्हणूनच सुशिक्षित माणसांत विचारशक्तीहि असावयास पाहिजे असें मीं मघाशीं म्हटलें. Russell या गुणाला Reasoning power असें बडें नांव न देतां तो त्याला नुसतं Inlelligence असें म्हणतो."

" म्हणजे समजूतदारपणाच कनी?" विनायकरावांनीं वेडयावांकडया रीतीनें विचारण्यापूर्वीच मीं विचारलें.

" हो. समजूतदारपणा तर खराच, पण त्यांत स्वतः माहिती मिळवून विचार करणं आणि लोकांनीं कांहीं सांगितलं तर तें ऐकून घेणं याचाहि समावेश होतो. सुशीलाबाई किंवा वहिनी यांना तुम्हां दोघांसारखं स्वतः वाचून सवरून विचार करणं— कांहीं कां कारणांनीं असेना— शक्य नाहीं. पण त्या दोघींत निरनिराळ्या गोष्टी आपल्या कानांवरून जाव्यात, कोणत्याहि प्रश्नासंबंधीं विचारी माणसांचे विचार काय आहेत हें कळावं ही इच्छा चांगलीच दिसून येते. नाहींतर शिक्षणाबद्दलचं असलं शुष्क विवेचन किती बायका आस्थापूर्वक ऐकून घेत बसल्या असत्या? इतर स्त्रियांप्रमाणं आपल्यापुढं

चहा आणून ठेवून त्या येथून केव्हांच पसार झाल्या असत्या. त्यांना मी सुशिक्षित म्हणतों तें कांहीं उगीच नाहीं."

"भावजी, तुम्ही आम्हांला हरभऱ्याच्या झाडावर चढवूं नका. आम्हांला सुशिक्षित नव्हे अगदीं P. H. D. म्हणालात तरी आतां आम्ही कांहीं येथें बसणार नाहीं आं. अर्धा-पाऊण तास झाला तरी तो रसेल कांहीं सरत नाहीं. चारचौघांतून एकदमच उठून जाणं बरं दिसत नाहीं म्हणूनच मी इतका वेळ निमूटपणं सगळं सहन करीत बसलें आहे."

"आणि हें चारचौघांतून उठून न जाणं, आणि इच्छा नसतांहि कांहीं चांगल्या गोष्टी सहन करणं हेंहि, वहिनी, सुशिक्षितपणाचंच एक लक्षण आहे बरं का." डॉक्टर हंसत हंसत म्हणाले, आणि लगेच बसल्या जागचे उठले. अर्थात् बाकीचींहि सर्व उठलीं, व जाण्याची भाषा बोलूं लागलीं. उभयतांनीं एकमेकांचे आभार मानल्यावर व डॉक्टरांकडून पुढील खेपेस पुन्हा असेंच येण्याचें आश्वासन घेतल्यावर आम्हीं पाहुण्यांना निरोप दिला.

"झालं ? निस्तरलं एकदां ?" मीं सौभाग्यवतीला हसत हसत विचारलं. व ती "हो बाई ! पीडा गेली एकदांची" असं कांहीं म्हणेल अशा अपेक्षेनं तिच्याकडे पाहिलं. पण ती तसें कांहीं न म्हणतां उलट "किती वाचन आहे हो यांचं ? अन् मनुष्य कसा मोकळा आहे. पण काय हो हा रसेल—रसेल कोण ?" असं म्हणाली. या अपेक्षाभंगाचं मला वाईट न वाटतां उलट चांगलंच वाटलं. मीं म्हटलं, हा रसेल इंग्लंडमधला एक बडा तत्त्वज्ञानी आहे. त्याची बायको डोरा रसेल हीहि एक प्रसिद्ध विदुषी गणली जात असून त्या उभयतांनीं आपल्याला आपल्या मुलांचें शिक्षण स्वतःच्या कल्पनांप्रमाणें देतां यावें म्हणून एक स्वतःची शाळा काढिली आहे; आपणहि एक काढायची हां पुढे." पण विनोदाची ही लहर ताबडतोब ओसरून मी जरा गंभीर झालों आणि म्हणालों. "पण आतां आपल्यावर फारच मोठी जबाबदारी आली आहे. मुलें वाईट निघालीं तर 'मुलांना शिक्षण कसं द्यावयाचं हें आम्हांला माहीत नसतं' अशी एक सबब आई-बापांना असते; पण आतां आपल्याला ती उरली नाहीं. मानसशास्त्रांतील व शिक्षणशास्त्रांतील एकेका महत्त्वाच्या प्रश्नाची माहिती डॉक्टरांचेमुळें आतां आपल्याला झाली आहे. तिचा उपयोग आपण कितपत करतों येवढेंच पाहयचें उरलें आहे."

---

— ५ —

इंदू पांच-सहा महिन्यांची झाली. तिचें तान्हेपण संपून तिनें बालपणांत पाऊल टाकल्याबरोबर तिजसंबंधींच्या आमच्या आशा-आकांक्षांनाहि पंख फुटले ! तान्हेपणाच्या काळांतील सर्वच मुलें, मला वाटतें, साधारणपणें सारखींच असतात. येथून पुढेंच त्यांना नक्की व विशिष्ट रूपें प्राप्त होतात. इंदूचे आईनें परसांत नुकतेंच पेरलेलें हें कारल्याचें, घोसाळ्याचें, भोपळ्याचें बीं पहा. तें रुजून त्यांच्या अंकुरांना आलेलीं हीं अगदीं पहिलीं पानें अजून साधारणतः सारखींच गोल, मऊ व हिरवीं आहेत. कांठांचा कमीजास्त दंतुरपणा, लांबट गोल आकार, नाजूकपणा, निब्रटपणा, सरळ—वांकड्या शिरा वगैरे विशेष मागाहूनच निर्माण होतील; आणि त्या विशेष खाणाखुणांनींच जणूं कांहीं तीं पानें 'आम्ही घोसाळ्याचीं आहों', 'आम्ही दोडक्याचीं आहों', 'आम्ही भोपळ्याचीं आहों' असें सांगून आपलें व्यक्तिमत्व व्यक्त करतील. निरनिराळे अवयव, निरनिराळीं इंद्रियें, एकंदर बांधा वगैरेंचे योगानें लहान मुलेंहि आपलें वैशिष्ट्य जगाला जाणवतात. वाचा फुटणें ही व्यक्तित्वाची पहिली निशाणी होय. या वाचेच्याच सामर्थ्यानें व इतर हावभावांनीं मूल आपला सुप्त व अस्पष्ट स्वभाव, आपली विशिष्ट जाति सुस्पष्ट व सुव्यक्त करीत असतें. त्याचें मन जणुं आंतून उमलून बाहेर येत असतें. उपडें वळणें, फरपटणें, रांगणें वगैरे कृतींच्या योगानें त्याच्या आसपासच्या जगाचा ठाव त्याला लागूं लागतो. आसपासची प्रत्येक वस्तु त्याच्या आवाक्यांत येऊन तिचें रूप, रंग, आकार, वजन, मऊपणा, खडबडीतपणा वगैरे गुणांची त्याला जाणीव होते. आणि या जाणीवेचा उलट परिणाम म्हणून या प्रत्येक गुणांचें व त्या सबंध वस्तूचें नांव माहीत करून घेण्याबद्दल त्याची आंतून धडपड सुरू होते. अश्या रीतीनें त्याचें मन जास्त जास्त भरून तें जास्त समृद्ध होत असतें.

इंदूच्या जिवाचा असा अंतर्बाह्य विकास होत जाणार म्हणून मला काय आनंद वाटे ! मीं तासन्तास तिच्याकडे मोठ्या कौतुकानें पाहत बसावें ! जीव म्हणजे एकादी कळीसारखी जड वस्तु असती तर ती आंतून कशी काय भरून येत आहे तें बोटानें दाबून-चाचपून तरी पाहिलें असतें ! पण सूक्ष्म जीवाच्या बाबतींत तसें कसें पाहतां येणार ? मी उगीचच तिच्या अंगाच्या निरनिराळ्या भागांना हात लावून पाहत असें ! तिच्या आईनें मला नेहमीं

विचारावें देखील 'वेड्यासारखे येथेंढें न्याहाळून काय पाहतां? मला नाहीं तें कांहीं दिसत?' मला काय पाहावयाचें होतें तें मी तिला कसें समजावून सांगणार!

जगाची पहिली ओळख इंदूला याच वयांत व्हावयाची असल्यामुळें या काळाला जसें तिच्या सर्व आयुष्यांत एक प्रकारचें विशेष महत्त्व होतें तसेंच त्या ओळखीनें होणारें मत कशा प्रकारचें बनतें याहि गोष्टीला अतिशय महत्त्व होतें. एकाद्या वस्तूचा पहिलाच अनुभव चांगला आला, कीं ती वस्तु तिला जन्मभर चांगली वाटणार. उलट वाईट आला, कीं तीच कायमची वाईट ठरणार. आणि वस्तुवस्तूंच्या बरेवाईटपणावरूनच सबंध जग बरें किंवा वाईट ठरलें जाणार! म्हणून वस्तूची यथातथ्य ओळख करून देण्यासंबंधीं आम्ही अतिशय काळजी घेत असूं. होतां होईल तों सुबक, रंगदार, मऊ, हलक्या, सुवासिक, स्वादिष्ट वस्तूच तिच्या हाताला लागूं देत असूं. मनांतला हेतु असा, कीं सगळं जगच या वस्तूंप्रमाणें सुबक व सुंदर आहे असें तिला वाटावें, आणि या दृष्टीनें निरानिराळ्या खेळण्यांची आम्हांला भारी मदत झाली. कितीतरी वेळ इंदु त्या खेळण्यांत अगदीं गुंग होऊन जात असे. बालमन मोठें चंचल म्हणून म्हणतात; पण इंदु तासन्तास रिंगणें, खुळखुळा, गोट्या, रबराचे फुगे वगैरे खेळण्यांशीं खेळत पडलेली असे! पुढें पडलेली प्रत्येक वस्तु माकडासारखी मुटक्यानें—मोठा मनुष्य बोटांनीं उचलतो त्याप्रमाणें नव्हे—उचलायची, तोंडांत घालून तिच्याशीं घांगुसायचें, घांगुसतां घांगुसतां ती ओठाला किंवा हिरड्यांना जराशी लागली, किंवा चवीला वाईट लागली कीं तोंड वाईट करायचें, ती वस्तु टाकून द्यायची, कीं लगेच दुसरी घ्यायची असा तिचा क्रम सारखा चालूं असे. जसा कांहीं एकादा रसवाला उसाचें टिपरें चरकांत घालून त्यांतून होता नव्हता तेवढा रस निघाल्याबरोबर तें बाहेर फेकून देऊन दुसरें टिपरें लावीत आहे!

हा व्यापार इंदूला ज्ञानार्जनाच्या दृष्टीनें अतिशय महत्त्वाचा असेल; पण पाहणाराला तिची खरी मजा व धामधूम दिसत असे ती प्रत्येक वस्तूचें किंवा व्यक्तीचें व तिच्या निरानिराळ्या गुणांचीं नांवें माहीत करून घेण्याच्या व तीं तोंडानें बोलण्याच्या तिच्या धडपडींत. आणि हा व्यापार कांहीं अजब आहे खास! येवढ्या सगळ्या वस्तूंचीं नांवें जशीं कानांवर येतील तशीं ऐकून ठेवायचीं, अमक्याचें अमकेंच नांव अशी खूणगांठ घालून ठेवायची, प्रसंग पडला कीं ती घालून ठेवलेली

खूणगांठ आठवायची, व मग त्या नांवाचा उच्चार करायचा! आणि यांपैकीं एकाद्यांत जरा कसूर होऊन थोडी कूस राहिली, कीं सगळेंच आटोपलें! किती भयंकर व जोखमीचें काम हें! मी जसजसा मागें वळून विचार करीत आहें तसतसा मला हा एकंदर प्रकार फारच आश्चर्यकारक वाटत आहे. वस्तूच्या आणि तिच्या नांवाच्या खूणगांठी जरा चुकल्या म्हणजे मोठेपणींहि कसे गोंधळ होतात हें जर आठवलें तर या चमत्काराचें फारच कौतुक वाटतें. सुरुवातीला या गोष्टी अगदीं बिनचूक करणाऱ्या इंदूनेंच मोठेपणीं केलेल्या चुका आठवल्या म्हणजे अजून हसूं येतें. एकदां इंदूचे आईनें सांडगे तळले होते. जेवतांना इंदूनें 'लांडगे' मागीतले! तसेंच नवथरच मराठी शिकलेल्या एका मद्रासी बाईनें पुण्याच्या बायकी बाजारांत बुंदीचा झारा मागणेऐवजीं बुंदूची 'झारी' मागितली, व नंतर ती दांताच्या दवाखान्यांत दाढी काढण्याकरितां गेली! दुकानदार व दंतवैद्य शहाणे म्हणूनच त्यांनीं तिचें बोलणें समजून घेऊन तिला काय हवें होतें तें दिलें! शब्दसाम्यामुळें उडणारे हे घोटाळे कांहीं तरी बरे; परंतु जेव्हां का एकादा शब्दच माहीत नसतो किंवा माहीत असलेला आठवत नसतो तेव्हां जो कोंडमारा होतो तो कांहीं विचारूंच नका. शाळेंत पहिल्याच दिवशीं वाटतें, इंदूला तिच्या बाईनीं कशावरूनशी शाबासकी दिली. घरीं जाऊन हें केव्हां एकदां सांगेन असें तिला होऊन गेलें होतें. पण सांगायचें कसें? 'बाईनीं दिली', 'बाईनीं सगळ्यांच्या देखत दिली, 'बाईनीं अगदीं जवळ घेऊन दिली' असें निरनिराळ्या रीतीनें ती सारखी सांगत होती! पण काय दिली हें कांहीं बिचारीला सांगतां येईना, व आम्हां अडाण्यांना समजेना. शेवटीं आपणच आपल्या आईचा हात आपल्या खांद्यावर थोपटून दाखवून तिनें सर्व आशय समजावून दिला! "हं, हं, 'शाबसकी' होय? हात् त्याच्या"! असें मीं म्हटल्याबरोबर इंदूला काय आनंद झाला म्हणून सांगूं? मनांतून म्हणायचें आहे, पण म्हणतां मात्र येऊं नये, यासारखें दुसरें दुर्भाग्य नसेल! वाचा बसलेल्या पण जीव घुटमुळणाऱ्या आजाऱ्याची शेवटची स्थितीच ती! योग्य शब्दाभावीं होणाऱ्या कोंडमाऱ्याचे असले प्रसंग प्रत्येकावर येतात, व त्यांतून प्रत्येकजण नशिबानें निभावूनहि जात असतो; पण तेवढ्यानें लहान मुलांच्या बोलण्याच्या क्रियेंतील कुतुकास्पदता कांहीं कमी होत नाहीं!

इंदूचा सुरुवाती-सुरुवातीला आणखी एक मजेदार गोंधळ होत होता.

आईचें 'अहो, अहो' ऐकून तीहि मला पहिल्यांदा 'अव' म्हणून हाक मारी. घरांत दुसरें कोणी नसल्यामुळें ती मला दुसऱ्या कोणत्या नांवानें हांक मारणार? एक दिवस शेजारचे विनायकरावांचे लक्षांत ही गोष्ट येऊन त्यांनीं इंदूला बोलावलें, व 'हा तुझा बाप आहे, याला 'अव' नाहीं म्हणायचं बरं का?' असं बजावून सांगितलं. इंदूचे कानांवर पहिल्यांदाच 'बाप' हा शब्द आल्याबरोबर तिला त्यांतच मजा वाटूं लागली, व तेव्हांपासून ती माझेकडे बोट करून 'हा मादा पाप! हा मादा पाप' असें बडबडूं लागली. हा गोंधळ नाहींसा करण्याकरितां मींच तिला सांगितलें 'मी तुझा बाप खरं! पण मला म्हणायचं नाना' हा तिसराच शब्द ऐकल्यापासून तिचा पहिल्या पहिल्यांदा भारीच गोंधळ होऊं लागला. तिनें कधीं 'अव' म्हणावं, कधीं 'पाप' म्हणावं व कधीं 'नाना' म्हणावं! अर्थात् हा गोंधळ फार दिवस टिकला नाहीं, व पुढें आम्ही कायमचें 'नाना' बनलों ती गोष्ट निराळी. वस्तु किंवा व्यक्ति यांचीं नांवें सारखीं सारखीं बदलत राहिल्यास किंवा जुन्या गांठी पक्क्या बसण्यापूर्वींच नवीन गांठी बसूं लागल्यास गोंधळ होण्याचा कसा संभव असतो हें जातां जातां मजा म्हणून सांगितलें. खूणगांठींच्या गोंधळाशिवाय उच्चार नीट न करतां आल्यामुळें इंदूनें केलेले गोंधळ तर अगणितच असतील!

स्वतःपुरतेंच बोलण्याची इंदूची धडपड चालूं असे असें नाहीं. भोंवतालच्या सगळ्या वस्तूंना बोलतां येतें आहे असें खरोखरचें वाटून घेऊन ती त्यांचे तर्फेचेंहि आपणच बोलून घेत असे. उभी बाहुली आडवी पडली म्हणजे इंदूनेंच 'मी नाहीं बतत' असें म्हणावें! व मग तिनें इंदु म्हणून 'कां नाहीं बतत? पाय दुतूं लादले होय? बाऊ दाला? ओतद लावूं?' असें मोठ्या मायेनें म्हणावें! सर्वांठायीं जीवात्मा ओळखण्याची व त्यांचेवर आपल्याच भावनांचा आरोप करण्याची लहान मुलांची ही वृत्ति किती विलक्षण आहे! त्यांचें सर्व आयुष्य असल्या काल्पनिक आचाराविचारांत जात असतें. कल्पनेचा हा विलक्षण खेळ त्यांच्या खेळांत कसा स्पष्ट रीतीनें दिसतो. इंदूला आपल्या खेळात मग्न असलेली पाहण्यांत आम्हांला काय मजा वाटे! कधीं कधीं तर ती खेळतां खेळतांच झोंपीं जायची! भरल्या संसारांत मांडीवरची बाहुली मांडीवरच टाकून तिला निजविणारी आई स्वतःच निजून गेलेली पाहणें म्हणजे एक दृश्य आहे! तें पाहून कोणाला वृत्तिपरत्वें आनंद होईल कोणाला वाईटहि वाटेल. आठवायलाच बसलों तर इंदूचे सर्व खेळ व तिच्या लीला

डोळ्यांपुढें कश्या रांगेनें उभ्या राहतील. माझ्या कोपऱ्यांतल्या काळ्या काठीला घोडी समजून फणेऱ्याच्या पिशवीचा तोबरा देणें, मनांत आल्याबरोबर तीच काठी आपल्या पायांत आडवी घालून आपणच तिच्यावर स्वार झालों आहों या भावनेनें घोड्यासारखें पळणें, व वेळीं घोडीला म्हणून आपल्यालाच मारून घेणें वगैरे कितीतरी गोष्टी आतां आठवत आहेत.

एकदां इंदूनें आपल्या भातुकलींत आम्हां उभयतांना पाहुणे म्हणून जेवायला बोलावलें. त्या वेळीं तिचा संसार व सुग्रणपणा पाहून तर आम्ही चीतच झालों. भात, भाजी, वरण, आमटी, मधला वांगीभात, मुख्य पक्वान्न वगैरे सर्व कांहीं एका चुरमुऱ्याचें केलेलें होतें! जोंपर्यंत सर्व कोरडें कोरडेंच होतें तोंपर्यंत आम्हीं आनंदानें खाल्लें; पण जेव्हां कां तिनें पाण्यांत चुरमुरे टाकून तें पाणी कढी म्हणून कागदावर वाढलें तेव्हां तें पितांना मात्र चमत्कारिक वाटल्याबांचून राहिलें नाहीं! सौभाग्यवतीला तितका पोंच नसल्यानें तिनें मात्र 'आम्हांला नको ती खोटी खोटी कढी'! असें म्हणून ती कढी प्यायचें टाळलें; पण मीं मात्र तसें कांहीं न दाखवितां भिटक्या मारमारून ती पिऊन टाकली!

दुसऱ्याचे दृष्टीनें ज्या ज्या उणीवा व कमतरता त्या स्वयंपाकांत राहिल्या होत्या त्या सर्व इंदूनें एका कल्पनेच्या साह्यानें भरून काढल्या होत्या! आपल्या षोडशोपचारी पूजेंत बाकीच्या पंधरा उपचारांची उणीव भटजीबुवा एका अक्षतांनीं नाहीं का भरून काढीत? सगळें कल्पनेवर व मानण्यावर आहे. इंदूच्या खेळण्यांतील तो जोस व उल्हास पाहून ही पोर पुढें मोठी कर्तृत्ववान स्त्री निपजणार असें मला वाटे. खेळाच्या रंगीत तालमींत ज्याचें काम चांगलें होत नाहीं तो संसाराच्या रंगभूमीवरील आपली भूमिका तरी कशी चांगली वठवणार? मुलांचे या वेळचे खेळ वास्तविक खेळ नसून ते मुलांच्या मनांत चालू असलेल्या मनोव्यापारांचें बाह्य प्रतिबिंबच आहे. यावरूनच त्यांच्या मनाचा विकास कसा काय चालला आहे हें अजमावायचें असतें. सौभाग्यवतीला इंदूची ती कढी खोटी वाटली, व त्याबद्दल तिनें तिची थोडी चेष्टाहि उडविली! पण इंदूनें आपल्याकडून अगदीं खरी खरी म्हणून ती केली असल्यामुळें आपल्या बोलण्याचें तिला किती वाईट वाटलें असलें पाहिजे याची कल्पना सौभाग्यवतीला यावयास पाहिजे होती. आपण मोरे घरें-दारें बाधीत असावें, अन् एकाद्या संन्याश्यानें येऊन आमच्या संसाराला चांगलें म्हणण्याचे ऐवजीं 'अरे, कसलीं घरें, नी कसलीं दारें, सगळं झूट आहे' असें म्हटलें

असतां तें आपल्याला कितपत खरें व बरें वाटेल. सत्याची कल्पनासुद्धां इतर गोष्टींसारखी वयोमानाप्रमाणें सारखी बदलत राहते. एकाच्या दृष्टीला वाटणारें सत्य दुसऱ्याच्या दृष्टीला तसें वाटेलच असें नाहीं.

एक दिवस इंदु आपल्या खोलींत कोणाचे तरी अंगावर मोठमोठ्यानें ओरडत आहे असें ऐकूं आलें. काय प्रकार आहे म्हणून मी हलकेंच दारामागून पाहूं लागलों. तों 'तूं अतलं दूध घालणाल अतलीस तल आम्हांला मुली तुझं, दूधच नको, अतलं फतवं माणूत आम्हाला बिलतूल नतो, तालती हो घलातून, असं आपल्या समोरच्या बाहुलीला उद्देशून तिचं मोठ्या रागारागानं बोलणं चाललं होतें. त्या वेळची तिची चर्या, तिचे हातवारे वगैरे सर्व कांहीं तिच्या आईचें होतें. सौभाग्यवतीला विचारतां समजलें, कीं आदल्या दिवशीं तिचा आणि गवळणीचा जो खटका उडाला होता त्याची ही नक्कल होती. नकलेचा हा कांहीं एकच प्रसंग नव्हता. इंदूच्या जागत्या आयुष्याचा बहुतेक भाग कोणाची ना कोणाची तरी नक्कल करण्यांत जात असे. आतां माझ्यासारखें टेबलावर पाय रेलून व चष्मा लावून पुस्तक वाचण्याची ऐट कर, आतां आपल्या आईसारखें डोक्यावर फडकें घेऊन आपल्या लहानग्या केरसुणीनें आपली खोलीच झाड, आतां गवळण होऊन व डोक्यावर चरवी घेऊन 'दूध घ्या व दूध' म्हणून ओरड, आतां बाहुलीला पायावर आडवी घालून 'माकडा माकडा, कान कर वांकडा' असं हेल काढीत म्हणून तिच्या कानांत तेल सोड, किंवा तिला पोटाशीं घेऊन 'पी' दे, अशी सारखी कोणाची ना कोणाची तरी नक्कल करण्यांत इंदूचा सर्व काळ जाई. भोंवतालच्या माणसांचीच ती नक्कल करीत असे असें नाहीं, तर घरांतील मांजराची किंवा पोपटाची सुद्धां त्यांच्यासारखें ओरडून ती नक्कल करीत असे. वास्तविक इंदूचा खेळ कोणता, नक्कल कोणती, आणि खरं वागणं कोणतं हेंच समजणें कठीण झालें होतें. बाकी या अशा नकला व खेळ खेळावेसे वाटतात म्हणूनच तर मुलांचें आयुष्य सुखाचें जातें. मोठ्या माणसांसारख्या फक्त व्यवहाराला जरूरीच्या तेवढ्याच गोष्टी करायच्या असें त्यांचें असतें तर त्यांचा निभावच लागता ना. शिवाय या खेळांच्या व अनुकरणाच्या निमित्तानें दुसऱ्या कितीतरी गोष्टी मुलें आपोआप करीत असतात. भोंवतालच्या माणसांचें बोलणें—चालणें वगैरे सर्व व्यवहार पाहून ठेवणें, ते ध्यानांत धरणें, ते बोलतील ते शब्द आत्मसात् करणें, त्यांच्यासारखा विचार करणें, त्यांच्यासारखें रागावणें—रुसणें वगैरे कितीतरी नवीन नवीन

गोष्टी या नकलांचे निमित्तानें मुलें शिकतात! निसर्गाची योजना कांहीं विलक्षण आहे खरी! आपल्याला मारे वाटत असतें कीं मुलें शिकतात तीं फक्त शाळेंतच; व शिक्षक हाच काय तो त्यांचा गुरु; पण हें खोटें आहे. मुलें आपल्या जन्मापासूनच, स्वतःच, रोजचे व्यवहार करीत असतांनाच, सर्व कांहीं शिकत असतात. परिस्थिति हीच त्यांची पहिली शाळा, परिस्थिति हाच त्यांचा पहिला गुरु, परिस्थिति हेंच त्यांचें पहिलें पुस्तक, आणि खरोखरचें वागणें आणि प्रत्यक्ष कृति हीच त्यांची पहिली शिक्षणपद्धति.

पुढें पुढें खेळांतलें खोटें काम सुटून इंदु आपल्या आईला आतां खरें खुरें काम करायाला लागे. कोणत्याहि कामाची पहिली तयारी करण्याचें चेल्याचें काम इंदूकडे असे. चहा करण्याचें किंवा भाजी चिरण्याचें अगर वेणीफणी करण्याचें मुख्य काम तिच्या आईचें. पण कपबश्या, पाट, फणी-करंडा, भाजीचें टोपलें वगैरे आणण्याचें व मांडण्याचें काम इंदूचें, अशी त्यांची आपआपसांत विभागणी झालेली दिसली. एकदां इंदु भाजीचें टोपलें डोक्यावर घेऊन माळणीप्रमाणें मुरडत व 'भाजी व्हावी का बाई भाजी' असें मोठ्यानें ओरडत तिची आई बसली होती तिकडे येण्यास निघाली. मीहि तितक्यांत बाजारांत जाण्याचे तयारीनें तेथें डोकावलों. इंदूचा तो प्रसन्न चेहरा, तें ओरडणें, तें ठुमकत चालणें वगैरे पाहून मला तिची गम्मत करण्याची लहर आली, व मी तिला वाटेंत अडवून एक मटकन् मुका घेतला! त्यावर ती उसळून म्हणते, "नाना, तुम्हांला अगदीं कसं समजत नाहीं हो, ? मी माळीण आहे." तिचें तें बोलणें ऐकून सौभाग्यवतीनें मजकडे साभिप्राय पाहिलें व आम्ही दोघेंहि मोठ्यांदा हसूं लागलों. मी बाजारांत निघालों, पण सबंध वाटभर तिच्या त्या एका वाक्यानें उत्पन्न झालेले विचार डोक्यांत घोळत होते. एकूण मुलांचेंहि तीं आपल्या कल्पनाविलासांत दंग असतांनाच, थोडाफार विचार करण्याचें काम चालूंच असतें. मी तिचा 'इंदु' म्हणून मुका घेण्यास हरकत नाहीं, पण ती माळीण झाली असतांना तिचा मुका घेणं म्हणजे भलतंच कांहींतरी! असें कां? याचें कारण तिला विचारशास्त्राचे पद्धतीनें सांगतां आलें नसतें; पण येवढें खास, कीं कोणत्या प्रसंगीं कसें वागायचें, काय बोलायचें वगैरेसंबंधीं मुलांचेहि कांहीं सामान्य आडाखे लहानपणापासूनच मनांत तयार होत असले पाहिजेत. विचाराचें काम सुरू होण्याला कल्पनेचा भर अगदीं ओसरलाच पाहिजे असें नाहीं.

एकाद्या काल्पनिक भूमिकेंत वावरत असतांनाच त्या भूमिकेला साजेसे आचार हातून होतांना डोक्यांत साजेसे विचारहि चालूंच असले पाहिजेत. मी इंदू-करितां बाजारांतून ताजे गुलाबजंमू घेऊन आलो, व तिला मोठा आनंद होईल या अपेक्षेनें द्रोण तिच्यापुढें ठेवला. तिनें तो घेतला, पण जरा वेळानें म्हणते कशी, " नाना मी आतां मोठी झालें, मला असला खाऊ नाहीं आवडत आतां. मला कांही खेळ किंवा चित्रांचीं पुस्तकें आणीत जा." 'आज झालें आहे काय या पोरीला? एकदम हिला हे विचार कसे सुचूं लागले?' असें तिच्या आईलाहि वाटल्यावांचून राहिलें नाहीं.

कांहीं दिवसांनंतरची गोष्ट. विनायकरावांनी, कांहीतरी विचारायचें म्हणून, 'तुझं नांव काय?' असें इंदूला विचारलें. दुसऱ्यांचें ऐकून ऐकून वाटतें, इंदूनेंहि 'इंदु नालायण आगाछे, लहानाल कलंपूल' असें तोंडपाठ उत्तर दिलें! नांवाची गाडी कदंबपुरालाच अडकून राहिली, पुढें तालुक्या अन् जिल्ह्यापर्यंत नाहीं घसरत गेली याचेंच समाधान मानून आम्हीं हसूं लागलों. 'तुझा बाप कोण?' म्हणून विनायकरावांनीं दुसरा प्रश्न केला. नुसतें नांव न सांगतां इंदूनें माझ्या मांडीवर थाप मारून 'हा पा माधा पाप' असं सांगितलं! आपलंच विचारणं चुकलं, पोरीकडे काय दोष? असं मानून तिला अडविण्याकरतां विनायकरावांनीं पुन्हा विचारलें, 'बाप म्हणजे ग कोण?' प्रसंग तर मोठा बांका आला! पोर सहीसलामत कशी सुटते व बापालाहि कसं सोडवते कोणास ठाऊक! कारण ती नुसत्या पोरीचीच परीक्षा नव्हती, बापाचीहि कसोटी होती! जरा अडल्यासारखें करून इंदु म्हणते, " घलांत आईच्याबलोबल नसतो का एक मोथ्था माणूस? तो बाप!" आम्हांला हसूं आवरेना. तें ऐकून सौभाग्यवतीहि बाहेर आली, व अर्थातच बापाची ही व्याख्या तिला कितपत पटते आहे हें पाहण्याकरितां मी तिच्याकडे पाहूं लागलों.

" बाप माणूस असतो इतकं जरी प्रत्येक मुलाला वाटलं तरी पुष्कळ झालं!" मी म्हणालों.

" पण तो नेहमीं आईच्याबरोबर असतो ही टीका कोणावर?" विनायक-रावांनीं डोळे मिचकावीत विचारलें.

" पण तो घरांत तरी असतो. इतर मुलांच्या बापांप्रमाणें नेहमीं बाहेर बाहेरच नसतो हें काय थोडं झालं?" चेष्टेला मीं चेष्टेनें उत्तर दिलें.

प्रसंग निघून गेला, पण आठवण व हसूं मात्र पुन्हा पुन्हा येतात.

आणखी कांहीं दिवसांपुढची गोष्ट—कोणाचें ऐकून व पाहून आली होती कोणास ठाऊक! संध्याकाळीं दिवे लागणीला स्वारी मोठाथोरला हेल काढून परवाचा म्हणायला बसली. " आठ एक आट, आठ दुनी थोला; आठ त्लिकं तेला, आठ चोक त्त्याहत्तल, आठ नवं बहात्तल, आठ धै ऐशी! मडम तुझी मावशी! थाएब तुझा काका! उंदील तुझा मामा! "

स्मरणशक्तीची गाडी आठाच्या रुळांवरून घसरून टक्के खात खात उंदीर-मामावर जाऊन हपटावी याचें मला फार आश्चर्य वाटलें! पहिले दोन डबे धड, शेवटले दोन धड, अन् ऐशीवरून मावशीवर जाण्याचा व त्यापुढचा प्रकार तर फारच अजब! कोणी न शिकवितां या गोष्टी मुलांच्या कशा लक्षांत राहतात? अन् आम्ही आतां मोरे गोकुळासारख्या पदराला गांठी मारमारून पुन्हा कोणती गांठ कशाची हें विसरतोंच! लहानपणांतील निरीक्षण, लहान-पणच्या कल्पना, लहानपणची धारणाशक्ति, लहानपणचे विचार, सर्वच कांहीं और आहे!



इंदूला नुसतें तोंडच सुटलें होतें असें नाहीं, तर तोंडाबरोबरच पायहि फुटले होते. जणूं कांहीं यापूर्वीच्या बैठया बंदिस्त स्थितीचा तिला अगदीं तिटकारा आला होता! उठल्यापासून निजेपर्यंत ती कधीं एका ठिकाणीं स्थिर बसली आहे असें होत नसे. आजारीपण येवढा एकच अपवाद. स्वयंपाकघरांतून माजघरांत, माजघरांतून ओटीवर, ओटीवरून माझे बैठकीचे खोलींत, कधीं कधीं तर माळ्यावर; व सगळें घर संपलें कीं अंगण, लाकडाची खोली, परसूं अशी वणवण सारखी चाललेली असायची! या भटकंतीला जशी स्थलाची मर्यादा नसे तशी कालाचीहि नसे. सकाळ, दुपार, संध्याकाळ सगळ्या वेळा बिचारीला सारख्याच! एकादे वेळीं तर रात्रींहि झोंपेंतून उठून मिटल्या डोळ्यांनीं कुठें तरी तुरतुर चालूं लागे. पायांप्रमाणेंच नजरहि कधीं स्वस्थ नसे. पानें, फुलें, पक्षी, प्राणी, रस्त्यांवरून जाणारीं-येणारीं माणसें, गाड्या अन् यांपैकीं कांहींच नसेल तेव्हां घरांतल्याच वस्तु टेहळीत राहून स्वारी पाहिलेल्या गोष्टींचें जणूं टांचण करीत असायची! चष्मा, किल्ल्या, अडकित्ता अशा कितीतरी वस्तु आम्ही नेहमीं कुठेंतरी विसरायच्या; आणि त्या सापडेनाश्या होऊन इंदूला सांगण्याचा अवकाश, कीं ती कुठेंतरी जाई आणि हरवलेली वस्तु ताबडतोब घेऊन येई! या वणवण फिरण्यानें तिला चांगला व्यायाम मिळून भूकहि कशी वखवखून लागत असे.

हें सर्व ठीक होतें; पण अनोळख्या व नवीन नवीन परिस्थितींत ती जसजशी वावरूं लागली, तसतशी भीतीची भावना तिचे मनांत नवीनच उत्पन्न होऊं लागली. आतांपर्यंत तिला कशाचीच भीति वाटत नसे. मांजर, कुत्रें, गाय वगैरेंना ती बेलाशक हात लावीत असे. ती तासन्‌तास अंधेरांत एकटी खुशाल पडून राहात असे. नाहीं म्हणायला धाडकन् पडण्याचा, किंवा गडगडण्याचा किंवा मोटारच्या पोंग्याचा एकादा आवाज एकदम झाला म्हणजे मात्र ती जरा कावरीबावरी होऊन व अंग चोरून घेऊन रडायाला लागे. सुरुवातीचा हा निर्भयपणा हल्लीं हल्लीं नाहींसा होऊन ती पूर्वीं ज्या गोष्टींना मुळींसुद्धां भीत नसे त्यांनाच ती भिऊं लागली होती. आतां ती काळोखांत पूर्वीप्रमाणें एकटी जात नसे. रात्रभर दिवा जळत ठेवल्याशिवाय तिला झोंप येईना. घरांतल्या भाटीला एक काळें पिलूं झालें त्यालाच ती भिऊं लागली! स्वतःच्या सावली-

लाहि ती भीत असे. कुत्र्यां-मांजरांशींहि ती आतां वचकून वागत असे. या पाहुण्या भीतीचें कारण मागाहून आमच्या लक्षांत आलें. मध्यंतरीं कांहीं दिवस आम्ही एक मुलगी इंदूला हिंडवायला व खेळवायला ठेविली होती; आणि ती स्वतः अत्यंत भित्री असल्यामुळें तिच्या संसर्गानें या नवीन नवीन भीति इंदूला जडल्या होत्या. ती मुलगी कामावरून गेली, पण तिनें आणलेला भित्रेपणा मात्र मागें मालक म्हणून पुष्कळ दिवस राहिला. स्थिर सावल्यांची भीति नाहींशी झाली तरी हलत्या वळवळणाऱ्या गोष्टींची भीति तशीच राहिली. रात्रीं रस्त्यावरून गाड्याघोडीं धांवत जात त्यांच्या सावल्या भिंतीवर पडल्या म्हणजे इंदु भिऊं लागे. हाताच्या निरनिराळ्या सावल्या तिच्यादेखत भिंतीवर पाडून मी तिची ती भीति कांहीं दिवसांनीं घालविली ती गोष्ट निराळी. दाबली म्हणजे आवाज करणारी एक रबरी बाहुली मीं इंदूकरितां आणिली होती; पण तिच्या आवाजाचीच इंदूला भीति वाटे. मग जेव्हां मीं तिच्याच हातानें तो आवाज बरेच वेळां करून घेतला तेव्हां तिची ती भीति नाहींशी झाली. येवढेंच नव्हे तर उलट तीच मला त्या आवाजानें भिववूं लागली! मुलगी भिते म्हणून मीच ती बाहुली दूर टाकून दिली असती तर तिची ती भीति तशीच राहिली असती.

लहान मुलांच्या पुष्कळश्या भीति, मला वाटतें, मोठ्या माणसांच्या भित्रेपणामुळें, किंवा वस्तूच्या नवथरपणामुळें अगर तिचें खरें कारण न समजून मुलें स्वतःच्या मनानेंच तिचें जें कांहीं काल्पनिक कारण बसवीत असतात त्यामुळें, उत्पन्न झालेल्या असतात. इंदु एकदां परसांतल्या शिडीवर चढत चढत कितीतरी उंच गेली. तें पाहून तिची आई ओरडणार तों मी तिच्या तोंडावर जोरानें हात ठेवून तिला ओरडूं दिलें नाहीं.

"पोर पडली असती म्हणजे?" इंदु खालीं आल्यावर सौभाग्यवतीनें विचारलें. "तोंड दाबलें म्हणून ती वांचली." मीं उत्तर दिलें. मी पुढें म्हणालों, "आज कितीतरी दिवस ती शिडीवरून चढते-उतरते आहे, आणि पुरुष पुरुष, उंचीवरून उड्या मारते आहे; पण तूं जर का ओरडली असतीस तर मात्र ती घाबरून पडली असती, अन् तिनं कायमचा धसका घेतला असता खास! इतके दिवस तुला सांगितलं नव्हतं पण आतां सांगतों. परवां परसांतल्या वेलाखालीं एक किरडूं पडलं होतं. इंदु फूल तोडायला म्हणून गेली, ती नेमकी त्या किरडापाशीं जाऊन उभी राहिली! फूल तोडून ती स्वस्थपणें

दूर सरल्यावर मीं तें किरडू तिच्याच देखत दगडानं मारून टाकलं, व तें कां मारलं हें तिला समजावून सांगितलं. सगळं कसं शांतपणं आटोपलं. मीच ओरडलों असतों तर ती घाबरून कदाचित् तिचा पायहि त्याचेवर पडला असता; आणि जें होऊं नये म्हणून आपण ओरडणार तें त्या ओरडण्यानेंच नेमकें झालें असतें "! झालेली फजिती कशीतरी सांवरून घेण्याकरितां "हें कोण रसेलच का सांगतो?" असा टोमणा देत सौभाग्यवती निघून गेली.

स्वतःच्या फाजील भित्रेपणानें जशी आपण मुलांत भीति उत्पन्न करतों तसें फाजील धीटपणा उत्पन्न करण्याच्या भरीला पडूनहि आपण मुलांना भित्रीं करतों. एकदां आमच्या बोकोबानें एक उंदीर अर्धवट खाऊन दारापुढें टाकून दिला. इंदूची भीति घालविण्याकरितां म्हणून मीं तिला तो उचलून टाकण्याचा आग्रह केला व ती ऐकेना तेव्हां जरा जबरीनेंच तिचेकडून शेपटीला धरून उचलून टाकविला! मला वाटलें या माझ्या करण्यानें तिची भीति गेली असेल; पण बाहेरच्या सक्तीनें मनांतील भीति कशी जाणार? इंदूला बरेच दिवस नुसत्या उंदाराचीच नव्हे तर त्याच्या शेपटीसारख्या कोणत्याहि पदार्थाची इतकी कांहीं दशहत बसली होती, कीं ती आईला आपल्या लहानग्या केसांची वेणीहि घालून देत नसे. आणि तिनें ती घातलीच तर इंदु चुकून सुद्धां वेणीला हात लावीत नसे. मागाहून कितीतरी दिवसांनीं हें आमचे लक्षांत आलें!

---

आरोग्याच्या दृष्टीनें व शिक्षणाच्या दृष्टीनें काय काय करावयास पाहिजे यासंबंधीं आमचे विचार चालू असतांच इंदूला योग्य वळण कसें लावावें हाहि विचार आम्हांपुढें दत्त म्हणून उभा असे. इंदु जसजशी मोठी होऊं लागली, तसतशी तिची आई तिच्याविरुद्ध सारख्या कांहीं ना कांहीं कागाळ्या आणीत असे. आज काय इंदु जाऊं नको म्हटलं असतां गेली, आज काय इंदु खोटं बोलली, आज काय इंदूनं जेवतांना हवरेपणा दाखविला, आज काय तिनं शेजारच्या मुलीला आपली बाहुली दिली नाहीं, आज काय तिनं उद्धटपणाचं उत्तरच दिलं, आज काय ती मोलकरणीचे अंगावरच ओरडली, अशी कांहीं ना कांहीं तिच्या आईची रोजची कुरकुर असे. या गोष्टी कश्या सुधारावयाच्या याचा विचार करतांना मीं 'शील', 'नैतिक शिक्षण' वगैरे प्रश्नांवर लिहिलेलीं पुस्तकें चाळून पाहिलीं, आणि सगळ्या पुस्तकांचें सार म्हणून पुढील ४-५ गोष्टी करण्याचें ठरविलें. शक्य तों इंदूला अमुक एक गोष्ट करूं नकोस म्हणून म्हणायचें नाहीं. किंवा तिला सारखें दाबायचें नाहीं. मूल खोटें बोलत असेल, किंवा चोरून खात असेल, किंवा उद्धटपणानें दुरुत्तर करीत असेल तर नुसतें खोटें बोलूं नकोस, किंवा चोरून खाऊं नकोस, अथवा तोंड टाकून बोलूं नकोस येवढें सांगून काय उपयोग ? तें तुमच्या भीतीनें तेवढ्यापुरतें तसें करणार नाहीं; पण तेवढ्यावरूनच तें कायमचें सुधारलें असें समजणें भाबडेपणाचें होईल. इंदूनें एकदां एक आरसा फोडला. ( वास्तविक तो तिचे हातून पडून फुटला असें म्हणणेंच जास्त योग्य होईल. ) तिनें तसें सांगितलें असतांहि मी तिला रागें भरलों. पुढें एके दिवशीं तिनेंच शाई सांडली असतांना ती चक्क 'मी सांडली नाहीं' असें खोटें बोलली. खरें बोलून जर बोलणीं खावीं लागतात, तर खोटें बोलून निसटून जाण्याचा प्रयत्न कोणता शहाणा मनुष्य करणार नाहीं ? इंदूला एकदां बरणींतील गुलकंद कसा लागतो तें पहावेंसें वाटलें. तिच्या आईनें तो तिला घेऊं दिला नाहीं. जरा वेळानें आई जवळ नाहीं असें पाहून इंदूनें नेमकी बरणी काढून त्यांतील गुलकंद चाखून पाहिला. मीं हें पाहिलें होतें, पण बोलणार कोणत्या तोंडानें ? मोकळेपणानें मागून जर खायला मिळत नाहीं तर चोरून खावेंसें वाटणारच. तोंड टाकून बोलण्यासंबंधींहि तसेंच. आम्हीच जर

मोलकरणीला वेळीं अवेळीं तोंड टाकून बोलणार तर बिचाऱ्या पोरीनेंच काय पाप केलें आहे? 'पूज्य' माता-पितरांप्रमाणें आपणहि बोलावें असें तिच्या बालमनास वाटलें असल्यास त्यांत तिचा काय अपराध? इंदूच्या आईला मी या गोष्टी समजावून देऊं लागलों म्हणजे त्या तिला आवडायच्या नाहींत; पण मी तसाच तिला पुढें सांगे, कीं जेव्हां मुलं वाईट वागतात तेव्हां मुलांचं काय चुकलं तें पाहून सुधारण्याचा प्रयत्न करण्यापूर्वी आपलं स्वतःचं कांहीं चुकतं आहे कीं काय हें पाहणं जास्त न्यायाचं होईल. ही समजूत एकदां पक्की झाल्याबरोबर इंदूनें कांहीं अपराध केला, कीं तिला शिक्षा करण्यापूर्वी आम्ही आत्मसंशोधन करून प्रथम स्वतःला सुधारण्याचा प्रयत्न करूं. अर्थात् आम्हांला तिला कधींच नको म्हणावें किंवा दाबावें लागलें नाहीं असें नाहीं. आम्हांलाहि कधीं कधीं 'नको'चा उपयोग करावा लागे; पण तो आम्ही अतिशय जपून व दुसऱ्या कशानें भागत नाहीं असें पाहून करीत असूं. एक दिवस माझें व माझ्या वरिष्ठाचें भांडण झालें. त्याच्या एका गोष्टीची मला चीड आली होती; पण तसें त्याला स्पष्ट सांगायचा धीर कांहीं मला झाला नाहीं. मी तसाच रागारागानें घरीं गेलों. इंदु आपल्या नेहमींच्या पद्धतीनें उड्या मारीत व तालावर नाचत माझें स्वागत करावयास आली. मी त्या वेळीं तिच्या अंगावर खूप खेकसून ओरडलों, व पुनः उड्या मारशील तर तंगड मोडून टाकीन असें कांहींतरी म्हणालों. सौभाग्यवतीनं आंतून ओळखलंन् कीं अधिकाऱ्यावरचा राग पोरीवर निघतो आहे! आणि पुष्कळ वेळां आपणां सर्वांचं असंच नाहीं कां होत, कीं घरीं बायकांपोरांवर जो आपण अधिकार गाजवूं पाहतों त्याचें खरें कारण बाहेर जो अधिकार आपल्यावर गाजलेला असतो तें असतें?

एकदां इंदूनं वाटतं तिच्या आईला विचारलं आतां हें पोलकं कां घालायचं नाहीं? तिला त्याचें समाधानकारक उत्तर देतां येईना तेव्हां ती चिडून म्हणते कशी 'बस्, मी सांगतें म्हणून!' अहाहा! काय पण उत्तर! तिचें तें हडेलहप्पीपणाचें उत्तर ऐकून इंदूहि चिरचिर करीत निघून गेली. पुष्कळ वेळां मुलं जीं नेहमीं चिरचिर करतात व सारखीं धुसफुसत असतात त्याचं कारण आपणच असतों. आम्हीं तरी आतां असा नियम केला आहे, कीं आपल्या वागणुकीनें इंदूला नेहमीं सुखांत व आनंदांत ठेवायची. तिच्यावर असल्या धुसफुसण्याचा प्रसंग शक्य तोंवर आणायचा

नाहीं. निदान लग्न होईतों तरी आणायचा नाहीं. लग्न झाल्यावर ती आणि तिचं नशीब !

आम्हीं जी दुसरी गोष्ट करावयाची ठरविली ती म्हणजे, 'इंदू, तूं अमुक एक कर' असें हुकुमासारखें सांगायचें नाहीं. कोणालाहि काय, 'कर' असें दरडावून सांगितलें, कीं क्रिया प्रतिक्रियान्यायानें 'हुकूम करता काय ? मग नाहींच करीत', 'अडलय माझं खेटर ! मी कांहीं तुझा नोकर नाहीं', अशासारखें उलट म्हणावेंसें वाटतें. मनाची ही प्रवृत्ति न्यूटनच्या गुरुत्वाकर्षणाइतकी खरी असून ऐन्स्टाईनचा सापेक्षतावाद एक वेळ खोटा ठरेल, पण ती खोटी ठरणार नाहीं. मनुष्यानें वरून नम्रता कितीहि धारण केली तरी ती वरवरचीच असून त्याचा अहंभाव खालीं खोल दबा धरून बसलेला असतो, आणि आपण हुकूम करून त्याला डिवचण्याचा अवकाश, कीं तो अहंभाव पेटाऱ्यांत कोंबलेल्या एकाद्या सापासारखा फुस्स् करून डोकें वर काढतो. आणि म्हणून 'इंदे, पाणी आण' असें हक्कानें न सांगतां मी तिला 'इंदु, तहान लागली आहे ग' असं सौम्य पणानं सुचविण्याची स्वतःला संवय लावून घेतली होती. मुलांचें प्रेम व विश्वास संपादन केलेला असला म्हणजे हुकमानें जे कार्य होणार नाहीं तें नुसत्या सूचनेनें होतें असें मीं इंदूच्या आईस कितीतरी वेळां दाखवून दिलें आहे. आम्हीं या सूचनेच्या युक्तीनें व गोडीगुलाबीनें इतकीं कांही कामें इंदूकडून करवून घेतलीं आहेत, कीं आमच्या या लुच्चेपणाची आमची आम्हांलाच एकादे वेळीं अगदीं लाज वाटते. तिनें नियमानें व आनंदानें शाळेंत जावें म्हणून तिच्या शाळेंत जाण्याचा जसा कांहीं आम्हांला अगदीं हेवा वाटतो आहे असें आम्हीं दाखवावें, व घरीं राहण्याचा तिला जितका जास्त आग्रह करावा तितकी तिनें शाळेंत जाण्याबद्दल जास्तच उत्सुकता दाखवावी ! आम्ही ती घरीं आल्याबरोबर तिच्या शाळेंतील कामगिरीबद्दल विचारपूस करतों; 'काय काय खेळलांत ? मास्तरांनीं कोणत्या गोष्टी सांगितल्या ?' असें जेव्हां आम्ही आस्थापूर्वक चौकशी करतों तेव्हां तिलाहि 'आपण म्हणजे कोणीतरी क्षुद्र व उपेक्षणीय नसून जरा महत्त्वाची व बडी व्यक्ति आहों' असें वाटून स्वतःबद्दल जरा फुशारकी वाटूं लागते व ती आपलें काम जास्तच जोमानें आणि उत्साहानें करूं लागते. अंकगणित, शुद्धलेखन, भूगोल वगैरे एरवीं अगदीं रूक्ष वाटणाऱ्या कितीतरी विषयांची आम्हीं तिला आमच्या या युक्तीनें गोडी लावून दिली आहे.

इंदूला पेटी शिकविण्याचे बाबतींत तर आमची ही युक्ति फारच सफल

झाली आहे 'जा आतां प्रॅक्टिस कर, पेटी सुखासुखी येणार नाहीं.' असं मूर्खासारखं आम्हीं तिला कधींहि सांगितलं नाहीं. कारण असें सांगणें म्हणजे पेटी वाजविणें किती त्रासाचें व कष्टाचें आहे, तें साध्य करायचें म्हणजे मेहनत ही केलीच पाहिजे, असा अप्रत्यक्ष कबुलीजबाब देऊन माणसाला परावृत्त करण्यासारखें आहे. आम्हीं अगदीं उलट केलें. एक छानशी पेटी विकत आणिली आणि ती तिच्या खोलींत ठेविली. ही पेटी तुझ्याकरतां आणिली आहे, तुला ती शिकायची आहे असें प्रत्यक्षतः कांहीं एक न म्हणतां आम्हीच त्या पेटीशीं जरा इकडे तिकडे करूं लागलों. नंतर एक दिवस एका चांगल्या पेटी वाजविणाऱ्या माणसाला चहाचे निमित्तानें घरीं बोलावून त्याचे-कडून इंदूला आवडतील अशीं सोपीं सोपीं पदें वाजवून घेतलीं; व ती ऐकतांना खूप आनंद झालासा दाखविला. या सर्वांचा अपेक्षित परिणाम होऊन इंदूनें दुसरेच दिवशीं पेटी वाजविण्याची परवानगी घेतली व आदल्या दिवशीच्या वाजविणाऱ्याच्या ऐटीनें ती वाजवूं लागली. ऐट आली; पण सूर येईनात! हें पाहून तिनें होऊनच शिकवणी ठेवण्यासंबंधीं गोष्ट काढली. पेटीमास्तरला आम्हीं सक्त ताकीद दिली होती, कीं पहिल्यापहिल्यांदा त्यानें प्रथम थोडा वेळ स्वतः निरनिराळीं पदें वाजवून दाखवून इंदूचे मनांत आवड उत्पन्न करायची व राहिलेल्या वेळांत बोटांची जरूर ती कसरत करून घ्यायची. थोडेच दिवसांत आमची इंदु एकेक पद वाजवूं लागली, आणि तें ऐकून आम्ही उभयतां इतके खूष होत असूं, कीं जणूं आम्ही गोविंदराव टेंब्यांचीच पेटी ऐकत आहों! आमचा तो आनंद पाहून तिलाहि आनंद होई, व 'अरेच्या, आपल्याला लागली कीं पेटी यायला' असें तिला वाटूं लागून ती जास्त जास्त हुरुपानें शिके. समोरच्या विनायकरावांची मुलगी पेटी वाजवूं लागली, कीं मी कांहीं ना कांहीं काम काढून बाहेर जात असें. तसाच प्रसंग बिचाऱ्या विनायकरावांवर इंदूच्या वाजविण्यानें येतो कीं काय अशी मला सारखी धास्ती वाटे. पण तसें कांहीं एक न होतां इंदु पेटी वाजवायला बसली म्हणजे विनायकराव दूर पळून न जातां जवळ धावत येत.

पेटी शिकविण्याचे बाबतींत जो अनुभव आला तोच मला तिला पोहणें शिकवितांना आला. पुष्कळसे आईबाप मुलांना पोहणें शिकवितांना फाजील काळजी घेऊन त्यांना विनाकारण भेडसावतात, किंवा त्यांची भीति मारणे-करितां म्हणून एकदम ढकलून देणें, मुद्दामच डुबी देणें वगैरे अघोरी

प्रकार करून पोहण्याबद्दल कायमची दहशत बसवितात. पण दोहोंचाहि परिणाम एकच्च होतो. पोहण्याबद्दल आवड उत्पन्न होण्याऐवजीं कायमचा तिटकारा मात्र उत्पन्न होतो. आम्हीं एक निराळीच युक्ति योजिली. वास्तविक पोहायला काढायचें होतें तिला, पण निघालों आम्ही. 'तूं नको येऊं अं' असंहि मीं मिस्किलपणें एकदोनदां म्हटलें. ती अर्थातच ऐकेना. तेव्हां तिची चड्डी व टुवाल घेऊन आम्ही सर्वजण नदीवर निघालों. पाणी पाहिल्याबरोबर पोर स्वाभाविकपणेंच्च थोडीशी भ्याली व कांठावरच्च वाळूंत खेळूं लागली. आम्ही मुद्दामच मोठमोठ्यांदा खिदळत पाण्यांत खेळूं लागलों. दुसरे दिवशीं आम्ही कांठाकांठानेंच तिच्याशीं पाण्याची मारामारी करूं लागलों. ती पाण्यांत येऊन पाणी उडवूं लागली. तिसरे दिवशीं आम्ही स्वतः भोपळा बांधून खेळूं लागलों. आमचें पाहून तीहि भोपळा बांधून पाण्यांत उतरली. असें करतां करतां तिला न कळत आम्हीं तिला पाण्यांत ओढली. पहिल्या खेपेसच्च सर्व गोष्टी शिकविण्याची धिसाडघाई आम्हीं केली नाहीं. शिकलेल्या गोष्टी पचून व मुरून आत्मसात् होण्याला दुसरा उन्हाळा उजाडावा लागला. त्या वेळीं मात्र ती स्वयंस्फूर्तीनें पोहूं लागली, आणि तिसऱ्या उन्हाळ्यांत तर तिनें निरनिराळ्या प्रकारच्या उलट्या-सुलट्या उड्या घेऊन व उभे-आडवे हात मारून व कधीं-कधीं तर मुळींच हात न मारतां संथ पडून आपल्या बापाला खालीं पाहायास लाविलें. या सर्व अनुभवांनीं मला एक गोष्ट पटली, व ती म्हणजे जी गोष्ट इंदूला यावी असें आम्हांला वाटे ती नुसती तोंडानें सांगून तिला येणें शक्य नव्हतें; ती आम्हां स्वतःला प्रथम करावी लागे. **भाराभर सांगण्यापेक्षां थोडक्याश्या कृतीचें महत्त्व किती आहे याचा प्रत्यय** प्रथम मला माझ्या मुलीनें आणून दिला.

प्रत्यक्ष उदाहरणाचा फार मोठा परिणाम होतो यांत शंका नाहीं. स्वतःची कृति असली म्हणजे तुमचे ते नियम नि कायदे वगैरेची कांहीं जरूरी लागत नाहीं. ज्या घरांत नियम कमी तें घर जास्त चांगलें व नीतिमान् असें मी म्हणेन. जी गोष्ट घरासंबंधींची, तीच शाळेची. कायदेकानू, शिक्षा, हुकूम—थोडक्यांत म्हणजे ज्याला जुने लोक शिस्त म्हणतात, ती मुळींसुद्धां नसतांना व पूर्ण स्वातंत्र्य दिलें असतांना कितीतरी घरांतून किंवा शाळांतून मुलें चांगल्या गुण्यागोविंदानें व आपआपली जबाबदारी ओळखून वागतांना दृष्टीस पडतात. स्वातंत्र्याचा दुरुपयोग होईल, पण त्याला कारण आपण पालकच्च असतों. जे

नियम मुलांनीं पाळावेत अशी अपेक्षा आपण करितों ते नियम आपण स्वतःच मोडीत असतों! आपण मुलांना खाण्यापिण्याचे बाबतींत परिमितता शिकवितों, आणि स्वतःच ओकारी येईतों खातपीत असतों! इकडे मुलांना गुण्यागोविंदानें नांदण्यास शिकवीत असतों आणि इकडे त्यांच्याच देखत नवराबायको भांडत असतों! सिनेमाला जाऊं नये असें सांगत असतों व स्वतःच चोरून शेवटचा 'शो' पाहून येतो! मुलांनीं नेहमींच लौकर आणि अगदीं गाढ कसें निजावें? केव्हां ना केव्हां तरी आपण घरीं नसल्याचें त्यांचे नजरेस येणारच. आपण स्वतः त्यांचे अंगावर मोठ्यानें खेकसूनच त्यांना हळू बोलायला सांगत असतों! आणि उद्धटपणानेंच नम्रता शिकवीत असतों. या बाबतींत तुला माझं ऐकलंच पाहिजे असें म्हणतच लोकांचें ऐकून घ्यावें असें त्यांचे मनावर बिंबवीत असतों. अश्या एक का दोन—हजारों गोष्टी सांगतां येतील. **मुलें वागतात तें आपण सांगतों त्याप्रमाणें नव्हे—तर आपण वागतों त्याप्रमाणें.** ही गोष्ट इतकी खरी आहे, कीं एकाद्या घरांतील मोठीं माणसें कशीं आहेत हें पाहायचें असल्यास तेथील मुलें पाहावीं म्हणजे काम झालें.

कोणतीहि गोष्ट मुलांना शिकवायची म्हणजे ती स्वतः केली पाहिजे असें जर असेल तर तें मोठें कठीण आहे. मोठ्या माणसांना सगळ्याच— निदान बऱ्याचश्या—गोष्टी नवीन शिकाव्या लागतील असें नाहीं का? हो, अगदीं तसेंच. मुलांचें शिक्षण करणें म्हणजे स्वतःचेंच सर्व शिक्षण पुनः करण्यासारखें आहे; आणि तेंहि आपलीं मुलें आपल्याला करायला लावीत असल्यामुळें तीं आपले शिक्षक होत यांतहि संशय नाहीं.

माझ्या वाचनानें आणखी एक गोष्ट मला विशेष पटली ती ही, कीं मुलांच्या सर्व सहजप्रवृत्तींना इष्ट तें वळण लावूनच त्यांचा त्यांचें व्यक्तिमत्त्व सुधारण्याचे कामीं फायदा करून घ्यावयाचा. कोणतीहि प्रवृत्ति मूलतः वाईट नाहीं व म्हणून ती अजिबात मारून टाकणें इष्ट नाहीं—शक्यहि नाहीं. जें जें हातीं लागेल तें तें सांठवून ठेवण्याचा इंदूला इतका कांहीं हव्यास होता, कीं तिची छोटी ट्रंक म्हणजे एक वस्तुसंग्रहालयच झाली होती. त्यांत पेन्सिलीचे तुकडे, झुंबराचीं भिंगें, पोतीचे मणी, पोस्टाचीं तिकिटें, शिंपा, काड्याच्या पेट्यांवरील लेबलें, रंगीबेरंगी कापडाच्या धांदरोट्या, कचाकड्याच्या बाहुल्या—अश्या हजारों वस्तु भरलेल्या असत. अन् मजा अशी, कीं ती कधींहि आपल्या ट्रंकेला विसंबत नसे. घरांतील सर्व माणसें चोर आहेत व तीं तिच्या भांडारावर डल्ला मारायला अगदीं

टपलीं आहेत अशा भावनेनें ती रात्रीं निजतानांहि आपली ट्रंक उशाला ठेवून निजे, व सकाळीं उठल्यावर एकदां उघडून पाही ! मग तींतली एकादी वस्तु स्वतःच्या हातानें उचलून दुसऱ्याला देण्याची गोष्ट तर दूरच राहिली. ती निरनिराळ्या वस्तु जमवून जपून ठेवीत असे हें ठीक होतें. कारण पुढील संसारांत ही संग्राहकता तिला उपयोगीच पडणारी होती. पण त्या जपून ठेवण्याला हें जें अप्पलपोटेपणाचें व अविश्वासाचें रूप प्राप्त होऊं पाहत होतें तें नको होतें आणि म्हणून आम्हीं एक युक्ति केली. घरांत कांहींहि आणलें, कीं त्यांत आम्हा उभयतांचे बरोबरीनें तिचाहि एक हिस्सा करायचा. हें अमक्या एकाचं त्याला दुसऱ्यानें हात लावायचा नाहीं असलें धोरण बदलून त्याचेऐवजीं सर्वच गोष्टी सर्वांच्या समाइक मालकीच्या असलें धोरण रूढ केलें. तिच्या कांहीं वस्तु उघड्यावर पडत त्या तशा पडूं न देतां त्या आमच्याच कपाटांतून ठेवीत असूं व कांहीं कांहीं वेळां कपाटाच्या किल्लयाहि तिचे स्वाधीन करीत असूं. या युक्तीचा योग्य तो उपयोग होऊन तिला आतां घरांतल्या घरात एक प्रकारची सुरक्षितता वाटूं लागली, व तिचा तो पूर्वीचा अविश्वास नाहींसा होऊन ती आपल्या वस्तु आतां आम्हां 'तिऱ्हाइतांचे' स्वाधीन करूं लागली. आम्ही आपल्या वस्तु तिला देतों म्हणून तीहि आपल्या वस्तु आम्हांस देऊं लागली.

पैशाची किंमत कळूं लागल्यापासून ते साठविण्याकडे तिचें लक्ष गेलें, व कधीं कधीं खिसे चापसण्याची किंवा टेबलाचीं पुडें उघडून त्यांत कांहीं पै-पैसा सांपडल्यास पाहण्याचा मोहहि तिला होई. तिची ही खोड घालविण्याकरितां आम्हीं जर पैसे कुलपांतच ठेवण्याचें ठरविलें असतें तर माझी खात्री आहे, कीं तिच्या प्रवृत्तीचा जोर होऊन तिची कुलुपें फोडण्यापर्यंतहि पाळी गेली असती. प्रत्येकाच्या आयुष्यांतील हीच वेळ खिसेकापू चोर, दरोडेखोर वगैरे होण्याची असते, आणि म्हणून ती टाळणें अत्यंत जरूरीचें असतें. इंदूला पैसे हवेसे वाटतात असें पाहून आम्हीं आपण होऊनच तिला रोज एक पैसा देण्याचें ठरविलें, मात्र तिनें रोजचीं सर्व कामें बिनबोभाट केलीं पाहिजेत. महिन्याचे अखेरीस साडेसात आण्याचा गल्ला जमविल्यावर ती त्याचें काय करते यासंबंधीं आमचे तर्कवितर्क चालले होते. तिची आई म्हणे, रोजचा पैसा रोज हरवून जाऊन महिनाअखेर कांहीं शिल्लकच उरणार नाहीं. मी म्हणें, तें कांहीं नाहीं, ती ते मला सोन्याचें घड्याळ आणण्याकरितां म्हणून देणार; आणि तेंच शेवटीं खरें ठरलें. कारण शेजारच्या विनायकरावांप्रमाणें

माझेहि हातांत सोन्याचें घड्याळ असावें असें तिला वाटत असल्याचें मला माहीत होतें. आणि घड्याळ घेऊन पैसे उरलेच तर शेजारच्या लक्ष्मीबाईप्रमाणें आईलाहि हिऱ्याचीं कुडीं घेऊन देण्याचा तिचा विचार असावा !

आम्ही तिला पैसे देत असूं किंवा दिलेल्या पैशाचा मोबदला म्हणून तिच्याकडून कांहीं-कांहीं गोष्टी करवून घेत असूं हें पुष्कळांना आवडत नसे. पैशाचे मिषानें चांगल्या गोष्टी करून घेणें, किंवा वेदान्ताच्या भाषेंत बोलायचें म्हणजे फलाच्या आकांक्षेनें कर्म करणें हें या कर्मयोग्यांचे मतें अनुचित अतएव त्याज्य असें होतें. हल्लींच्या प्रमुख शिक्षणशास्त्रज्ञ मॉंटेसरीबाईहि असल्या बक्षिसें-बिक्षिसें देण्याच्या पद्धतीविरुद्ध असून करायचें कामच इतकें चांगले असावें व तें करण्याची क्रियाहि इतकी आनंददायी असावी, कीं दुसरें कांहीं बक्षिस मिळालें नाहीं तरी काम करण्यांतच सुख व्हावे असें त्यांचें म्हणणें. उच्च भूमिकेवरून पाहतां हें खरेंहि आहे; परंतु मला माझ्या इंदूच्या बाबतींत तरी असा अनुभव आला, कीं तिला कांहीं देऊं केल्याशिवाय कांहीं ती कोणतीहि गोष्ट सहसा करीत नसे. कांहीं चीजवस्तूच द्यावी लागते असें नाहीं; तर नुसती शाबासकी, संमतिदर्शक मान हालविणें, प्रसंगविशेषीं तिच्या सत्कृत्याचा चारचौघांत उल्लेख करणें, निदान दिवसां केलेल्या चांगल्या गोष्टींची मला जाणीव आहे असें दर्शविणारा रात्रीं निजतांनाचा पापा—प्रकार कोणताहि असेना, पण तिला बक्षिस हें लागतेंच लागतें; आणि मला वाटतें तें न देण्यांतहि कांहीं अर्थ नाहीं. आपणां मोठ्या माणसांच्या सर्व कृतिहि कोणत्या ना कोणत्या मोबदल्याकरितांच नसतात काय? मोबदला ऐहिक नसला तर पारमार्थिक तरी असतोच.

पैसे देऊं केल्यानें माणसांत व्यापारीवृत्ति उत्पन्न होते हें कांहीं खोटें नाहीं. पण प्रथम प्रथम तरी ती तशी असायचीच. मनुष्यप्राणीच एका अर्थानें अपूर्ण व सापेक्ष आहे. मग त्याची कृति तरी निरपेक्ष असावी अशी अपेक्षा आपण कां करावी? एकादशी, शिवरात्र, रामनवमी, वगैरेसारख्या प्रसंगीं देवापुढें ठेवायचे पैसे किंवा दारावरून जाणाऱ्या आंधळ्याला द्यावयाचा पैसा ती आमचेपासून मागून न घेतां स्वतःच्या कमाईच्या पैशांतून घेत असे.

एकदां बाजारांतून तुला काय हवें तें आण असें सांगितल्याबरोबर तिनें एक बर्फाची—वर लाल सरबत घातलेली—काडी व आईप्रमाणें डाव्या हातांतल्या सोनेरी बांगडींत अडकवण्यासाठीं सेफ्टी पिना आणल्या ! पिना सेफ्टी असल्या

तरी तिच्या आईला त्या टोंचायच्या त्या टोंचल्याच! मी स्वतःचें नशीब समजतों, कीं माझें पाहून तिनें एक सेफ्टी रेझर आणिला नाहींन्! तिनें एकादी वस्तु मागितली आणि आम्ही तीं महागाईच्या सबबीवर आणण्याचें नाकारलें म्हणजे ती मोठ्या ऐटीनें म्हणे, कीं तुमच्यापाशीं पुरेसे पैसे नसले तर मी आपल्याजवळचे देत्यें. येवढीशी पुंजी पण काय हा डौल!

डौलाची चेष्टा करण्याकरितां म्हणून 'काय हा डौल!' असं वर म्हटलं खरं. पण इंदूला आपण मिळविलेल्या पैशाचा थोडासा डौल वाटला यांत वावगें तें काय झालें? डौल मिरविण्यासारखीच ती गोष्ट नव्हती काय? कमाई स्वकष्टार्जित नसेल आणि तरीहि तिच्याबद्दल कोणी डौल करूं लागलें तर तें वाईट; स्वतः नादान राहून बापजाद्यांनीं मिळविलेल्या संपत्तीचा किंवा कीर्तीचा डौल मिरविणें वाईट. स्वतः अधोगतीला जाऊन पूर्वजांच्या उन्नतावस्थेचें स्तोम माजविणें वाईट; पण इंदूचें कांहीं तसें नव्हतें. डौल हा अहंभावाचा किंवा अहंकाराचा एक प्रकार आहे; आणि म्हणून योग्य कारणांकरितां व योग्य प्रमाणांत दाखविलेला डौल वाईट नसून उलट त्याचेच योगानें एक प्रकारची धमक, आत्मविश्वास, व्यक्तित्त्व वगैरे प्राप्त होतात. इंदूचे अंगीं जर मुळींच डौल किंवा अभिमान नसता, ती नेहमीं लोकांचे तंत्रानें व दुसरें सांगतील त्याप्रमाणें —मग तें खोटें असो वा खरें असो—वागती, ती नेहमीं गय खाऊन नमतं घेती तर मला खास आवडलें नसतें. उलट तिच्या अंगचा तो रगेलपणा, तिच्यांतील ती मुजोरी, आपलं म्हणणं—तें खरें असल्यास—सहसा सोडायचें नाहीं ही वृत्ति वगैरे गुण मला अतिशय आवडतात. आणि मी मनांत देवाला धन्यवाद देऊन म्हणतों, कीं देवा, मला जे गुण तूं दिले नाहींस ते माझ्या पोरीला तरी देऊन असं ना तसं माझं हितच केलं आहेस. हे गुण तिच्यांत दिसले—विशेषतः भोंवतालची परिस्थिति इतकी अनुत्तेजक व तेजोभंग करणारी असतांना—दिसले म्हणजे मला अतिशय आनंद होतो. कारण हे गुण अंगीं असतील तरच तिला तिच्या पुढील आयुष्यांत तिच्या चांगुलपणाचा गैरवाजवी फायदा करून घेणाऱ्या लुच्च्या लोकांबरोबर टक्कर देतां येईल. त्यांना तिच्याविषयीं असें वाटतां कामा नये, कीं ही बरी आपली बावळी व ढिली बाई आहे. घ्या-हिचा आपल्याला वाटेल तसा उपयोग करून. धैर्य, मानीपणा वगैरे सद्गुण या अभिमानांतूनच उत्पन्न होत असल्यामुळें प्रत्येक आईबापाला मी काकुळतीला येऊन सांगेन, कीं बाबांनो, काय वाटेल तें करा, पण मुलांतील हा अभिमान खुरटून टाकूं नका. वृथाभिमान

किंवा पोकळ डौल, अगर फाजील आत्मविश्वास असेल तर तो थोडा कमी करा; परंतु तसें करतांना योग्य अभिमानाला धक्का लावूं नका.

इंदूला योग्य वळण लावतांना आम्ही तिच्या या अभिमानाचा कितीतरी उपयोग करून घेतों. तिनें एकादे वेळेला कांहीं गबाळेपणा किंवा घामटपणा केला, अथवा हवरेपणा दाखविला, किंवा तोंडानें शब्द काढूं नये तो काढला, किंवा आणखी कांहीं वाईट गोष्ट केली व आम्ही तिला 'इंदे, हें ग काय ? लोक काय म्हणतील ? लोक हसतील ना ?' किंवा 'तुला नाहीं हें शोभत' असें कांहींतरी म्हटलें म्हणजे ती तात्काळ त्या गोष्टीपासून परावृत्त होते. मला भय इतकंच वाटतं, कीं आम्ही तिच्या अभिमानाचा हा असा फायदा करून घेतों हें तिला कळून येऊन जर का ती उद्यां 'मी हें असंच करणार,—लोकं हसलीं तर हसलीं, हसतील त्यांचे दांत दिसतील' असं कांहीं म्हणाली, तर आमची काय अवस्था होईल! जोंपर्यंत मुलांना अभिमान वाटत आहे आणि त्याला डिवचणं जोंपर्यंत त्यांना खपत नाहीं तोंपर्यंत त्यांना सुमार्गावर आणण्याकरितां शिक्षा, रागें भरणं, वगैरेची मुळींच गरज भासणार नाहीं. मुलांतील अभिमानाचा फायदा घेऊन ज्याप्रमाणें वाईट गोष्टी करण्यापासून त्यांस परावृत्त करतां येतें त्याप्रमाणेंच त्यांना चांगल्या गोष्टी करण्यालाहि प्रवृत्त करतां येतें. त्याचेच योगानें एक प्रकारची रग व शौर्य उत्पन्न होतें, व बुजकेपणा व भित्रेपणा नाहींसे होतात. मोठ्यांत मोठा गुण कोणता ? तर नीत्शे म्हणतो त्याप्रमाणें 'निर्भयता किंवा धैर्य.' मग हें धैर्य जर अंगीं आणायचें तर अभिमान घालवून कसें चालेल ?

दोष दाखविण्याच्या काकवृत्तीपेक्षां गुण घेण्याची हंसवृत्ति कितीतरी चांगली. आणि या हंसवृत्तीचा शीलसंवर्धनाचे दृष्टीनें अतिशय उपयोग होतो. त्यानेंच शीलसंवर्धन जास्त साधतें. एकाद्यानें एकादी गोष्ट केली आणि आपण त्यांतले दोष तेवढेच दाखविले, किंवा फक्त चुकाच काढल्या, तर ती गोष्ट पुनः करून सुधारण्याची त्याला उमेदच वाटत नाहीं. उलट त्या कामाबद्दल एक प्रकारचा तिटकारा वाटूं लागतो. तो मनानें काणकुंडा बनून ओशाळून जातो; व नवीन गोष्टी धीटाईनें अंगावर घेण्याऐवजीं तो त्या शक्य तेवढ्या टाळूं पाहतो. इंदूनें कितीतरी कठीण गोष्टी आमच्या एका शाबासकीचे जोरावर केल्या आहेत. एकादी गोष्ट तिनें करावी आणि त्याबद्दल आम्हीं तिचें मुक्तकंठानें कौतुक करावं म्हणजे पोर अशी कांहीं खुलते, व तिच्या त्या अहंभावाला अशा कांहीं गुदगुल्या झालेल्या

दिसतात, कीं त्या सुखसंवेदनेच्या भरांत तिनें हातीं घेतलेलें काम कितीहि कठीण असो—अगदीं जग इकडलें तिकडे करायचें असो—ती तें तडफेनें व शिताफीनें पार पाडते. तांदूळ निवडतांना सुनेनें पसाभर पाकड काढले त्याबद्दल एकादाहि चांगला शब्द तोंडावाटे न काढतां, एकादा खडा चुकून राहिला तर त्याबद्दल मात्र टोंचटोंचून बोलणाऱ्या व वाच्यता करणाऱ्या सासवाच असतात असें नव्हे. स्वतःच्या मुलींच्या बाबतींत तेंच करणाऱ्या आयाहि मला माहीत आहेत. इंदूच्या आईनेंहि एकदां असलीच चूक केली; पण तिचें हें एक चांगलें आहे, कीं तिला ती चूक पटली म्हणजे ती, ती पुन्हा म्हणून करीत नाहीं. आणि अशा अर्थाचें जेव्हां मी तिला बोलून दाखवितों, तेव्हां तिला दोष काढीत असतांनाच गुणहि दाखविण्याचा कसा सुंदर परिणाम होतो हें स्वानुभवानें समजतें. काम करण्याचा शीण येणें किंवा आनंद होणें हें त्या कामावर अवलंबून नसून कामाची जी जगाकडून भलीबुरी संभावना होते तिच्यावर अवलंबून असतें. त्या शेवटच्या एका गोड शब्दाकरतांच ना आपण राशीवारी कामें करतो? आणि त्याच शब्दाच्या मोहिनीनेंच ना आपण नवीन नवीन कठीण कामें अंगावर घेण्यास प्रवृत्त होतों?

एकदां इंदु तोंड गोरंमोरं करून गणितांत नापास झाल्याचें सांगत आली. अर्थात् मला वाईट वाटलेंच, परंतु माझ्यानें तिला इतरांप्रमाणें एकहि उणा शब्द बोलवला नाहीं. उलट जीभ चावून मी मनांत म्हणालों, 'देव करो, आणि मला तिच्या वयांत गणितांत किती मार्क मिळत होते हें तिला न कळो!' परंतु जेव्हां का गोष्ट सांगण्यांत, किंवा चित्रें काढण्यांत पैकींच्या पैकीं मार्क मिळाले म्हणून ती आनंदानें सांगत येते तेव्हां तर मी अगदीं नाचूं लागतों! त्या दिवशीं कांहीं ना कांहीं बक्षिस दिल्या-वांचून माझ्यानें राहवत नाहीं. तिचें किती कौतुक करूं असें मला होऊन जातें. माझ्या या पोरकट, थिल्लर आणि बेहोष वृत्तीबद्दल मला माझे शेजारीपाजारी नेहमीं हसतात. अन् 'तिला चांऽगली धाकांत व जरबेंत ठेवण्याऐवजीं तुम्ही जे हे तिचे भलते लाड व नसतीं कौतुकं करतां त्यांनीं जर पोर बिघडली तर त्याचा कांहीं विचार केला आहांत काय?' असे ते मोठ्या गंभीरपणें व माझ्याच हिता-करितां म्हणून विचारतात. अर्थात् त्यांचें समाधान मला करतां येत नाहीं हें खरें. कदाचित् कोणीं सांगावें? ते म्हणतात त्याप्रमाणें माझ्या या लाडाचा

भलता परिणाम होऊन पोरीचें हित होण्याऐवजीं अहितहि होईल. पण खरं सांगूं, शिक्षा करून जर तिचें हित होणार असलें आणि कौतुक करण्यानें जर ती बिघडणार असेल तर मला ती जरा बिघडलेलीच आवडेल! मूल प्रेमानें थोडेसें बेशिस्त झालेलें आवडेल का कठोरपणानें सुशिस्त झालेलें आवडेल असें जर कोणीं मला विचारलें तर मी तरतमन्यायानें दुसरें पत्करीन, असें सध्यां तरी वाटतें. जगाच्या धकाधकींत जगण्यासारखं जर कांहीं असेल तर तें एक प्रेमच होय; एरवीं कशाकरितां जगायचें आहे? आणि शिकायचें आहे तें तरी कशाकरितां?

आतां मी मोरे मुलांचा शाहीर बनून आईबापांनी मुलांच्या कल्याणाकरितां यँव् करावं अन् त्यँव् करावं असं सांगण्याचा आव आणीत आहें. जसें कांहीं मी सांगतों आहे त्याप्रमाणें प्रत्येक वेळी माझे हातून वर्तन घडलेंच आहे! कांहीं कांहीं प्रसंगीं माझ्या हातून असें कांहीं मूर्खासारखें वर्तन झालें आहे, कीं त्याची स्वतःला आठवण करून देतांना सुद्धां कोण लाज वाटत आहे, मग इतरांना सांगतांना तर किती वाटत असेल? एकदां इंदूच्या मैत्रिणी जमल्या होत्या; आणि तिच्या मनांतून अर्थातच त्यांच्याशीं खेळायचें होतें; पण दुसरे दिवशीं परीक्षा असल्यामुळें तिनें अभ्यास करावा असें मला वाटत होतें. तिला तें न आवडून तिनें जरा तोंड वांकडें केलें, व ती माझे मुर्वतीखातर अभ्यासाला बसली, ती स्वतः आनंदानें व मनापासून अभ्यासाला न बसतां चिरचिर करीत बसली याचाच मला राग येऊन मी तिला एक चपराक लगावली, आणि तीहि तिच्या मैत्रिणी बाहेर असतांना! केवढा हा माझा मूर्ख-पणा! आणि तो तरी एकाच प्रकारचा होता का? वास्तविक खेळणें हें मुलांना जात्याच आवडतें; शिवाय तिच्या मैत्रिणी जमलेल्या. स्वतःचे मनांतून नसलें तरी लोकांकरितां म्हणून कांहीं कांहीं गोष्टी कराव्या लागतात हें मींच ना तिला शिकविलें? मनांतून नसतांनाहि ती माझे शब्दाकरितां अभ्यासाला बसायला तयार झाली हाच तिचा वास्तविक मोठेपणा; व तो लक्षांत घेऊन त्याचें बक्षिस म्हणून मीं आनंदानें तिला त्या वेळीं खेळूं द्यावयास पाहिजे होतें. तसें तर केलें नाहींच, उलट तिला चपराक लगावली, आणि तीहि एकीकडे नाहीं, तर चार-चौघांत! मूर्खपणाचा आणि निर्दयतेचा अगदीं कळस झाला कीं नाहीं! अश्या कितीतरी चुका माझे हातून झाल्या आहेत; आणि म्हणूनच दुसऱ्यांचे हातून त्या होऊं नयेत म्हणून त्यांना सांगण्याशिकविण्याचा अधिकार एका अर्थीं मला प्राप्त झाला आहे!

इंदूला दुसरीं कोणी भावंडें नाहींत हें आमचें सुभाग्य समजायचें का दुर्भाग्य समजायचें कोणास ठाऊक ! इंदु हल्लीं एकटीच असल्यामुळें तिच्याकडे पाहण्यांत आम्हांला जितका वेळ घालवायला सापडतो तितका घरांत आणखी कांहीं मुलंबाळं असतीं तर खास सापडला नसता. कदाचित्, मला वाटतं, त्यांच्या धांगडधिंग्याला व कटकटीला त्रासून, आतां जो मी घरींच असतो तसा न राहतां, दुसरीकडे कोठेंतरी लांब गेलों असतों, किंवा घरांतल्या घरांतच पण अगदीं माळ्यावर जाऊन बसलों असतों ! तें कांहीं कां असेना, आहे या परिस्थितींत इंदु जवळ असल्यामुळें मला मुळींसुद्धां त्रास होत नाहीं. उलट ती दूर गेली म्हणजेच मला कसेंसें होतें. शेजारच्या खोलींतून ऐकूं येणारा तिचा आवाज व कधीं-कधीं माझ्याहि खोलीवर आलेली तिची धाड यांच्यामुळें काम करून आलेला कंटाळा नाहींसा होऊन पुन्हा कसें ताजेंतवानें वाटतें. शहरांतल्या बजबजपुऱ्यांत मला काम करावें लागत नसून इंदूसारख्यांच्या शांत व सात्त्विक सहवासांत काम करतां येतें हें मी माझें मोठें भाग्य समजतों.

घरांत एकच एक मूल असल्याचे जसे कांहीं फायदे आहेत तसे कांहीं तोटेहि आहेत. मुलांत मूल जितकें रमतें तितकें मोठ्या माणसांत रमत नाहीं. तसेंच मुलं आपआपसांत जितकीं चांगलीं शिकतात तितकीं मोठ्यांपासून शिकत नाहींत. शिवाय एकुलतें एक मूल असल्यामुळें आईबापांच्या प्रेमाचा सर्वच्या सर्व मारा त्याजवरच होऊन बिचारें कौतुकानें व फाजील लाडानें बिघडण्याची भारी भीति असते. आमचे नशिबीं आणखी मुलें नव्हतीं याचें प्रायश्चित्त बिचाऱ्या इंदूला भोगावें लागूं नये म्हणून आम्ही शक्य ती खबरदारी घेत असूं. आम्ही तिच्या मैत्रिणींना नेहमीं आमचेकडे बोलवीत असूं व इंदूलाहि मधून मधून त्यांचेकडे धाडीत असूं. सुट्यांतून किंवा सणावारीं आम्ही आमच्या नात्यांतल्या मुलांबाळांना इंदूबरोबर जेवायला व राहायला बोलवीत असूं. किंवा शनिवारीं रविवारीं आम्हीच इंदूला घेऊन आप्तेष्टांचे घरीं जात असूं. पण असल्या या नैमित्तिक गोष्टींनीं नित्याची अडचण भागत नसे; आणि म्हणून आम्हीच शक्य तों इंदूशीं मुलांप्रमाणें वागत असूं. अभ्यासाचे वेळीं तिच्याबरोबर अभ्यास करीत असूं, खेळण्याचे वेळीं तिच्याशीं खेळत असूं.

इंदूला गाणीं शिकावीं लागतात, तेव्हां आम्हीहि अगदीं तिच्याबरोबरीनें—कोणास खोटें वाटेल—तश्शा तालसुरांत व तस्से हातवारे करीत—म्हणत असूं! तिला उतरत्या चढत्या भांजण्या कराव्या लागत. चढाओढीच्या व सहकार्याच्या भावनेनें प्रेरित होऊन तिला त्या रूक्ष गोष्टींत गोडी वाटावी म्हणून आम्हीहि तिच्याबरोबर पाट्यापेन्सिली घेऊन 'कोण जास्त उदाहरणें करतों, कोण चांगलीं नीटनेटकीं करतों' असें म्हणून कामाला लागत असूं. एकट्या मुलीचा अभ्यास म्हणजे साऱ्या घरादाराची शाळा होत असे! आईबापांच्या काळाचा हा अपव्यय नाहीं का म्हणून तुम्ही म्हणाल; पण मी म्हणतों तुम्ही आपल्या वेळाचा नेहमींच याच्यापेक्षां जास्त चांगला उपयोग करतां कीं काय? मोठ्या माणसाला मुलांबरोबर मूल होतां येऊन कांहीं वेळतरी त्या 'रम्य बालपणा'ची गोडी पुनः चाखतां यायला एक भाग्यच लागतें.

मोठेपणाचें कृत्रिम कवच कांहीं वेळ तरी दूर झुगारून देऊन मुलांशीं सलगीनें व अगदीं बरोबरीच्या नात्यानें वागतां येणें ही तर आईबापांच्या यशाची गुरुकिल्लीच होय. ती ज्यांना सापडली ते पितृपदाला पात्र झाले असें समजण्यास हरकत नाहीं. मुलांचें प्रेम व विश्वास यांवर शिक्षणाची सर्व मदार असते; आणि हें प्रेम व हा विश्वास संपादन करण्याचे कामीं सलगीसारखें दुसरें साधन नसेल. मुलें जन्मतःच नीतिमानहि नसतात किंवा अनीतिमान-हि नसतात. तीं कशीं व्हावयाचीं हें त्यांच्याशीं तुमची जश्या प्रकारची वाग-णूक असेल त्यावर अवलंबून राहील. तुम्ही खरेपणानें व प्रामाणिकपणानें वागलांत, तर तीं खरेपणानें व प्रामाणिकपणानें वागतील. प्रामाणिकपणानें व खरेपणानें वागतांना नेहमींच यश येईल असें नाहीं. पण कांहीं झालं तरी तसंच वागलं पाहिजे असं इंदूला आमचं सांगणं असतं; आणि ज्या दिवशीं इंदूच्या हातून तसं वागणं होणार नाहीं तो सबंध दिवस तिला एकटीलाच नव्हे तर तिच्याबरोबर आम्हांलाहि मान खालीं घालून घालवावा लागेल! आमचें प्रेम व स्वतःचें उदाहरण यांचे सामर्थ्यानें ती आमच्याशीं नेहमीं प्रामाणिकपणेंच वागेल, कधींहि प्रतारणा होणार नाहीं अशी आमची खात्री आहे. वाटेल तें विचारणें, पटेल तें बोलणें व बोलण्याप्रमाणें करणें असला प्रामाणिकपणा मोठ्या माणसांना कधीं कधीं परवडत नाहीं. तो त्यांच्या सांसा-रिक नीतिशास्त्रांत सापडणारहि नाहीं. पण लहान मुलांचें त्याच्यावांचून कधींहि चालायचें नाहीं. कारण तो नसेल तर त्यांची ज्ञानाची हाव कशी

भागणार ? इंदूच्या बाबतींत असला प्रामाणिकपणा पूर्णांशानें असलेला दिसत नाहीं. पोक्त माणसांच्या नीतिशास्त्राचा परिणाम तिच्यावर अकालींच होऊं लागला आहे हें मोठें वाईट होत आहे. पण याला कारण, मला वाटतें, तिचे आई-बाप तिच्याशीं जितक्या मोकळेपणानें बोलणारे व वागणारे असावयास पाहिजे होते तितके अद्यापि नाहींत हें होय.

इंदूचा आमचेवर इतका विश्वास बसत चालला आहे, कीं तिला कांहीं विचारावेंसें वाटलें म्हणजे आडपडदा न ठेवतां अगदीं भाबडेपणानें ती तें विचारते. कित्येक वेळां तिच्या प्रश्नांचीं उत्तरें देणें गैरसोयीचें असतें. खरें सांगावें तरी पंचाईत, भलतेंच ज्ञान दिल्यासारखें होतें; खोटें सांगून वेळ मारून न्यावी तरी वाईट, आपणच खोटें बोलण्याचा धडा घालून दिला असें होतें; बरें माहीत असून मला माहीत नाहीं, किंवा आतां सांगत नाहीं अशीं उत्तरें देणेंहि आमच्या स्वभावाला जुळणारें नाहीं. इंदूच्या असल्या प्रश्नांचीं उत्तरें द्यावीं का न द्यावीं यासंबंधीं आम्हां उभयतांत बरीच भवति न भवति होई. तिचें म्हणणें इंदु वात्रट होईल व भलभलत्या गोष्टी माहीत झाल्या, कीं ती भलत्या गोष्टी करूंहि लागेल. मी म्हणें, 'ती वात्रट झाली, किंवा तिला भलत्यासलत्या गोष्टींची जाणीव होऊन त्या गोष्टी तिनें करून पाहण्याचें जरी मनांत आणलें तरी मला चालेल. पण मी तिची जिज्ञासा अतृप्त ठेवणार नाहीं, व खोटें बोलणार तर नाहींच नाहीं. शिक्षणाचें सारें सार काय, तर मुलांत जिज्ञासा उत्पन्न करणें व ती पुरविणें. इंदूचे मनामध्यें जिज्ञासा आपोआपच उत्पन्न होत असल्यामुळें आपलं पहिलं काम परस्परच होत आहे; आणि म्हणून तर दुसरं काम आपल्याला जास्त कसोशीनं केलं पाहिजे.' इंदूच्या आईचें माझ्या या सांगण्यानें फारसें समाधान होत नसे. ती माझ्याकडे अशा कांहीं नजरेनें पाही, कीं 'ठीक आहे, तुम्हांला या बाबतींत चांगलीच अद्दल घडली पाहिजे' असेंच तिला जणूं कांहीं म्हणावयाचें असे. आणि तिच्या सुदैवानें मला अद्दल घडण्याचा तो प्रसंग लवकरच आला.

एके दिवशीं आमची कुत्री व्याली व तिला लहान लहान पिलें झालीं.

इंदूला ते ४।५ दिवस अगदीं दिवाळी-दसऱ्याचे गेले. ती नाचली काय, बागडली काय, तिनें त्या पिलांचे मुके काय घेतलेन्, त्यांचे डोळ्यांत बोटें काय घातलींन्, कुत्री त्यांना पाजीत असतांना तिनें तिचीं थानें चाचपून काय पाहिलीं, एक न् दोन ! नाक, कान, डोळे, हात, वगैरे सर्व इंद्रियांचा उपयोग

करून त्या प्रत्येकावाटे होणारें ज्ञान मिळविण्यासाठीं जणूं तीं अगदीं हपापली होती. होतां होतां तिनें तिची आई ज्या प्रश्नांना भीत होती तेंच प्रश्न विचारावयास सुरुवात केली. हीं पिलें कोठून आलीं, कशीं आलीं, कोणीं आणिलीं, अशासारख्या प्रश्नांची मारे सरबत्ती चालविली. पुष्कळश्या आई-बापांना हे प्रश्न माझ्या मनचे आहेत असें वाटेल. मुलांचे मनांत असल्या चांभारचौकश्या उद्भवतच नाहींत असें त्यांचें म्हणणें. मुलें मोठ्या माणसांना असल्या शंका विचारीत नाहींत हें खरें; पण त्याचा अर्थ इतकाच, कीं त्यांच्या-वर त्यांचा असले प्रश्न विचारायला जो विश्वास लागतो तो नाहीं. त्यांना त्या शंकाच नसतात असें नाहीं. लहान मुलें आपआपसांत असल्या गोष्टी विचारतात कीं नाहीं हें पाहिलें, किंवा आपण आपलें लहानपण आठवूं लागलों म्हणजे यासंबंधीं दुसरा कांहीं पुरावा नको. सौभाग्यवतीला माझी फजिती करण्या-करितां असलाच प्रसंग पाहिजे होता. ती इंदूला माझेकडे घेऊन आली व 'हे आतां तुला सगळं सांगतील ऑं' असें माझ्याकडे मिस्किलपणें पाहत म्हणाली. माझ्या परीक्षेची वेळ आली. मी लाजतों कीं काय, खोटें बोलतों कीं काय, उडवाउडवी करतों की काय, तिला गप्प बसवितों कीं काय, आणि हें कांहींहि न केलें तर इंदूचें समाधान केव्हां व कसें होतें हें सर्व तिला प्रत्यक्ष पाहावयाचें होतें. पण मला सांगायला अभिमान वाटतो, कीं मी तिच्या परीक्षेला पूर्ण उतरलों. जो बायकोसारख्या नतद्रष्ट परीक्षकाच्या परीक्षेला उतरला तो इतर परीक्षकांना थोडीच भीक घालणार !

मीं हातांत कांहीं फुलें घेऊन इंदूला कुत्रीजवळ नेलें; आणि भूगोल किंवा गणित समजावून देतात, तितक्या गंभीरतेनें तिच्या शंका समजावून द्यायला लागलों. मीं कुत्राकुत्रीचीं जननेंद्रियें व जननक्षेत्रें दाखवून व मधून मधून हातांतील फुलांचें उदाहरण घेऊन बीजारोपण, बीजसंवर्धन, जीवाचें बहिरागमन वगैरे सर्व गोष्टी सशास्त्र व यथासांग—अर्थात् इंदूला झेपतील इतक्याच– सांगितल्या. सगळं पाहून झाल्यावर 'मीहि या फुलांसारखी व कुत्र्यासारखीच झालें का ?' असा तिनें मला प्रश्न विचारला. या तिच्या प्रश्नानें मात्र मीहि गांगरून गेलों. या प्रश्नाचें उत्तर देतांना मी कांहींतरी अतिप्रसंग करीन असें वाटून तिची आई तेथून चालती झाली. जातांना मात्र 'तरी मी सांगत होतें' अशा अर्थाचें पाहायला ती विसरली नाहीं. तिचें जाणें एक प्रकारें माझ्या पथ्या-वरच पडलें. मोठीं माणसें जवळ असतांना लहान मुलांना शिकविणें जरा

चमत्कारिक वाटलें खरें. एकादी गोष्ट त्यांस समजावून देतांना आपण जे शब्द वापरीत असतों ते लहान मुलांना समजण्यासारखे असले तरी त्यांत मोठ्या माणसांच्या दृष्टीला निराळाच अर्थ दिसतो; आणि म्हणून त्यांना आपल्या शिकवण्यांत कांहींच अर्थ नाहीं असें सारखें वाटत असतें. मीं इंदूला शारीर-शास्त्राच्या पुस्तकांतील एका सुंदर चित्राचे साह्यानें मानवी जीवाच्या उत्पत्तीचा इतिहास अथपासून इतिपर्यंत समजावून सांगितला. या माझ्या शिकवणुकीचा परिणाम तिच्या मनावर फार चांगला झाल्याचें मला दिसून आलें. पुढें एके दिवशीं प्रत्यक्ष कुत्री फळतांना जेव्हां तिच्या दृष्टीस पडली तेव्हां तिनें मला मुद्दाम माझ्या खोलींतून बाहेर बोलावून नेऊन 'तुम्हीं सांगितलेलें सर्व बरोबर आहे' असें जणूं सर्टिफिकेटच दिलें! ती कुत्री-कुत्र्याकडे पाहत असतां मी तिच्या चेहऱ्याकडे पाहत होतों. असला प्रसंग पाहतांना मोठ्या माणसांच्या चेहऱ्यांवर जो एक कामुकपणाचा विकार दिसतो तसला विकार तिच्या चेहऱ्यावर मुळींच दिसत नव्हता. पुंकेसर, स्त्रीकेसर, बीजांड वगैरे वनस्पतींसंबंधींच्या गोष्टी समजावून घेतांना आपली जी बौद्धिक वृत्ति असते तीच वृत्ति तिची होती. मीं इंदूच्या आईला हांक मारून हें मुद्दाम दाखविलें, तेव्हां ती गलिताभिमान वृत्तीनें म्हणाली, "आपण मोठीं माणसंच चावट! लहान मुलं खरोखरच अगदीं निष्पाप असतात! उगीचच मीं तुमची थट्टा केली." तिची ही कबुली ऐकून मींहि तिच्या पाठीवर थाप मारून तिच्या मोकळेपणाचें बक्षिस दिलें. इंदूची जिज्ञासा तृप्त झाली म्हणून, मला तिची जिज्ञासा योग्य प्रकारें तृप्त करतां आली म्हणून, आणि इंदूच्या आईची एका महत्त्वाच्या प्रश्नासंबंधीं खात्री झाली म्हणून, तो दिवस आम्हां तिघांना अतिशय आनंदाचा गेला.

---

— ९ —

इंदु शाळेंत जाण्यासारखी झाली तेव्हां आतां हिला कोणत्या शाळेंत घालावें हा प्रश्न आमचेपुढें उभा राहिला. एकदां वाटे तिला शाळेंत घालूंच नये, घरींच शिकवावें; पण पुन्हा वाटे कांहीं गोष्टी घरीं चांगल्या शिकतां आल्या तरी शाळेंत शिकायच्या गोष्टी म्हणून कांहीं आहेतच कीं. शाळेंत घालायचें इतकें ठरल्यावर जवळच्या म्युनिसिपालिटीच्या शाळेंत घालायचें का गांवाबाहेर विलायतेहून आलेल्या एका बाईनीं काढलेल्या शाळेंत घालायचें? हा प्रश्न पुढें आला. आम्ही दोन्हीहि शाळा स्वतः पाहून आलों. या बाईची शाळा चांगली असल्याचें लोक बोलत, पण ती प्रत्यक्ष पाहिल्यावर तर आमची अगदीं खात्रीच पटली. शाळेचें कंपाउंड बरेंच मोठें असून त्यांत जिकडे तिकडे बारीक हिरवळ उगवलेली दिसत होती. एका बाजूस एक टुमदार बाग असून तिच्यांत एक वाटोळा हौद होता. इंदूला या शाळेंतील कोणती विशेष गोष्ट आवडली असेल, तर ती बाग व त्या हौदांत सोडलेले मासे, कांसव व बदकें ही होय. बागेबाहेरच्या पटांगणांत एक मोठें पिंपळाचें झाड असून त्याच्या पारावर फांद्यांना लटकावलेल्या झोंपाळ्यावर इंदूच्याच वयाचीं कितीतरी मुलें खेळत होतीं. शाळेचा एक प्रशस्त हॉल असून त्याच्या सभोंवार मोकळे ऐसपैस व्हरांडे होते. वर्गांत मुलांना बसण्याकरितां लहान लहान खुर्च्या व लिहिण्याकरितां लहान लहान टेबलें होतीं. जिकडे तिकडे स्वच्छता, टापटीप, व्यवस्था दिसत असून मास्तरणीहि मोठ्या चुणचुणीत व आनंदी दिसल्या. मधल्या वेळच्या खाण्यापिण्याची, खेळण्याची व विश्रांतीची सर्व व्यवस्था शाळेंतल्या शाळेंतच केलेली होती. हें सर्व ठीक होतें; पण महिना ७ रु. द्यावे लागणार याची वाट काय? स्वतःचें कॉलेजचें शिक्षणहि महिना ५ रुपयांत केलेला मनुष्य मी! अर्थात् इंदूच्या अ, आ, इ, ई करितां महिन्याचे ७ रुपये देण्यास मन धजेना. काय अवास्तव खर्च हा? ज्या मुलांना दोन वेळां पोटभर अन्न मिळण्याची मारामार त्यांना हवेत कशाला तुमचे ते बंगले व आरसेमहाल! अशा प्रकारचे विचार मनांत येऊं लागले. परंतु लवकरच तेथल्या सोयींचें महत्त्व पटून व वात्सल्यप्रेमाला व ध्येयवादाला भरतें येऊन, ते विचार ताबडतोब नाहींसेहि झाले. झालें, इंदूला याच शाळेंत घातलें.

शाळेचें सर्व काम किंडरगार्टन् पद्धतीनें चाललेलें असून गोष्टी, खेळ, गाणीं,

हस्तव्यवसाय, चित्रकला, सृष्टिनिरीक्षण वगैरे विषयांवर बराच भर दिलेला असे. मधल्या हॉलमध्यें खूपशीं मोठमोठीं चित्रें व त्यांचेखालीं त्यांचेसंबंधींच्या गोष्टींचे मोठमोठे तक्ते हीं लावलेलीं असून मधल्या मोठ्या टेबलावर रंगीबेरंगी चित्रांचीं लहान लहान पुस्तकें मांडलेलीं असत. मुलांना वर्गांत कांहीं काम नसलें म्हणजे तीं बागेंतल्या हौदावर, किंवा पिंपळाच्या पारावर अगर या पुस्तकाच्या टेबलाशीं घुटमळत असलेलीं दृष्टीस पडत. हॉलच्या एका भिंतीवर एक मोठा पांढरा पडदा लटकत होता. त्यावरून शाळेंत मॅजिक लँटर्न व सिनेमा यांची सोय असलेली दिसली.

इंदूला शाळेंत घातल्यावर २-३ महिन्यांनीं आम्ही पुनः तिचे शाळेंत गेलों, तेव्हां ती टेबलाशीं मोठ्या ऐटीनें पुस्तक वाचीत बसलेली दिसली. अवघ्या २-३ महिन्यांत तिची येवढी प्रगति झालेली पाहून आम्हांला तिच्या बुद्धीचें कौतुक वाटूं लागलें. माझ्यांत तर कांहीं भास्करा-चार्यांचें तेज नव्हतें, मग तिच्यांत ही लीलावतीची चमक कोठून आली? तिच्या बाईंना विचारतां सर्वच मुलें अशीं झपाट्यानें वाचावयास शिकतात असें सांगून, तीं कशीं शिकतात हेंहि त्यांनीं थोडक्यांत समजावून दिलें. तें ऐकून एक प्रकारें बरें वाटलें, पण आपल्या पोरींत विशेष कांहीं आहे असें वाटून जो आनंद व अभिमान वाटूं लागला होता तो मात्र ओसरला. आम्ही ज्या पद्धतीनें लहनपणीं वाचन शिकलों ती याचे मानानें किती चुकीची होती असाहि एक विचार झर्रदिशीं येऊन गेला. नुसतीं अक्षरें आणि बाराखड्या शिकण्यांतच आमचें एक वर्ष गेलें. शब्द व वाक्यें जुळवितां येऊं लागेनों दुसरें वर्ष गेलें, अन् तिसऱ्या वर्षी आम्ही मजकूर जुळवून वाचूं लागलों! काय तें आमचें रखडत रखडत वाचणें! काय तो आमचा सूर! वर्गांत वाचनाला सुरुवात झाली, कीं जशी कांहीं मंडई भरली आहे असें वाटे. आणि पुन्हा काय वाचलं तें सांगतां यायचं नाहींच! तीच इंदु पहा, अवघ्या ५-६ महिन्यांत कशी अगदीं खाड खाड आणि समजून वाचूं लागली होती! म्हणजे जी गोष्ट ५-६ महिन्यांत सहज व्हायची त्याला आम्हांला २-२॥ वर्षें लागून कोण उरस्फोड करावी लागत असे! एकादी क्रिया भागशः न करतां ती पहिल्यापासूनच सबंधच्या सबंध केली असतां वेळ व श्रम कमी लागून तिचा उपयोग करावयास सापडतो, आणि त्याचे योगें करणाराला आपणांत एक प्रकारची शक्ति आलीसें वाटून आनंद होतो व त्या

आनंदाचे भरांत तो ती क्रिया जास्त जास्त उमेदीनें करूं लागतो. गवयानें तान मारावी, श्रोत्यांनीं वाहवा करावी, गवयानें फुशारून पुनः दुसरी व कठीण तान मारावी, अशांतलाच हा प्रकार चालतो. हें तत्त्व आमच्या वेळच्या शिक्षकांना कळतें तर काय बहार झाली असती. पोहायला शिकतांना पहिल्यांदा पाय मारणें, नंतर हात मारणें, नंतर छाती व डोकें तरंगत ठेवणें, नंतर नाकातोंडांत पाणी जाऊं न देणें, अश्या एकेकट्या गोष्टी आपण करीत नाहीं, तर सगळ्याच गोष्टी आपण एकदम करतों, व तश्या केल्या तरच पोहतां येतें. हा साधा नियम वाचनाच्या कलेला लागू करण्याचें त्या वेळचे पंतोजींना कां सुचलें नाहीं कोणास ठाऊक!

एकदां इंदूच्या बाईनीं मुलांमुलांनीं बसवलेलें नाटक पाहण्याकरितां म्हणून आम्हांला बोलाविलें. माझें तर जाण्याचें ठरलेंच होतें; पण इंदूच्या आईच्या मनांतून त्या दिवशीं जायचें नव्हतें. पण इंदूनें त्या दिवशीं आईची इतकी कांहीं गयावया केली, कीं ही पोर आज इतका आग्रह कां करीत आहे हें कांहीं आम्हांस समजेना. आम्हीं शाळेंत गेलों. मधल्या हॉलमध्यें आमच्यासारख्या पाहुण्यांकरितां थोड्याश्या खुर्च्या मांडल्या होत्या; पण त्यांपैकीं बऱ्याचश्या शेवटपर्यंत रिकाम्या राहिलेल्या दिसल्या. सिनेमाचा पडदाच पुढें ओढून मुख्य ड्रॉप बनविला होता. प्रथम इंदु आमचेपाशींच बसली होती, पण नंतर ती तेथून निघून गेली. बरोबर वेळेवर सुरुवात झाली. गाणें संपल्यावर इंदूच्याच वयाच्या एका मुलीनें 'मांजर, खवा आणि माकड' ही गोष्ट सरळ व हावभाव करून सांगितली. पहिल्यांदा ती जरा अडखळूं लागली; परंतु तिच्या बाईनीं चाणाक्षपणानें तिची अडचण ओळखून दोनचार मुली ती गोष्ट ऐकायाला व मधून मधून हूं-हूं म्हणायला बसविल्याबरोबर तिचें अडणारें गाडें सुरळीत सुरू झालें. आम्ही त्रयस्थ असल्यामुळें, व ती गोष्ट सहानुभूतिपूर्वक ऐकून मधून मधून हुंकार देण्याचें शहाणपण आमचेमध्यें नसल्यामुळें त्या पोरीच्या गोष्टीला पहिल्यांदा तितकासा रंग आला नाहीं. गोष्ट संपल्याबरोबर पडदा पडला व थोड्याच वेळांत पुनः उघडला. एक लहानशी मुलगी खव्याच्या गोळ्याकडे मोठ्या आशाळभूतपणानें पाहत बसली होती. तितक्यांत दोन मांजर-मुली येऊन त्यांनीं पहिल्या मुलीचें लक्ष दुसरीकडे चाळविलें, व तिच्या पुढ्यांतील तो खव्याचा गोळा पळविला. मुलगी मांजर-मुलींना पकडण्याचा प्रयत्न करीत आहे तोंच त्या दूर एका बाजूला उंचावर जाऊन

खव्याच्या गोळ्याच्या वाटपासंबंधीं आपआपसांत मांजरांसारख्या किंकाळूं-किंचाळूं लागल्या. तितक्यांत तिकडून चष्मा घातलेली एक माकड-मुलगी आली. आणि तिला पाहून तर आम्हां उभयतांना—विशेषतः इंदूच्या आईला—अतिशयच हंसूं आलें! आपण नाटकांत काम करणार आहोंत याचा कांहीं एक थांग लागूं न देतां इंदूनें अश्या अचानक रीतीनें आपल्या आईला चकित करून सोडलें! गमतीकरतां का होईना, इंदु एकादी गोष्ट आमचेपासून लपवून ठेवूं शकते हें त्या वेळीं आम्हांला समजलें. इंदूनें आपलें काम इतक्या सुंदर रीतीनें कसें केलें याचे कौतुकांत मी हसत होतों, तर सौभाग्यवती निराळ्याच कारणानें हसत होती. ती माझ्या कानाशीं लागून हळूंच म्हणते 'चष्म्यावरून पाहणं, पोक्तपणानं बोलणं, दुसऱ्याच्या बऱ्याकरतां म्हणून करणं, पण स्वतःचंच हित साधणं वगैरे सर्व कांहीं तिनं तुमचं उचललं आहे'! एकाच वाक्यांत तिनें मुलीची प्रशंसा व माझी निंदा इतक्या सहज व सुंदर रीतीनें केलेली पाहून मला तिच्या मार्मिकतेचें कौतुक वाटूं लागलें; पण न कळत वाचलेला दोषांचा तो सर्व पाढा ऐकून मनांत मात्र मी चांगलाच चरकलों! शिवाय मुलगी माकडाचें सोंग करतांना माझी नक्कल करते याचा अर्थ काय हाहि विचार मनांत येऊन माझें मलाच हसूं येऊं लागलें. असो. गोष्ट नाटकरूपानें करून दाखविल्यानंतर मुलांनीं त्याचसंबंधानें केलेलें संगीत संभाषणहि म्हणून दाखविलें. मुलांना इतकीं चांगलीं— अर्थात् त्यांचे मानानें— गाणीं करतां येतात याचें मला खरोखरच आश्चर्य वाटलें. आणि विशेष आश्चर्य म्हणजे माकडाचें गाणें खुद्द इंदूनेंच केलें होतें. बरेच दिवस एक कागद ती आमचेपासून लपवून ठेवीत होती तो त्या गाण्याचाच असावा असें आतां आमच्या लक्षांत आलें. तिनें आम्हांला तो कागद अगोदर दाखविला असता तर आम्ही नसती का त्या गाण्यांत कांहीं सुधारणा करून दिली? परंतु मोठीं माणसं अश्या 'सुधारणा' करतात म्हणूनच, मला वाटतें, मुलें आपल्या चांगल्या कृतिहि त्यांचेपासून चोरून ठेवतात. मोठ्या माणसांना त्या मोठ्या 'सुधारणा' वाटतात, पण मुलांना ती निव्वळ ढवळाढवळ वाटत असावी. आणि त्यांस ती तशी वाटल्यास त्यांत आश्चर्य तरी कसलें! गाणीं झाल्यावर मुलांनीं या प्रसंगासाठीं म्हणून केलेल्या वस्तु दाखविण्यांत आल्या. खव्याचा गोळा, तराजू, चष्मा, मांजरांचे मुखोटे व शेपट्या वगैरे सर्व त्यांचें त्यांनींच केलें होतें. इंदूनें माकडाचा मुखोटा कां लावला नाहीं याचें कारण विचारतां तिच्या बाईनीं

हसत हसत सांगितलें, कीं इंदूचा चेहरा मुळांतच तिच्या भूमिकेला इतका अनुरूप होता, कीं तिला निराळ्या मुखोट्याची जरूरच लागली नाहीं! स्वतः-च्या विनोदाचें पोटभर हसून घेतल्यावर त्या पुढें म्हणाल्या 'त्याचं खरं असं आहे, कीं तिच्या चेहऱ्यावरचें भावनिदर्शन त्या निर्जीव मुखोट्यावर मुळींच दिसून आलें नसतें. शिवाय लहान मुलांना वेषांतराशिवाय दुसऱ्याशीं तादात्म्य होणं जितकं चांगलं साधतं तितकं मोठ्या मुलांना साधत नाहीं. मांजराचीं कामें करणारीं मुलें इंदूपेक्षां मोठीं असल्यामुळें त्यांचें मुखोटया-वांचून जमेना. इंदु मात्र अद्याप सर्व उणीवा कल्पनाशक्तीचे जोरावर भरून काढूं शकते.'

शिक्षणांत गोष्टी, गाणीं, हस्तव्यवसाय, नाचणं-बागडणं, व एकंदर अंगविक्षेप यांचा हा सुंदर मिलाफ केलेला पाहून मला अतिशय आनंद झाला, व इंदूच्या बाईजवळ मीं तसें बोलूनहि दाखविलें. 'तुम्हीं उभयतांनीं हजर राहून प्रसंग साजरा केला, व मुलांना व आम्हांलाहि उत्तेजन देऊन उपकृत केले' असें म्हणून बाईनींहि आमचे आभार मानले. आभार मानण्याचें काहीं कारण नाहीं असें मी म्हणतांच बाई जरा आवेशानें म्हणाल्या, 'अहो, काय सांगूं, असल्या प्रसंगीं हजर राहणारे पहिले पालक मला तुम्हीच भेटलां.' आमच्या-करितां राहो, निदान स्वतःच्या मुलांना उत्तेजन देण्याकरितां तरी किती पालक येताहेत? आमच्याप्रमाणेंच वास्तविक हें त्यांचेंहि काम नाहीं का?' आम्ही गुड्बाय करून तेथून निघालों खरें, पण पालकांच्या या अनास्थेसंबंधींचे व त्या-मुळें होणाऱ्या मुलांच्या नुकसानीसंबंधींचे विचार मात्र मनांतून जाईनात. आम्ही पालक जोंपर्यंत असे, तोंपर्यंत मास्तरांनींहि तितपतच शिकविलें, व मुलेंहि अशीं तशींच निघालीं तर त्याचा दोष कोणाकडे? मुलं म्हणजे गुरं आहेत व मास्तर म्हणजे त्यांची राखोळी करणारे गुराखी आहेत, महिन्यांनीं एकदां फीचे पैसे तोंडावर फेकले म्हणजे संपलें आमचें कर्तव्य! आम्ही शाळेंत एकदांच काय ते जातों; आणि तें म्हणजे मुलाला खालच्या वर्गांत ठेवल्यावर 'त्याला यंदा कसंहि करून वर ढकला, मी मुळीं आतां मास्तरच लावणार आहे' अशी हेडमास्तरांना विनंति करण्याकरितां! पण यासंबंधीं बोलावें तेवढें थोडेंच. नुसतें ऐकूनहि कोणी घेणार नाहीं.—असे कितीतरी विचार तेवढ्यांतले तेवढ्यांत मनांत येऊन गेले.

---

इंदूला या शाळेंत राहून ७-८ महिने झाले असतील; शाळेंत तिचें फार चांगलें चाललें आहे असें पाहून आम्हांला मोठें समाधान होत होतें. पण एके दिवशीं इंदू माझ्या खोलींत येऊन व तेथें दुसरें कोणी नाहीं असें पाहून मला हळूच म्हणाली, 'नाना, आतां मला खरोखरच्या शाळेंत घाला ना! मला आतां असली शाळा नको. तिथं रोज रोज तेंच तेंच चालतं. गोष्टी, गाणीं, खेळ नि हस्तव्यवसाय! आणि नाना, मुलं तर कोण दंगा करतात हो! बाईंना मुळींच भीत नाहींत. बरं, बाईहि कधीं त्यांना रागं भरत नाहींत. शेजारचा विठू रोज किती मार्क मिळवतो. आम्हांला मात्र कधीं मार्क नाहींत नि नंबर नाहींत.' तिनें आणखीहि पुष्कळ सांगितलें असतें; पण मींच तिला फारसें उत्तेजन दिलें नाहीं. मनांत मात्र समजलों, कीं इंदु आतां– तिचाच शब्द घालायचा म्हणजे– 'खरोखरच्या' शाळेला योग्य झाली आहे. तिनें आपल्या शाळेवर व तेथील मऊवार शिस्तीवर अजाणताच किती कठोर टीका केली होती! 'खरोखरच्या शाळेंत घाला!' मग हल्लींची तिची शाळा काय खोटी समजायची? नसेल ती खोटी, पण तिच्या ज्ञानलालसेचें जर या शाळेंत समाधान होत नसेल, व तिच्या वाढत्या व्यक्तित्वाच्या विकासाला जर ती अपुरी पडत असेल तर ती शाळा इतर दृष्टींनीं कितीहि चांगली असली तरी तिच्या दृष्टीनें ती निरुपयोगीच नव्हे काय?

पुष्कळसा विचार करून आम्हीं तिला तिनेंच सुचविलेल्या एका खाजगी संस्थेच्या शाळेंत घातलें. ही संस्था स्वार्थत्यागाचे तत्त्वावर निघालेली असून आज ३०-३५ वर्षांत तिच्या कितीतरी शाखा निरनिराळ्या ठिकाणीं काम करीत होत्या. संस्थेचे मूळ संस्थापक खरोखरच मोठे त्यागी असून त्यांचेच पुण्याईवर संस्थेची भरभराट होत होती. ते स्वतः गृहस्थाश्रमी असले तरी संसारांतील सुखांसंबंधीं त्यांचें मन पूर्ण विरक्त बनलेलें होतें. त्यांनीं शिक्षण हें एकच ध्येय आपलेपुढें ठेविलें होतें, व त्याकरितांच ते आतांपर्यंत जगले असावेत असें वाटे. त्यांचा तो साधा पोषाख, काळसर चेहऱ्यावर विशेषच शोभणारी त्यांची ती शुभ्र दाढी, मोजकें पण कळकळीचें बोलणें, निःस्वार्थी व निर्गर्वी वृत्ति वगैरेंचा, पाहणारांचे व ऐकणारांचे मनावर फार परिणाम होत असे. ते कधीं कधीं आमच्या गांवीं येऊन आपल्या

संस्थेच्या शाखेला भेट देत. प्रत्येक खेपेला गांवांतील चार संभावित व वजनदार लोकांकडे जाऊन ते शाळेच्या व एकंदर संस्थेच्या कार्याचा प्रसार कसा होईल यासंबंधीं मोठ्या आस्थेनें विचारविनिमय करीत. अशाच एका प्रसंगीं ते आमचेकडे आले असतांना इंदूनें त्यांना पाहिलें होतें, व तेव्हांपासूनच त्या विभूतीबद्दल व तिच्या नांवावर चाललेल्या त्या शाळेबद्दल तिला एक प्रकारचा आदर वाटूं लागला होता. ते घरीं येऊन गेल्यावर इंदु आमचेकडे धांवत धांवत आली व मोठ्या गंभीर आणि आश्चर्ययुक्त स्वरानें उद्गारली 'ते किती पुण्यवान असले पाहिजेत, नाहीं'? 'कशावरून ग'? विचारतां ती म्हणाली 'कशावरून काय विचारता? त्यांची ती पांढरी शुभ्र दाढी व त्यांचा तो पांढरा शुभ्र पोषाख पाहिला नाहीं का तुम्ही? पापी माणसें अशीं नाहीं दिसत.' तिची ती चर्या पाहून व तिच्या त्या पापपुण्याच्या स्वरूपासंबंधींच्या कल्पना ऐकून आम्हांला हसूं आल्यावांचून राहिलें नाहीं. कोणाला कशाबद्दल आदर वाटेल याचा कांहीं नेमच नाहीं म्हणायचा. पापी व पुण्यवान माणसांच्या तिच्या कल्पना किती साध्या-सुध्या होत्या! वरच्या धुवट सोंवळेपणाचा व अंतर्यामीच्या सोंवळेपणाचा इंदूला वाटला तितका निकटचा संबंध असता तर काय बहार झाली असती! या विशिष्ट व्यक्तीचे ठिकाणीं तसा तो झाला होता ही गोष्ट निराळी.

या शाळेंतील आणखीहि २-४ व्यक्ति मूळ संस्थापकाइतक्याच नसल्या तरी बऱ्याच वरच्या दर्जाच्या होत्या. आणि त्यांच्या एकंदर वागणुकीमुळें शाळेचें एकंदर वातावरणहि उच्च प्रकारचें बनलें होतें. साधी—स्वावलंबी राहणी, कडक शिस्त, समानतेचें व प्रेमळपणाचें धोरण, गरजा कमी करून शक्य तितक्या थोडक्या खर्चांत राहण्याचा मनाचा स्वाभाविक कल, स्वधर्म, स्वदेश, स्वभाषा यांसंबंधीं जरा जाज्वल्य अभिमान, या व अश्या स्वरूपाच्या सर्व गोष्टी या व्यक्तींच्या जीवनक्रमांतून निघून तेथील वातावरणांत जणूं दरवळून व दुमदुमून गेल्या होत्या, व मुलें तेथें येण्याचा अवकाश, कीं त्यांच्याहि जीवनांत त्या संचार करूं लागत.

या शाळेंत गेल्यावर इंदूला लवकरच खरोखरच्या शाळेंत गेल्यासारखें वाटूं लागलें. पहिल्याच दिवशीं ती आम्हांला सांगूं लागली, "आम्हांला खुर्च्या नाहींत; आम्हांला नुसत्या बाकांवरच बसावं लागतं, अन् तेंहि कोण चेंदामेंदीनं. आमच्या जुन्या बाई कश्या आमच्याशीं गोड बोलायच्या. नवीन

बाई नाहीं तश्या बोलत. अन् एक म्हातारे मास्तर तर माझ्या अंगावर केवढ्यांदा खेंकासले ! मीं सहज म्हटलं मी याच बाकावर बसतें, तशी ते म्हणाले 'तें कांहीं नाहीं, मी सांगेन तेथेंच बसायचं!" मला अगोदरच वाटलं होतं, कीं पहिल्या शाळेंतील बायांचा फाजील मायाळूपणा कांहीं येथील शिक्षकशिक्षकिणींत दिसून येणार नाहीं, व पोरीला पहिल्यापहिल्यांदा तरी त्यांचें बोलणें-सवरणें जरा कडू व कठोर वाटणार. गमतरमत शिकविण्याच्या त्या गोड गोड तऱ्हा, व हसत-खेळत अभ्यास करण्याच्या त्या नवीन नवीन पद्धती पोरीला या शाळेंत फारश्या आढळून येणार नाहींत. पहिल्या शाळेंतल्या-प्रमाणें आतां तिला पाटीदप्तर शाळेंतच ठेवून घरीं हात हालवीत येतां येत नसे. घरींहि तिला थोडाबहुत अभ्यास करावा लागे. पूर्वींचे तिचे गोष्टी, गाणीं, खेळ वगैरेसारखे विषय जाऊन त्यांचे जागीं भाषा, गणित, इतिहास, भूगोल वगैरेसारखे जरा कठीण कठोण विषय आले. पूर्वीं मनाला मानेल तसें लिहिलें, बोललें किंवा चित्रें काढलीं तरी चालत असे; पण आतां जें कांहीं बोलायचें तें व्याकरणशुद्धच बोलायचें, जें कांहीं लिहायचें तें बिनचूक व वळण-दारच लिहायचें, व जें कांहीं चितारायचें तें प्रमाणांतच चितारलें पाहिजे असें नवीन नवीन निर्बंध आले. पहिल्या शाळेंत प्रत्येक तासाचे शेवटीं व वर्गांतल्या वर्गांतच राजरोसपणें नाचाबागडायला सापडे; आतां मात्र खेळण्या-ऐवजीं नमस्कार किंवा कसरत आली, व तीहि क्रीडांगणावरच आणि एका ठराविक वेळींच. सारांश, पहिल्या शाळेंत शिकण्याला जें खेळण्याचें रूप आलें होतें तें नाहींसें होऊन आतां त्याला एकाद्या गंभीर व जरा त्रासाच्या कामाचें स्वरूप प्राप्त झालें होतें.

आम्ही एक दिवस इंदूच्या या नवीन शाळेत गेलों. तिच्या वर्गांत गेल्या-बरोबर मुलांनीं आम्हांला खडी ताजीम दिली. इंदु वर्गांतील एका कोंपऱ्यांत जरा सुस्त होऊन बसली होती. 'वर्गांत भूगोल चालू आहे' असें सांगत शिक्षक खुर्चीवरचे उठून स्वतः वर्गांत चालूं लागले! परिस्थितींतून निर्माण झालेल्या या विनोदाचें सौभाग्यवतीला खूपच हसूं आलें. स्त्रीस्वभावाला धरून तिनें तें लवकरच दाबलें म्हणून ठीक. वर्गांत हिंदुस्थानचा एक जुनासा नकाशा टांगला असून त्यांतील रंगीबेरंगी प्रांतांची नक्कल मुलें आपल्या पुढ्यांतील नकाशावर करीत होतीं. 'या निरनिराळ्या रंगांचा अर्थ काय?' म्हणून विचारलें असतां कोणीच बोलेना. एका मुलानें मात्र 'या भागांत

पाऊस मुळींच पडत नाहीं आणि गवत लवकरच वाळतें. म्हणून तो भाग पिवळा दाखविला आहे, व या भागांत पाऊस पुष्कळ पडतो व तेथें गवत नेहमीं हिरवेंगार राहतें म्हणून तो हिरवा दाखविला आहे.' असें उत्तर दिलें. रंगांची ही उपपत्ति ऐकून हसूं आलें; व पिवळ्या रंगांत रंगविलेल्या बिचाऱ्या स्वकीय संस्थानांना हिरव्या रंगांत रंगविलेल्या परकीय राष्ट्रांचा हेवा कां वाटतो याचाहि खुलासा झाला! शिक्षकानें वर्गांतील मुलींना नकाशांचें पुस्तक विकत घेण्यास सांगितलें नव्हतें. जगांतील लढाया संपून प्रत्येक देशाचें भवितव्य एकदां कायमचें ठरल्यावर नकाशे विकत घ्यावयास सांगण्याचा त्यांचा विचार होता कीं काय कोणास ठाऊक! भूगोल शिकवितांना वरच्यासारख्या गमती कितीतरी होत असल्याचें मला मागाहून दिसून आलें. इंदूला तर त्या विषयाचा जवळजवळ तिटकाराच आला होता. हें पाहून मात्र माझे डोळे चांगलेच उघडले. ताबडतोब एका तज्ज्ञाचे सल्ल्यानें मीं तिला प्रवासवर्णनें, धाडशी नावाड्यांचीं अद्‌भुतरम्य चरित्रें, निरनिराळ्या देशांतल्या मुलांमुलींच्या गोष्टी, त्यांच्या धार्मिक व पौराणिक कथा, मोठाल्या माणसांच्या जीवनक्रमाचीं व उद्योगधंद्यांचीं वर्णनें वगैरेसारखीं पुस्तकें वाचावयास दिलीं. भौगोलिक विषयांवरील सिनेमांना व शक्य तेव्हां खरोखरच्या प्रवासालाहि मी तिला घेऊन जाई. आणि सांगायची गोष्ट अशी, कीं थोड्याच दिवसांत इंदूला भूगोल हा विषय पूर्वीपेक्षां कितीतरी जास्त आवडूं लागला!

इंदूला इतिहास मात्र पहिल्यापासूनच आवडत असे. जेव्हां पहावें तेव्हां तिच्या हातांत ऐतिहासिक गोष्टींचीं पुस्तके दृष्टीस पडत. त्यांतील गोष्टीहि ती मोठ्या उल्हासानें सांगत असे. विशेषतः शिवाजीनें लहानपणीं गाईचा वध करणाऱ्या मुसलमानाचा हात छाटल्याची गोष्ट, कल्याणच्या सुभेदाराच्या सुनेची गोष्ट, दादोबा कोंडदेवानें बंडीची डावी बाही कापल्याची गोष्ट, तुझी बेटी मला देत असलास तर मी मुसलमानी धर्म स्वीकारतों हें संभाजीचें 'बाणेदार' उत्तर व तो प्रसंग, कोणत्याशा ब्राह्मणानें संभाजीला का राजारामाला तो शत्रूला ओळखूं येऊं नये म्हणून स्वतःच्या पानांत जेवावयास घेतलें वगैरे प्रसंग इंदु फारच बहारीनें सांगे. शिवाजीचा स्वदेशाभिमान, त्याचें नैतिक पावित्र्य, संभाजीचा कट्टा धर्माभिमान, दादोबाचा सत्याभिमान, त्या ब्राह्मणाची अपूर्व स्वामिनिष्ठा, वगैरे गुणांचा इंदूच्या मनावर अतिशय मोठा परिणाम झाला होता. आणि एकाद्यानें खवचटपणानें

तिला कांहीं प्रश्न विचारून त्या व्यक्तींच्या चागुलपणासंबंधीं शंका प्रदर्शित केली तर तिला तें बिलकुल खपत नसे. एकदां इंदु गोष्ट सांगायच्या अगदीं भरांत आलीं असतांना मीं तिला सहज विचारलें, 'त्या मुसलमानानें नुसती गायच मारली; शिवाजीनें तर त्या मनुष्याची हत्या केली. तेव्हां त्या मुसलमानापेक्षां तुझा तो शिवाजीच जास्त पातकी नाहीं काय?' पोर गोंधळली व तिला उत्तर देतां येईना. गाय मारण्यापेक्षां मनुष्य मारणं हें केव्हांहि काय वाईटच, आणि म्हणून शिवाजीनें हें चांगलें केलें नाहीं असें तिलाहि आतां पटूं लागलें. पण शिवाजीच्या धर्माभिमानाची तिच्या बालमनावर जी एक कायमची पकड बसली होती ती कांहीं दूर होईना, व शेवटीं तो मोठ्या काकुळतीला येऊन म्हणाली, 'असं काय हो नाना, शिवाजीच खरा मोठा, आणि त्यानं केलं तें चांगलं!' हाच प्रकार संभाजीच्या त्या बाणेदारपणाच्या उत्तराचा. वस्तुस्थिति अशी होती, कीं परिस्थितीचें सूक्ष्म अवलोकन करून योग्यायोग्याचा निर्णय करतां आला पाहिजे हें जें इतिहासाच्या अध्ययनाचें खरें ध्येय तें बाजूला राहून आपले पूर्वज, आपला देश, आपला धर्म वगैरेंचें फाजील स्तोम माजवून त्यांसंबंधीं भलता अभिमान उत्पन्न करणें असें एककल्ली ध्येय विद्यार्थ्यांचे डोळ्यांपुढें ठेवण्यांत येतें; आणि मुलांचीं अंतः-करणें या 'पूज्य' गोष्टींच्या अभिमानानें भारून टाकण्याचा प्रयत्न करतांना शिक्षक असा कांहीं रंगून जातो, कीं विचाराला न पटणाऱ्या कितीतरी गोष्टी तो मुलांना खऱ्या भासवितो. इंदूचे इतिहासाचे शिक्षक मोठे जाज्वल्य देशाभिमानी म्हणून प्रसिद्ध होते. त्यांचीं शिवजयंति, दासनवमी वगैरे प्रसंगीचीं स्फूर्तिदायक व्याख्यानें मीं ऐकिलीं होतीं. ऐतिहासिक कागदपत्रें, चित्रें, नाणीं वगैरेंचा संग्रह करणें व मुलांना दाखविणें; बखरी, पोवाडे, अस्सल लिखाण वगैरे वाचून दाखविणें; ऐतिहासिक किल्ले, देवळें, शहरें, वगैरे ठिकाणीं मुलांना स्वखर्चानें नेणें; थोर थोर व्यक्तींच्या जयंत्या व पुण्यतिथी साजऱ्या करणें वगैरे कितीतरी गोष्टी ते मोठ्या उल्हासानें करीत, व या सर्वांचा परिणामहि मोठा चांगला होई. पण या चांगल्या परिणामाबरोबरच भावनावश मनावर एक विपरीत परिणामहि झाल्यावांचून राहत नसे; आणि तो म्हणजे त्यामुळें कधीं कधीं सत्यासत्याचा किंवा शक्याशक्यतेचा विचार करण्याचें भान न राहून मन अत्याग्रही किंवा दुराग्रही बनण्याचा संभव फार

असे. हा दोष काढून टाकण्याकरितां मला इंदूशीं पुष्कळ वेळां टीकाकाराची भूमिका घेऊन वितंडवाद घालावा लागे. शिवाजीच्या धर्माभिमानाच्या गोष्टींबरोबरच औरंगजेबाच्या धर्माभिमानाच्या गोष्टीहि सांगाव्या लागत असत. इंग्रजांच्या राज्यलोभाबरोबरच मराठ्यांच्या राज्यलोभाचें प्रदर्शनहि तिच्यापुढें करावें लागे. नाना फडणविसाच्या चातुर्याच्या गोष्टीबरोबरच त्याच्या मनाचा क्षुद्रपणा भासविणाऱ्या गोष्टीहि सांगाव्या लागत. असें करण्यांत माझा हेतु येवढाच होता, कीं आपल्या लोकांचें तेवढें सगळें चांगलें, आपला धर्म तेवढा उदात्त, आपली भाषा तेवढी ललित व सुसंस्कृत असली संकुचित भावना काढून टाकून सत्य, सौंदर्य व सौजन्य– मग तें कोठेंहि व कोणांतहि दिसो— हें तेवढें चांगलें अशी भावना इंदूच्या मनांत उत्पन्न व्हावी. यासाठीं मी तिला निरनिराळ्या जातींच्या, निरनिराळ्या धर्मांच्या व निरनिराळ्या देशांच्या मोठमोठ्या व्यक्तींचीं चरित्रे वाचावयास देई, व सर्वच लोकांबद्दल योग्य तो आदर बाळगावयास स्वतःचे उदाहरणावरून शिकवी. आणि मला सांगायला अभिमान वाटतो, की माझ्या या प्रयत्नांना फळ येऊन इंदूची दृष्टि व वृत्ति तिच्या वयाच्या इतर मुलाचे मानानें पुष्कळच उच्च व उदार बनली आहे.



— ११ —

इंदूच्या शाळेंतील वाचनालय तितपतच होतें. बोलून चालून खाजगी संस्था. शिक्षकांना पोटापुरता पगार मिळण्याची मारामार, तर पुस्तकांत पैसे कोठून घालणार ? आणि जीं कांहीं पुस्तकें होतीं त्यांत 'बालवाङ्मय' या नांवाला साजेशीं फारच थोडीं होतीं. एवंच काय, पोरीला वाचायचा नाद चांगला असूनहि वाचण्यासारखीं पुरेशीं पुस्तकेंच तिला मिळत नसत. आम्हीच काय घरच्या घरीं घेऊन देऊं तेवढीं. पहिल्यांदा मीं तिला सचित्र इसापनीति घेऊन दिली. तींतील गोष्टी तिला फारच आवडत. नंतर मीं तिला बालभारत, बालरामायण, बालभागवत वगैरे पुस्तकें घेऊन दिलीं. मला वाटलें होतें त्यांच्या नांवाप्रमाणें खरोखरच तीं लहान मुलांना आवडण्यासारखीं असतील; पण प्रत्यक्ष अनुभव मात्र निराळा आला. शेजारच्या विनायकरावांपाशीं मीं तसें बोलून दाखविलें असतां ते शाब्दिक कोटी करून म्हणाले, “ अहो बालभारत म्हणजे बालांकरितां भारत असें नव्हे, तर तें भारताचें बाल म्हणजे भारतांतलें सगळेंच त्याच्यामध्यें असावयाचें, पण आपलें थोडें थोडें ! ” आणि ही त्यांची टीका अगदींच अनाठायीं नव्हती. मनोरंजनाच्या भागापेक्षां डोईजड अशा उपदेशाचा भागच त्यांत जास्त. एक आपटे इंदूच्या परीक्षेला फारसे उतरले नाहींत तरी दुसऱ्यां दोघां आपट्यांबद्दल तिचें मत फारच चांगलें झालें होतें. त्यांतले त्यांतहि नारायण हरींपेक्षां हरी नारायणांवर ती अगदीं बेहद्द खूष असे. 'गड आला पण सिंह गेला' ही कादंबरी तर तिची फारच आवडती. तिनें एक गोष्ट लिहिली होती त्यांतील स्त्रीपात्रांचीं नांवें तिनें नेमकीं तींच म्हणजे कमलकुमारी व देवलदेवी अशीं ठेविलीं होतीं. सर्वच्या सर्व अनुकरण करणें बेडौलपणाचें असेल, पण त्याचेमागचा आदर किती खुलून दिसतो ! 'सगुणाबाईचीं पत्रें' तिला फारशीं अवडत नसावींतसें दिसलें. कारण तिनें आपल्या आईला 'आजीदेखील तुला अशींच पत्रें लिहीत असे कां ग ? ' असा साधा पण मार्मिक प्रश्न विचारला. 'अशीं' म्हणजे अशीं कृत्रिम का अशीं चांगलीं कोणास ठाऊक ! मला 'मी' व सौभाग्यवतीला 'पण लक्षांत कोण घेतो' ही कादंबरी विशेष आवडत असे. पण इंदूला त्या तितक्याशा आवडल्या नाहींत. हरीभाऊंच्या सामाजिक कादंबऱ्यांपेक्षां तिला त्यांच्या ऐतिहासिक कादंबऱ्याच एकंदरींत जास्त आवडत. सामाजिक कादंबऱ्या वाचतांना ती 'हें आहे माहीत, हें आहे माहीत'

असें म्हणत व एकीकडे जांभया देत भराभर पानें उलटत पुढें जाई. मात्र ऐतिहासिकांसंबंधीं बोलावयास नको. एकदां रंगली कीं रंगली!

गोष्टी, कादंबऱ्या वगैरे गद्यग्रंथांइतकेच इंदूला हरिविजय, रामविजय, पांडवप्रताप, शिवलीलामृत वगैरे जुने पद्यग्रंथहि आवडत असत. याचें बरेचसें श्रेय शेजारच्या आजीबाईंना आहे. व्यासपीठ घेऊन पुराणिकबुवांसारखा मांडा ठोकून मोठ्या ऐटीनें जेव्हां का त्या हेल काढून मोठ्यांदा वाचावयास सुरुवात करीत तेव्हां आसपासचीं बरींच पोरें जमा होत; व आजीबाईंसारखेंच डुलत डुलत मोठ्या भाविकपणानें अगदीं शेवटपर्यंत ऐकत बसत. खिरापत पुराणाच्या सुरुवातीलाच मिळाली असती तर किती मुलें शेवटपर्यंत बसलीं असतीं कोणास ठाऊक! तें कांहींहि असलें तरी येवढें खास, कीं गोष्टी जात्याच मुलांना आवडण्यासारख्या असल्यामुळें व त्यांतच आजीबाईंच्या गोड सांगण्याची भर पडल्यामुळें मुलें तें पुराण अगदीं तल्लीनतेनें ऐकत असत. मला पहिल्यांदा मोठा प्रश्न पडे, कीं पुराणांतील ते जुने शब्द—जे मोठ्या माणसांनाहि अडतात—एवढ्या अजाणतेपणीं कसे समजतात? पण विचारान्तीं मला कळून आलें, कीं सुटे सुटे व एकेकटे शब्द घेतले तर ते त्यांना समजत नाहीत हें खरें. परंतु गोष्टीच्या ओघांत त्यांचें मन इतकें रंगून गेलेलें असतें, कीं त्यांना सुट्या शब्दांच्या अर्थाची अडचण मुळींच भासत नाहीं.

पुराणांतील आख्यानांची व जुन्या वाक्प्रचारांची साधारण तोंडओळख (का कानओळख?) झाल्यावर मोरोपंतांच्या सावित्री आख्यानासारखीं किंवा रघुनाथ पंडिताच्या नलदमयंती आख्यानासारखीं आख्यानें इंदूला भराभर समजूं लागलीं. त्यांतील अनुप्रास व यमकें तर तिला फारच आवडत—इतकीं कीं, नुसत्या नादानें तिच्या कितीतरी कविता पाठ झाल्या होत्या. त्यावेळचें तिचें अतिशय आवडतें पद्यपुस्तक म्हणजे नवनीत. काव्यांत तिची बरीच प्रगति झाली आहे असें समजून मी तिला आधुनिक कवींचीं कांहीं पुस्तकें वाचावयास दिलीं, व माझी अपेक्षा अशी होती, कीं तीं तिला फारच आवडतील. पण आश्चर्य असे, कीं तीं तिला बिलकुल आवडलीं नाहींत. तिच्या आईनें आपल्या गोड गळ्यानें (इंदूच्या आईचा आवाज अतिशय गोड असून ती भावगीतें तर फारच बहारीनें म्हणते! कवीच्या मनांतील भावन्भाव म्हणणारणीच्या चेहऱ्यावर अगदीं पाहून घ्यावा!) त्यांतील कांहीं कविता गाऊन दाखविल्यावर मात्र त्या तिला थोड्याबहुत आवडूं लागल्या. पण ती

एकटी असली म्हणजे आपलें नवनीत घेऊन बसते आणि असें कां म्हणून विचारलें म्हणजे म्हणते, 'मला म्हणायला त्या आवडतात, वाचायला या आवडतात.'

इंदूचें वाङ्मयाचें वाचन जरी चांगल्यापैकीं होतें तरी तिला वर्गातल्या भाषा-विषयांत तितकेसे मार्क मिळत नसत याचें मला राहून राहून आश्चर्य वाटे. असें कां हें मी एकदां शाळेंत प्रत्यक्ष जाऊन पाहण्याचा बेत केला. एकंदर वेळांत भाषेच्या वाट्याला वेळापत्रकांत ८ तास दिलेले असून २ तास गद्य, २ पद्य २ व्याकरण व २ निबंध अशी यांची विभागणी केली होती. या विभागणींत कांहीं फारशी चूक नव्हती. पण भाषेचे शिक्षक बोलून चालून भाषेचे शिक्षक असल्यामुळें ते शिकवितांना भाषेवरच्च फाजील भर देत असत. वेळापत्रकांत विषय गद्य असो वा पद्य असो, वर्गांत पहावें तों संधि, समास, शब्दार्थ, धात्वर्थ, कर्ता, कर्म, प्रयोग, विभक्ति असलें कांहीं तरी चाललेलें असायचें! कां कधीं त्यांतील सुंदर विचार व कल्पना समजावून देतील, कां कधीं त्यांतील सुंदर भावनांनीं मुलांचें मन भारावतील, कां कधीं रसपरिपोष होईल अशा रीतीनें वाचून दाखवितील, कांहीं नाहीं! शिकाविण्याचा अगदीं एक ठरीव खाक्या! वाक्य घ्यायचें, त्याचें पृथक्करण करायचें, शब्दांना प्रतिशब्द द्यायचा, फार तर शेवटीं वाचून दाखवायचें, कीं संपलें यांचें शिकाविणें! भाषेबरोबरच्च तिच्यांतील वाङ्मय शिकवायचें असतें, व भाषेच्या ज्ञानाबरोबरच्च वाङ्मयाच्या सात्त्विक आनंदाचा लाभहि मुलांना झाला पाहिजे याची शिक्षकां-ना जाणीवहि नसावी! गोष्टी वाचून किंवा कविता म्हणून इंदूला घरीं जो आनंद होत असे तो शाळेंत मुळींच होत नसे. आणि शिक्षक जेव्हां मोठ्या धडाडीनें अन्वयार्थांच्या व व्याकरणाच्या पाळ्या करीत तेव्हां तर बिचारी चीतच होई. जी गोष्ट गद्य-पद्याची तीच निबंधाची. घरीं इंदु गोष्टीहि लिही; पण शाळेंत ते मुद्दे पाडून व मास्तरांनीं सांगितल्याप्रमाणेंच लिहिण्याचें तिला जमेना; आणि त्यांतच्च सर्व शुद्ध लिहायचें! पोर येवढी भिडस्त व आज्ञाधारक, पण या शुद्धलेखनाच्या जाचाला त्रासून तिनें मास्तरांना एकदां विचारलें, कीं 'तुमचेंच कशावरून शुद्ध?' वस्तुस्थिति अशी होती, कीं इंदूच्या शाळेंतील इतिहासाचे शिक्षक जसे देशाभिमानी होते तसे भाषेचे शिक्षक पंडित होते. आणि पंडिताला भाषा समजली म्हणजे वाङ्मयहि समजतें असें थोडेंच आहे! वाङ्मय भाषेंत असतें हें खरें, पण भाषा म्हणजेच वाङ्मय असें नव्हे.

वाङ्मय जसें भाषेंत सामावलेलें असतें, तशीच जिला आपण संस्कृति संस्कृति म्हणून म्हणतों ती मुख्यतः वाङ्मयांत अंतर्भूत झालेली असते; आणि या दोन्ही तिन्ही गोष्टी वाचनानें साध्य होतात. म्हणून योग्य प्रकारच्या वाचनावर व तें योग्य प्रकारें शिकविण्यावर वास्तविक शाळांनीं जास्त भर दिला पाहिजे.

इंदूच्या शाळेत वाचनाच्या सोयींची जी उणीव होती ती खाजगी रीतीनें भरून काढण्याचें मी ठरविलें. आम्हीं प्रत्येकजण निरानिराळें कांहीं ना कांहीं वाचीत असूंच. पण याशिवाय आम्हीं सर्वांनीं मिळून रोज एकत्र बसून कांहींतरी वाचायचें असा परिपाठ पाडला होता. रात्रीचें जेवण झाल्यावर आम्ही तिघेंहि तीन खुर्च्या टाकून गच्चीवर बसत असूं व वर्तमानपत्रांतील रोजच्या महत्त्वाच्या गोष्टी चाळून झाल्यावर कधीं एखादी गोष्ट, तर कधीं कादंबरी, कधीं नाटक, तर कधीं काव्य असें कांहीं ना कांहीं वाचीत असूं. वाचण्याचें कामहि आम्ही आळीपाळीनें करीत असूं. वाचनांतील चुका कोणीं कोणाच्या काढायच्या नाहींत असें जणुं ठरूनच गेलें होतें. तिघांत मीच चांगला वाचीत असलों तर त्यांत कांहीं पुरुषार्थ नाहीं. पण इंदु व तिची आई या दोघींत मात्र कधीं कधीं लेकच आईवर ताण करी. या वाचनाचे वेळीं मधून मधून मुलांचें मन व मोठ्यांचें मन यांतील फरक मोठ्या सुंदर रीतीनें दिसून येई. आम्ही एकदां सत्त्वपरीक्षा नाटक वाचीत होतों, आणि त्यांतील 'आई, माणसं विकतात म्हणजे ग काय' हें रोहिदासाचें भाषण इंदूनें वाचिलें मात्र. ती जी ओक्साबोक्शीं रडूं लागली तें कांहीं विचारूं नका. ती रडूं लागली म्हणून मी हसूं लागलों, व तिची आई हसत हसत रडूं लागली! ती हसत होती लेकीच्या रडण्याला, व रडतहि होती तिच्या रडण्यानें ! पण रोहिदास जिवंत होऊन विश्वामित्राची फजिती झाली तेव्हां इंदूला किती हसूं आलें म्हणून सांगूं? लहान मुलांच्या या हसण्या-रडण्याला माझे मतें अतिशय महत्त्व आहे. त्याचा अर्थ असा, कीं वाचणारा कल्पनेनें पात्राशीं तादात्म्य पावून त्याच्याशीं समरस झाला आहे; आणि लोकांच्या सुखदुःखाशीं समरस होतां येणें, लोकांच्या अडचणी जाणून त्यांचें निराकरण करण्याची इच्छा होणें याचेंच नांव सुशिक्षित व सुसंस्कृत बनणें. शाळा-कॉलेजांतून मुलें शिक्षित बनतील; पण तीं सुशिक्षित किंवा सुसंस्कृत बनतीलच असें नाहीं. तसें असतें तर शाळा-कॉलेजांची संख्या शेंकडोंवारी वाढत असतांना सुसंस्कृत माणसांची संख्या मात्र हातां दोन हातांचे बोटांमध्येंच घुटमळती ना !

एकदां मीं इंदूला विचारलें, " काय ग, तुम्हांला कोणते मास्तर सगळ्यांत जास्त आवडतात ? " ती घुटमळूं व टाळाटाळी करूं लागली तेव्हां मी मनांत समजलों, कीं वास्तविक असला चमत्कारिक प्रश्न विचारून मीं तिला अडचणींत पाडावयास नको होतें. एकाला चांगलें म्हणणें म्हणजे दुसऱ्यांना तितक्या प्रमाणांत कमी लेखण्यासारखें होतें हें तिच्या बालमनालाहि जें समजलें तें मला समजूं नये याचें मला मागाहून वाईट वाटलें. पण मीं त्या वेळीं तरी तिच्याकडून माझ्या प्रश्नाचें उत्तर काढून घेतलेंच. गणिताचे मास्तर सगळ्या मुलांना आवडतात हें ऐकून मला फार आश्चर्य वाटलें. गणितांत नेहमी नेहमीं नापास होणारा तो रामू आपल्या आतां म्हणे उत्तम शिकवतो ! मला इतकें आश्चर्य वाटलें याचेंच इंदूला आश्चर्य वाटलें. आणि माझी खात्री करून देण्याचे इराद्यानें तिनें आपल्या आपटे मास्तरांचे गुण सांगायला सुरुवात केली. " आमचे आपटे मास्तर काय पण गणित शिकवितात ! किती सोपं सोपं करून सांगतात. पहिलं समजल्यावांचून कांहीं पुढं जाणार नाहींत. सगळं काम कसं अगदीं क्रमवार, रेखीव, अन् नीटनेटकं. नाहीं तर आम्हांला मध्यंतरीं आले होते फडके मास्तर ! असे उड्या मारायचे, व यांत काय आहे अन् त्यांत काय आहे असें करून सारखे पुढें धावायचे ! त्यांतूनहि कोणीं अमुक एक समजलं नाहीं म्हणून म्हटलं, कीं त्याच्या अंगावर चिडायचे ! स्वतः पुष्कळ हुशार असतील, पण आम्हांला काय त्याचं ! वर्गांत आल्याबरोबर एकदां ३-४ उदाहरणं घालून ठेवायचे, व मग एकादं पुस्तक किंवा वर्तमानपत्र काढून वाचीत बसायचे ! आम्हीहि जशी कांहीं उदाहरणंच करतों आहों असं दाखवून खुशाल कोर्डी खेळत बसूं. एक मुलगी तर मास्तरांचं चित्रच काढीत बसे. अस्सं मोठं काढायची ! तास संपायचे सुमारास मास्तर पुस्तकांतून डोकें वर काढून घातलेलीं उदाहरणं समजावून द्यायला उठत, तों घंटाच होत असे. आणि एकादंच उदाहरण अर्धमुर्धंच समजावून देऊन स्वारी डोळ्यांवरचा चष्मा कपाळावर ठेवून व खडूचे हात दारावर हापटत लगबगीनें वर्गाबाहेर पडे ! तेच आमचे आपटे मास्तर पाहा ना. सबंध तासभर आपण स्वतः खपून आमचेकडूनहि चांगलं भरभक्कम काम करून घेतात. जमाखर्च करतां यावा व बाजारांतला एकंदर व्यवहार कळावा म्हणून शाळेंतील स्टोअरची व्यवस्था त्यांनीं आमचे वर्गाकडे सोंपविलेली आहे. आट्यापाट्या, खो-खो, लंगडी वगैरेच्या जागा आमचेकडून आखून घेतांना भूमितींतील किती

तरी गोष्टी त्यांनीं आमचेकडून करवून घेतल्या, आणि क्रीडांगणाची व वर्गाची प्रत्यक्ष मोजमाप करून घेऊनच त्यांनीं क्षेत्रफळ, घनफळ वगैरेच्या कल्पना आणून दिल्या. तसेंच शिकवितांना मधून मधून अशा कांहीं गमती करतात, कीं त्यामुळं हसून हसून पोट दुखायची पाळी येते. पण त्यामुळं हातांतील काम करायला किती हुरूप येतो. शाळा सुटल्यावर आम्ही खेळतों तेव्हां आपटे मास्तर आमच्यांतच खेळतात. शनिवारीं-रविवारीं कोठें ट्रिप काढायची असो, आम्हा मुलांमुलांच्या वक्तृत्वाच्या चढाओढी असोत, किंवा कसले उत्सव-समारंभ असोत, आपटे मास्तर आम्हांला सांगासवरायला त्यांत आहेतच. अन् प्रेमळ तर किती म्हणून सांगूं ? वर्गातलं कोणी आजारी पडलं, कीं चालले आपटे मास्तर आम्हांला घेऊन त्याच्या समाचाराला. कितीतरी गरीब मुलांची फी, पुस्तकांचा खर्च आपटे मास्तर चालविताहेत ! ”

रामभाऊ मास्तरांचें हें शब्दचित्र ऐकून मला किती तरी आश्चर्य वाटलें. ते इतके चांगले आहेत या गोष्टीचें आश्चर्य तर वाटलेंच; पण मुलांना मास्तरांचे गुणदोष इतक्या ठळक रीतीनें समजतात याहि गोष्टीचें आश्चर्य वाटलें. तीं बोलून दाखवीत नाहींत—आतां तेंहि एक प्रकारें बरेंच आहे—म्हणून त्यांना ते समजतच नसतील अशी भ्रामक कल्पना आपण आपल्या मनाची उगीचच करून घेत असतों. आपटे मास्तरांचे गुण इंदूनें आणखीहि सांगितले असते; पण ते सांगतां सांगतां फडके मास्तरांच्या दोषांचा उच्चारहि तिच्याकडून वारंवार होणारच; आणि तें इष्ट नाहीं असा मनाशीं विचार करून मीं कांहींतरी दुसरा विषय काढून पहिला तेथेंच थांबविला. इंदूच्या आईनें हें ओळखलें व माझ्याकडे पाहून म्हणते कशी, “ कां,—आतां कां विझवाविझवी करतां ? ठिणगी लावण्याचे अगोदरच विचार करायला पाहिजे होता ? ” ‘ झालं खरं असं. ती आग कांहींतरी बरी होती; पण हा फुपाटा मात्र सहन होईलसं दिसत नाहीं.’ असें कांहींतरी म्हणत व अंगावर आलेली बाजू विनोदानें परतविण्याचा प्रयत्न करीत मी तेथून कसा तरी निसटलों.

-- १२ --

एके दिवशीं संध्याकाळीं इंदु शाळेंतून आली ती नेहमींसारखी हसत-खेळत न येतां चेहरा जरा गोरामोरा करून आली; व माझ्यापुढें तिनें दुरूनच एक लिफाफा फेकला. मी मनांत समजलों, कीं स्वारी जरा गरम झाली आहे! पाकीट फोडून पाहतों तों आंत तिच्या इंग्रजीच्या शिक्षकांची सही दिसली. 'आपण घरीं मुलीला इंग्रजी शिकवीत असल्याचें समजतें, तरी कृपा करून यापुढें तसें करूं नये. वर्गांतल्या शिकवण्यांत व घरच्या शिकवण्यांत फरक पडतो; व शिस्तीच्या, पद्धतीच्या, प्रगतीच्या वगैरे सर्वच दृष्टींनीं तें इष्ट नसतें. आज दोन दिवस Window शब्दाचा शुद्ध उच्चार तिला शिकवीत आहें, पण पहिलें अशुद्ध वळण अद्याप सुटत नाहीं, आणि नवें शुद्ध वळण लागत नाहीं. मुलीला घरीं शिकविण्यांत आपली कळकळच दिसते; पण पालकांची असली कळकळ पुष्कळ वेळां अनाठायीं असते. तरी गैरसमज करून घेऊं नये. मुलगी एरवीं फार चांगली आहे.'

पालक व विद्यार्थी या दोहोंसंबंधीं शिक्षकांची जी वृत्ति पत्रांत प्रतिबिंबित झाली होती ती पाहून शिक्षकासंबंधीं गैरसमज तर झाला नाहींच, पण उलट त्यांचेबद्दल आदर मात्र वाटूं लागला. पत्र बाजूला करून मी इंदूला काय झालं म्हणून विचारूं लागलों. ती अद्याप अर्धवट रागांत असल्यामुळें जरा फणकाऱ्यानेंच मला म्हणते, 'मला काय विचारतां? त्यांत सगळं लिहिलेलंच असेल कीं. का पुन्हा एकदां माझ्याच तोंडून वदवून घ्यायचं आहे?' आणि खरोखरच तिला पुनः एकदां गरगरून भरून आलें! झालेली फजिती किंवा घडलेला अपराध स्वतःचे तोंडून वदवून दाखवायला लागणें यासारखी मानी माणसाला दुसरी शिक्षाच नाहीं! मीं तिला सहज विचारलें, पण तें तिला फार वाईट लागलेलें दिसलें. मीं ती वेळ तशीच जाऊं दिली. दुसऱ्या दिवशीं सकाळीं तिचें दुःख ओसरून ती पुन्हा नेहमींसारखी एखादी गोष्ट शांतपणें ऐकून घेण्याच्या मनःस्थितींत आल्यामुळें मीं आदल्या दिवशींच्या प्रसंगासंबंधीं बोलणें काढलें. तिनें मला पुनः जरा गहिंवरून येऊन विचारलें, "माणसाचा एखादा उच्चार चुकला तर वर्गांत त्याची येवढी फजिती करावी का हो, नाना? नाहींतरी त्यांना उच्चाराचं भलतंच वेड आहे! तसंच इंग्रजीच्या तासाला म्हणे 'एकसुद्धां मराठी शब्द उच्चारायचा

नाहीं, नाहींतर वर्गांतून घालवून देईन' ! इंग्रजी कळलं नाहीं तर मराठींत नको का हो त्याचा अर्थ विचारायला ? " आणि जरा थांबून व थोडेंसें हसून पुढें म्हणते कशी " एरव्हीं एक साधा सद्रा व खादीची टोपी घालून वावरतील, पण इंग्रजीच्या तासाला मात्र कोट-विजार नि बूट चढवून बोडक्यानींच वर्गांत येतील. काय पण ध्यान ! " डोळ्यांतले थेंब गालांवर तसेच ओले असतांनाच ती मोठ्यांदा हसली व तेथून निघून गेली.

हा नागव्या पावसाचा काव्यमय देखावा पाहून मला फारच मजा वाटली. शिक्षकाच्या इंग्रजीवरच्या प्रेमाचें व शिकवितांना इंग्लिश् वातावरण उत्पन्न करण्याच्या सोसाचें कौतुक करूं का मुलीच्या मानी व खिळाडू वृत्तीचें कौतुक करूं असें मला होऊन गेलें. माझ्या नेहमींच्या वृत्तीप्रमाणें मी विचार करीत बसलों. उच्चारासंबंधीं इतकें कडक व्हायला पाहिजे का ? एकाद्या गुजराथी माणसानें 'रामः'या शब्दाचा विसर्गान्त उच्चार करण्याऐवजीं 'रामह' असा हकारान्त उच्चार केला असतां आपल्या कानाला किती वाईट लागतें ? किंवा गोष्टींतल्या सोनारा-प्रमाणें एकादा सोनार 'मी पोणार आहें' असं बाह्मणी ऐटीनं सांगतो तेव्हां आपल्याला किती हसूं येतं ? तसेंच आपल्या चुकीच्या उच्चारांचें साहेब लोकांना हसूं येत असलें पाहिजे. मग ते शुद्धच रीतीनें करावयास नकोत काय ? पण आपणांला कोठें साहेब लोकांशीं फारसें बोलायला जायचें आहे ? आणि साहेबांसाहेबांत तरी उच्चारांसंबंधीं कोठें एक मत आहे ? तसं जर असतं तर कोषांत तरी एकाच शब्दाचे दोन दोन उच्चार कशाला दिले असते ! आणि ज्या शब्दाचे दोन उच्चार संभवतात त्याचा आणखी एकादा तिसरा उच्चार कां संभवूं नये ? इंग्रजीच्या तासाला मराठी बिलकुल बोलायचें नाहीं या निर्बंधाचा इंदूला भारी राग आला. आणि एकाद्या शब्दाचा किंवा वाक्याचा अर्थ समजला नाहीं तर मराठींतून नको का तो समजावून द्यावयाला असं तिचं म्हणणं. एका अर्थानें तिला राग येणें बरोबर आहे. पोपटासारखें तोंडानें पुष्कळ इंग्रजी बोललों, व लोकांचें फाडफाड बोलणेंहि कानांनीं ऐकलें, पण अखेर आपण काय बोलतों किंवा लोक काय म्हणतात हें जोंपर्यंत समजलें नाहीं तोंपर्यंत त्याचा काय उपयोग ? इंग्रजीनेंच इंग्रजी समजावून देण्यांत किती वेळ घालवायचा ? आणि किती यातायात करायची ? तेंच इंग्रजींतील कल्पना मराठींत चट्दिशीं समजावून देऊन काम नाहीं का भागणार ?

पण मास्तरांचें म्हणणेंहि बरोबर नाहीं का ? मराठींत अर्थ समजावून देण्याची एकदां सवलत दिली, कीं तीच चाल पडून प्रत्येक शब्दाचें व वाक्याचें मनांत भाषान्तर करण्याची दुष्ट खोड लागते. आणि स्वतः बोलण्याला किंवा लोकांचें ऐकून घ्यायला वास्तविक जो वेळ लागायचा त्याच्या दुप्पट वेळ भाषान्तराच्या संवयीमुळें लागणार. आणि खरं पाहिलं तर भाषान्तर करून का कधीं कोणी भाषा शिकलं आहे ? कोणतीहि भाषा शिकतांना दुसऱ्या भाषेची मदत लागायचीच असें असतें तर माणसाला मुळीं बोलतांच आलें नसतें. केव्हांहि काय सुरुवातीला एकच भाषा असणार ! आमच्याकडे एकदां एक मनुष्य नोकरी मागण्याकरितां आला. त्याला सौभाग्यवतीनें विचारलें पूर्वी कोठें काम केलें आहेस काय ? तो मनुष्य त्रासून म्हणाला जो तो मला हाच प्रश्न विचारतो ! प्रत्येकजण जर मला कामाचा पूर्वीचा अनुभव नाहीं म्हणून नकार देऊं लागला तर मला पहिला अनुभव तरी केव्हां येणार ? कोणींतरी मला पहिला अनुभव नसतांनाच कामावर ठेवले पाहिजे. या त्याच्या युक्तिवादानें मात्र खूष होऊन आम्हीं त्याला कामावर ठेवलें, व त्याला हवा असलेला पहिला अनुभव दिला ! कांहींशी अशीच स्थिति या प्रत्यक्ष पद्धतीनें शिकण्याची होत आहे. लहान मुलें आपली भाषा आपल्याच भाषेंत शिकत नाहींत काय ? झालें. विचारसरणी अश्या रीतीनें वाहूं लागतांच मुलीच्या म्हणण्यापेक्षां मास्तरांचें म्हणणेंच मला अधिक पटूं लागलें. शिक्षकाला शिकविण्याची हौस असेल आणि पडणारे श्रम घेण्याची त्याची तयारी असेल तर त्यानें याच पद्धतीनें शिकवावें. मात्र एकाद्या सुंदर कल्पनेचें स्वारस्य ती इंग्रजींतून मांडल्यामुळें समजणें शक्य नसेल तर मात्र तें मराठींतून समजावून देण्यास त्यानें मागेंपुढें पाहतां कामा नये. हें जमणार नाहीं त्यानें या भानगडींत पडूं नये; पण त्यानेंहि इंग्रजी संभाषणाचा उपयोग करून मुलांना थोडेंसें अडखळत व चुकीचेंहि का होईना पण जास्त बोलण्याला धीर व अवसर द्यावा.

मास्तरांच्या कोटपाटलुणीचें जसें इंदूला हसूं आलें तसें मलाहि प्रथम आलें हें खरें. तिनें तसें बोलून दाखविलें नाहीं तरी तिला तें आचरटपणाचें व मुद्दाम केल्यासारखें वाटत असावें. पण खरं पाहिलं तर त्या 'आचरटपणांत'हि थोडासा तथ्यांश नाहीं का ? गोल्डस्मिथ का दुसऱ्या कोणातरीसंबंधीं म्हणतात there was method in his madness. तसंच या मास्तरासंबंधीं

म्हणतां येईल. समजा कीं, एकादा पुराणिक कोटपाटलूण घालूनच पुराण वाचूं लागला; किंवा तसें तरी कशाला ? संस्कृत शिकवणारा शास्त्री उद्यां डोक्यावर हॅट् ठेवून शिकवूं लागला तर तेंहि नाहीं का चमत्कारिक वाटणार ? आणि या चमत्कारिक दिसण्याच्या भीतीनेंच माझे थोरले बंधु शास्त्री आहेत ते कधीं काचाहि मारीत नाहींत. धंद्याधंद्याचे व प्रसंगाप्रसंगांचे पोषाखहि ठरलेले आहेत, आणि त्या ठरलेल्या पोषाखाचा परिणामहि चांगला झाल्यावांचून राहात नाहीं. पोषाखानें एक प्रकारचें अनुकूल वातावरण निर्माण होतें आणि या अनुकूल वातावरणाचा शिक्षकानें उपयोग करून घेण्याचा प्रयत्न केला तर त्यांत हसण्यासारखें कांहीं नसून त्याच्या योगानें उलट त्याची आस्थाच दिसून येते.

पण हें सर्व इंदूला समजावून देण्यांत कांहीं अर्थ नव्हता; तिला तें कळण्यासारखें नव्हतें, आणि कळण्यासारखें असलें तरी ती त्या वेळीं कळून घेण्याच्या मनःस्थितींतहि नव्हती. उच्चाराच्या बाबतींत शिक्षकानें आपली चारचौघांत फजिती केली या विचारानें तिचें मन गढूळ होऊन गेल्यामुळें तिच्या दृष्टीला शिक्षकांतील इतर गुण आतां मुळींच दिसण्यासारखे नव्हते. आणि म्हणून तर विद्यार्थ्यांचें आपल्याबद्दलचें मत कायमचें चांगलें राहील अशी खबरदारी शिक्षकांस नेहमीं घ्यावी लागते. एकाद्या बाबतींत जरी तें बिघडलें तरी तें सगळ्याच बाबतींत बिघडण्याची फार भीति असते.

असले बरेचसे दोष इंदूच्या शाळेंत असतांनाहि तेथील एकंदर कार्य समाधानकारकच होतें असें म्हणावें लागतें. परीक्षेंतील निकाल, खेळांतील प्राविण्य, मुलांची वागणूक वगैरे सर्व बाबतींत शाळेबद्दल लोकांचें मत फार चांगलें होतें. असें कां असावें याचा विचार करतांना २-३ विशेष गोष्टी माझ्या लक्षांत आल्या. संस्थांचें बरेंचसें यशापयश, जिला परंपरा किंवा पूर्वपीठिका म्हणतात ती, असण्यावर किंवा नसण्यावर अवलंबून असतें. परंपरेच्या ओघाबरोबर वाईट किंवा हलकट गोष्टी वाहून जाऊन चांगल्या व भरीव तेवढ्याच टिकून राहतात असें म्हणतात, व या टिकून राहिलेल्या गोष्टींचा नवीन येणाऱ्या गोष्टींवर एक प्रकारचा परिणाम होऊन मागाहून आलेल्या गोष्टी जुन्यांत सामावून जातात. पहिल्या हेडमास्तरांनीं ज्या कांहीं गोष्टी केल्या त्या शाळेच्या धारणेला पोषक ठरल्यामुळें दुसऱ्या हेडमास्तरांनींहि त्या गिरविल्या, त्यांचेंच अनुकरण तिसऱ्या हेडमास्तरांनींहि केलें; व अशा रीतीनें शिस्तीचें एक वळण किंवा धोरण पडून गेलें. ही पूर्वपीठिका कोणीं कांहीं

फारशी लिहून ठेवलेली नसते. ती एका कारकीर्दींतून दुसरींत व दुसरींतून तिसरींत अशी सरस्वती नदीप्रमाणें गुप्त रीतीनें वाहत असते. आणि त्याच्यांतच तर तिचें सौंदर्य व सामर्थ्य दिसून येतें. ही परंपरा ज्या संस्थेंत आहे तेथें सर्व गोष्टी कश्या सुयंत्र चाललेल्या दिसतात. शाळेनें पहिल्यापहिल्यांदा मिळविलेल्या नांवाचाहि तिच्या प्रगतीवर फार मोठा परिणाम होत असतो. आपल्या शाळेंतील मुलें पास व्हावयाचींच, आपल्या शाळेला खेळांत यश मिळावयाचेंच असें जणूं प्रत्येक मुलाचे कानांत आंतून कोणी तरी सांगत असतें. आणि याचा परिणाम त्याला न कळत त्याचे वागणुकीवर होत असतो. विद्यार्थांना शाळेबद्दल वाटणाऱ्या अभिमानाचाहि तसाच परिणाम होतो. आम्हीं अमक्यांनीं काढलेल्या शाळेचे विद्यार्थी आहोंत आणि म्हणून आम्ही सर्व एकच आहों अशी ऐक्याची भावना उत्पन्न होऊन सुट्या सुट्या व्यक्ति एकात्मतेनें बद्ध होतात. आपण वातावरण म्हणतों त्याचाहि प्रभाव असाच आहे. एका मोठ्या तत्त्वज्ञान्यानें म्हटलें आहे, कीं मुलांना नुसत्या चांगल्या संस्थेंत घाला, आणि मग मुलें तेथील वातावरणानें आपोआपच सुविद्य होतील. मुलांच्या संख्येचाहि शाळेवर फार मोठा परिणाम होत असतो. येवढीं मुलें ज्या अर्थी तेथें जाताहेत त्या अर्थी तेथें तसेंच कांहींतरी विशेष असलें पाहिजे असें प्रत्येकाला वाटत असतें. आणि नुसत्या विश्वासावर किंवा श्रद्धेनें तो तेथें जात असतो. याचेच योगानें मुलांमध्यें चांगल्या प्रकारची अहमहमिका उत्पन्न होते व या अहमहमिकेचा जसा त्या व्यक्तीवर परिणाम होतो तसाच तो सबंध शाळेवरहि होतो.

---

— १३ —

हा सबंध आठवडा सुटीचा होता. इंदु व तिची आई इंदूच्या आजोळीं राहायला गेल्या होत्या. मुलांमाणसांत राहिलेला मी मनुष्य, ५।६ दिवस एकटें राहण्याचा प्रसंग आल्याबरोबर लगेच कंटाळून गेलों. लिहिणार किंवा वाचणार तरी किती? त्यांत फार तर २-४ तास जातील. कोणालाहि काय दिवसाचा सगळाच्या सगळा वेळ व सबंधच्या सबंध आठवडा तर त्यांत घालतां येणें शक्य नाहीं. कांहीं जुनींपानीं कामें काढून पाहिलीं, पण जुन्या कामांबरोबर जुन्या आठवणी आठवून कामांत गढून जाण्याऐवजीं आपल्या एकलेपणाची जाणीवच जास्त जोरानें व्हावी. इंदूची पेटी काढून वाजवूं लागलों. तिच्याबरोबर १-२ चिजा वाजवायला शिकलों होतों, परंतु तें शिकणें स्वतः शिकण्याकरितां नसून मुलीला शिकावेंसें वाटावें म्हणून सुरू केलें असल्यामुळें तिला स्वतःला त्यांत गोडी वाटूं लागल्याबरोबर माझें पुढें शिकणें बंद झालें होतें. मोठमोठीं माणसें त्यांना रोजच्या ठराविक कामाचा कंटाळा आला म्हणजे घरांतील मुलांशीं किंवा बागेंतील फुलांशीं खेळून आपली करमणूक करून घेतात असें मीं ऐकलें होतें. अमेरिकेचे प्रेसिडेंट रूझवेल्ट् व्हाइट् हाऊसमधून निघाल्याबरोबर तडक घरीं येत व आपल्या मुलांना आपल्या पाठीवर स्वार करून आपण घोडा होत. ( जर्मनीचा कायझर रिकामपणच्या वेळांत लांकडें फोडतो म्हणतात ! ) आमचें घरांत एक मूल, पण तेंहि घरीं नव्हतें. तेव्हां आतां बागेंत जाऊन मनाची करमणूक करून घ्यावी या इराद्यानें खुरपें व गुलाब छाटायची कात्री घेऊन बागेंत गेलों. पण माझा वेळ जात नाहीं, व तो घालविण्याकरितां म्हणून मी मोठ्या माणसांच्या ऐटीनें हें काम करीत आहें ही जाणीव मनाच्या पाठीशीं असल्यामुळें बागेंतील कामाकडे मुळीं म्हणून लक्ष लागेना. आणि तशांतच नखांत शिरलेली माती खुरप्याचे टोंकानें काढीत असतांना माती न निघतां जिव्हाळी मात्र लागली. खुरप्यानें कां कोणी नखांतली माती काढीत असतें ! मुलीनें व विशेषतः बायकोनें जर कां असला आचरटपणा केला असता, तर मीच किती रागावलों असतों ! पण आतां मला कोण रागें भरणार ! निदान रागें भरायला तरी त्या दोघी येथें हव्या होत्या असें मला वाटलें. नखांतून रक्त तें किती वाहणार ! जास्तींत जास्त नखभर ! पण तेवढ्यानें जीव काय हल्लक व्हायला लागला, रडूं काय येऊं लागलें, ताप भरेलसें काय वाटूं लागलें ! खुरपें भिरकावून देऊन कॉट्वर येऊन पडलों.

नखाचें नुसतें निमित्त होतें तें. खरें वाईट वाटत होतें तें एकटेपणाचें. स्वतःचें सुख दुसऱ्यावर किती अवलंबून आहे? जोंपर्यंत भोंवतालीं चार माणसें आहेत किंवा एक ठराविक पोटापाण्याचें काम चाललें आहे तोंपर्यंतच आमचें मन गुंतलेलें राहून आम्हांस सुख लागणार ! पण कांहीं कारणानें या गोष्टी जराश्या नाहींश्या झाल्या म्हणजे आमचे हाल कांहीं विचारूं नका. आम्हांला लहानपणीं पोटापाण्याचा उद्योग करण्याचें शिक्षण मिळालें. (आतांच्या मुलांना तेंहि मिळत नाहीं.) पण निव्वळ पोटाच्या उद्योगांत दिवसाचा असा कितीसा वेळ जाणार? पोटाच्या उद्योगाव्यतिरिक्तचा वेळ कसा आनंदांत घालवायचा हें आम्हांला कधीं कोणी शिकविलें आहे? पोटाचा उद्योग करीत असतांना सुशिक्षित, अशिक्षित सर्वच सारखे असतात. अशिक्षितां-सुशिक्षितांत खरा फरक पडतो तो ते आपला एरवींचा रिकामा वेळ कसा घालवितात यांतच पडतो. अशिक्षित आपला वेळ झोंपेंत, गप्पांत किंवा एखाद्या व्यसनांत घालवील. सुशिक्षित तो गायन, वादन, चित्रकला, लेखन वगैरे प्रकारच्या कलाकुसरींत, किंवा खेळण्यासवरण्यासारख्या हितकर नादांत, किंवा आणखी एखाद्या उपयुक्त छंदांत घालवून स्वतःला सुख लावून घेतो व दुसऱ्यांनाहि देतो. नुसत्या पोटापाण्याचें, किंवा समाजांत वावरतांना समाजाला सुख कसें द्यावयाचें व त्यापासून स्वतःला सुख कसें प्राप्त करून घ्यावयाचें याचेंच शिक्षण देऊन भागणार नाहीं. तर मनुष्य एकटा असतांना सुद्धां त्याला आपलें जीवित आनंदांत कसें घालवावें याचेंहि शिक्षण द्यावयास पाहिजे. आणि हें एकदां साधलें म्हणजे त्या आनंदाला कांहीं पारावार नाहीं. वेदान्तांत आत्मानंद म्हणतात तो हाच असून तो प्राप्त करून घेण्याची खटपट करा, स्वतःच्या सुखाकरितां नेहमीं दुसऱ्यावर अवलंबून राहूं नका हेंच मला वाटतें वेदान्ताला सांगायचें असतें.

या असल्या आत्मपर विचारांतून बाहेर पडण्याकरितां कांहींतरी करायला हातीं घ्यावें म्हणून पलंगावरून उठणार तोंच दारांतून पोस्टमननें एक पाकीट टाकलें. सौभाग्यवतीचें—निदान इंदूचें तरी—पत्र आलें असावें म्हणून आतुरतेनें पाहूं लागलों, तों तें आमच्या व्यंकटरावांचेंच निघालें. तरी कांहीं हरकत नाहीं असें म्हणून फोडून वाचूं लागलों, तों काय ! माझ्या विचारांचीच साथ व्यंकटराव आपल्या पत्रांत करीत असल्याचें दिसून आलें. आज दैवाचे मनांतून मला पुरें खिजवायचें होतें खास ! व्यंकटराव पेन्शन् घेऊन नुकतेंच नाशकास जाऊन राहिले होते. पेन्शनरांचें गांव, हवापाणी उत्तम, भाजीपाल्याची

चंगळ, दूधदुभत्याची ददात नाहीं, पेन्शनहि पोटभर, वगैरे सर्व कांहीं ठीक होतें. आणि दुसरे कितीतरी लोक त्यांचा हेवा करीत असत. व्यंकटरावांचें पत्र सहसा येणार नाहीं; आलें तरी 'पाठीमागचा कामाचा लकडा जाऊन पूर्ण विश्रांति मिळत असल्यामुळें मी हल्लीं फार सुखांत आहें, तुम्हांलाहि लवकरच पेन्शन् होऊन या सुखाचा अनुभव घेतां येवो' अशा कांहींतरी मजकुराचें येईल अशी अपेक्षा होती; पण सगळा अदमास चुकला. एका क्षणापूर्वी माझे जसले विचार चालले होते तेच वाढवून व सुधारून व्यंकटरावानें आपल्या पत्रांत ध्वनित केले होते.

'...... पूर्वी मरायलाहि फुरसत नसे, आतां फुरसुतीमुळेंच मरण येणार कीं काय असें वाटूं लागलें आहे. नोकरी केली ती सर्व पोटाच्या तरतुदीकरतां केली. पण एकट्या पोटाची तरतूद केली म्हणजे सर्व आयुष्याची तरतूद झाली असें मात्र नाहीं. पोट म्हणजे कांहीं सबंध मनुष्य नाहीं. पोटाशिवाय मनुष्याला मन, आत्मा वगैरे आणखी किती तरी गोष्टी आहेत. आणि पोटाप्रमाणें त्यांचीहि तरतूद आपणांस करतां आली पाहिजे. पूर्वीं ऑफिसच्या कामांतच मी इतका गढून जाईं, कीं दिवस कधीं उजाडला, व कधीं मावळला याचें मला भानहि नसे. पण आतां तें बाहेरून लादलेलें काम संपल्याबरोबर सगळा दिवस कसा उजाड वाटतो. वर्तमानपत्रें, चहा, झोंप, पेशन्स् असल्या गोष्टींत मन कितीसें व किती वेळ रमणार ? मनाला ऑफिसच्या कामाशिवाय दुसरा कसलाच नाद लागला नाहीं, आणि तें काम संपल्याबरोबर मी कसा बेकार व निकामी झालों आहें ! पुष्कळ वेळां वाटतें कीं अफू खाऊन किंवा दारू पिऊन अगदीं धुंद होऊन पडावें ! म्हणजे या रिकामपणाची जाणीव तरी होणार नाहीं. आणि असें वाटतां वाटतां मीं खरोखरच एक दिवस दारू पिण्याला सुरुवात केली तर माझें मलाहि आश्चर्य वाटणार नाहीं. परलोकाची तरतूद केली पाहिजे असें मानण्याइतका निवृत्तिपर वृत्तीचा मी नाहीं. पण आतां असें मात्र खास वाटूं लागलें आहे, कीं पुढच्या जन्मीची तरतूद जरी या जन्मीं केली नाहीं तरी याच जन्माच्या अपराह्णकाळाची तरतूद तरी प्रत्येकानें आपल्या आयुष्याच्या पूर्वाह्णकाळीं करायासच पाहिजे. नाहींतर वेड लागून आत्महत्या करण्यापर्यंतहि मनाची मजल जाईल !'

व्यंकटरावांचें पत्र वाचून झाल्यावर घरांत बसणें शक्यच नव्हतें. आणखी

एकादा दुःखी प्राणी आपल्या रिकाम्या जिण्याची कहाणी सांगायला यायचा! शॉर्ट कोट चढवला, बूट पायमोजे घातले, डोक्यावर टोपी जरा तिरकी ठेवली, आणि कोपऱ्यांतील काठी हातांत घेऊन ती फिरवीत व तोंडानें शीळ वाजवीत वाजवीत जिमखान्याकडे जायला निघालों! पण मनांतून मात्र सारखें वाटत होतें, कीं नानबा ही सारी उसनी ऐट आहे!

झालेल्या सर्व प्रकाराचें एक पत्र इत्थंभूत लिहून व त्यालाच व्यंकटरावांचें पत्र जोडून मीं तें सबंध पाकीट दुसऱ्या दिवशीं साताऱ्यास सौभाग्यवतीकडे पाठविलें. त्या दोघी परत घरीं आल्यावरहि तें त्यांना दाखवितां आलें असतें. परंतु पाकीट मोठें दिसावें, व तें फोडण्यापूर्वीं तरी आंत खूप मजकूर आहे असें समाधान इंदूच्या आईला क्षणभर तरी व्हावें या इराद्यानें तें मीं पाठविलें होतें. पत्राचें उत्तरहि लगेच आलें. त्यांत इंदु तेथें गाण्याबजावण्यांत कशी अगदीं गढून गेलेली असते, फुंकण्यांचे पडदे, तोरणें, जाळीचे रुमाल वगैरे शोभेच्या वस्तु आपल्या धाकट्या माम्यांना कशी शिकविते, व खेळकर आणि थट्टेखोर स्वभावानें इतर मुलांची कशी करमणूक करते, आजोबा-आजीबाई तिचें कसें कौतुक करतात, मात्र थोरल्या मामी तिला येवढी मोठी झाली तरी घरांतलें कांहीं फारसें समजत नाहीं म्हणून कश्या हिणवतात वगैरे मजकूर होता; व शेवटीं "आम्हीं दोघींनीं लवकर निघून यावें म्हणून तर हें एकलकोंडेपणाचें सोंग केलें नाहीं ना? तसें असेल तर आम्ही लवकर येण्याऐवजीं जरा उशीरांच येऊं." असा अर्धवट खरा व अर्धवट थट्टेचा मजकूर होता. थट्टेचा म्हणण्याचें कारण असें कीं, पत्र संपवून सही होते न होते तोंच मुद्दाम ता. क. घालून तिनें लिहिलें होतें 'आम्ही बहुतकरून येत्या बुधवारीं-गुरुवारीं निघतों. मात्र मध्यंतरीं कांहीं अडचण आलीच तर रविवारपर्यंत येतां येणार नाहीं.' पत्रांतील आनंदाचें व थट्टेचें हसूं ओसरून गेल्यावर इंदूला खरोखरच घरांतलें कांहीं समजत नाहीं कीं काय असा गंभीर विचार मनांत येऊं लागला; पण त्याचें आतांच नको, एकदां सगळी हकीगत ऐकून घेऊन मग त्यासंबंधीं कांहीं विचार करायचा असल्यास करूं असें ठरवून मी बुधवारच्या तयारीच्या विचाराला लागलों.

---

एकदांचा बुधवार उजाडला. १२ चे सुमारास गाडीवरून माणसें येण्याची वाट होती. इंदु व तिची आई आज जश्या नक्की येणारच अश्या खात्रीनें मोलकरणीला रजा दिली होती तरी बोलावून घेऊन ७-८ दिवसांचा सांचलेला सगळा केर काढवला. कोंपऱ्यांतला कपबश्यांचा ढीग साफ करवून व चहा केलेल्या पातेल्या लख्ख घासून व पुसून कपाटांत ठेववल्या. बाराच्या बारा चमचे जमवून ठेवले. (बायकांना चमच्यांचें भारी वेड असतें.) तिन्ही चारी कंदील, स्टँड, व स्टोव्ह पुसून व भरून ठेववले. इंदूला कोबीची भाजी व तिच्या आईला भोपळ्या-मिरच्या आवडतात म्हणून त्या मंडईतून घेऊन आलों! जादा दूध मागवलें. टेबलावरचा व उश्यांचे अभ्रे बदलून मळक्या कपड्यांचें गांठोडें परटाकडे रवाना केलें. फुलदाणींतील निर्माल्य काढून टाकून तींत ताजीं फुलें भरून ठेवलीं. गुळगुळीत दाढी करून व जरा साबणाबिबण लावून स्वच्छ स्नान केलें. इंदु भुकेलेली येणार म्हणून, व खरें म्हणजे तिच्या आईला चकित करून सोडा-यचें म्हणून तिघांचा कुकर लावला, व कोबीची भाजीहि मधून मधून चाखून पाहत तयार करून ठेवली. गाडी येण्याचे सुमारास स्वच्छसे कपडे करून स्टेशनवर गेलों. गाडीस लेट तर नाहीं ना म्हणून चौकशी केली, व 'मिस्टर राइट् टाइम बाराच आहे, येवढे उतावीळ कां?' अशी स्टेशनमास्तरकडून संभावना करून घेतली! घड्याळांत कांट्यावर काटा आला, अंगावरहि आला! घंटा झाली. इंजन दिसूं लागलें. हमालांनीं इंजनला नमस्कार केला, माझाहि हात अर्धवट वर गेला. इंदूचा हात खिडकीबाहेर दिसूं लागला. सौभाग्यवती फळीवरची ट्रंक काढीत असलेली पाठमोरी दिसली. धांवत्या गाडीबरोबर जोराजोरानें चालूं लागलों. ड्रायव्हरच्या डब्यापर्यंत सर्व डबे पाहिले. एकदम 'राइट अबाउट् टर्न्' करून गार्डचे डब्यापर्यंत गर्दीगर्दीनें मागें गेलों. बायकां-च्या डब्याशीं घोंटाळलों. हीच ना साताऱ्याकडची गाडी म्हणून गार्डला विचारून पाहिलें, व त्याच्या भलत्यासलत्या उत्तराची वाट न पाहतां तडक गेटपाशीं आलों. तेथेंहि मंडळी नाहींत असें पाहून टांग्यांच्या घोळक्यांत शिरलों; व तेथेंहि कोणी नाहीं असें पाहून पायींच रखडत घरीं आलों!

पुढचें कशाला सांगत बसूं? भाजी कढत राहावी म्हणून शेगडीवरच ठेवली होती ती बुडाला लागली; भातहि बराच वेळ कुकरांत राहिल्यामुळें जरा पिच-

पिचित झाला होता. कसे तरी दोन घांस खाऊन व भांडीं तशींच कोंपऱ्यांत सारून कॉट्वर येऊन पडलों. अर्थात् सगळे विचार सकाळपासून चाललेल्या प्रकारा-संबंधींचेच होते. 'आपलीं प्रिय माणसें लवकरच येणार म्हणून वाटत असलेली आशा आणि तीं तशीं आलीं नाहींत म्हणून झालेली निराशा—दोहींचाहि दैवानें चांगलाच अनुभव दिला! उद्यां आतां जायचें नाहीं, आणि रविवारीं तरी कशाला जायचें? का त्यांना घर माहीत नाहीं? का स्टेशन्पासून घरापर्यंत येतांना वाटेंत कोणी आडवणार आहे? आणि कोणीं आडवलेंच तर मी तरी काय करणार आहे? उगीच स्टेशनवर जा आणि वेळ व पैसा खर्च करा येवढें सांगितलें आहे कोणीं? आज भूर्दंड पडला तेवढा बस् झाला. नाहींतरी आपलें फारच होतें! लोकांना काय बायकामुलं नसतात कीं काय? आणि त्यांना नकोत का या गोष्टी आतां स्वतःच्या स्वतःला करतां यायला?' असे कांहींतरी विचार मनांत चालले होते. तितक्यांत गजाऊ आली, आणि 'हें पहा रविवारीं बाई आणि इंदुताई येणार आहेत तोंपर्यंत तूं आली नाहींस तरी चालेल' असें सांगून तिला हसऱ्या तोंडानें परत पाठविली. रविवारीं त्या येईतों पुन्हा स्वराज्य उपभोगण्याचा बेत केला, अन् पूर्वीप्रमाणें वागूं लागलों. पुन्हा भांड्यांनीं व कपबश्यांनीं कोपरा भरूं लागला. टेबलावर वर्तमानपत्रांचा व मासिकांचा ढीग जमला. दाढी करण्याचा कंटाळा येऊं लागला. मळलेले कपडे बदलण्यांत दिरंगाई होऊं लागली! एक दिवस अजिबात लंघन, एक दिवस नुसतींच फळें, एक दिवस एक गुजराथी हॉटेल, असे तीन दिवस तीन प्रकार केले. घरांत लक्ष नाहीं, कांहीं गंभीर प्रकारचें वाचन नाहीं, आलेल्या पत्रांना उत्तरें नाहींत, सकाळीं अंथरूण गुंडाळलें नाहीं, व अर्थातच रात्रीं घातलेंहि नाहीं. दारावरच्या पाटीवरील 'आउट्' तसेंच राहून गेलें.

अश्या स्थितींत ते दोन-तीन दिवस गेले. या एकंदर प्रकाराचें आतां आश्चर्य वाटत आहे, पण तेव्हां या सगळ्या गोष्टी अगदीं स्वाभाविक होऊन गेल्या. घरांत आपलें असें कोणी नसलें म्हणजे माणसाच्या हातून त्याची इच्छा नसतांहि असलें औदासीन्याचें वर्तन कां घडत असतें हें या चार दिवसांच्या अनुभवानें प्रत्ययास आलें. विधवा बायका दुपारीं एकदांच कां जेवतात, रात्रीं जेवल्या तरी दुपारच्या शिळ्यावर कां भागवतात, देहाच्या साध्या गरजाहि त्यांना कां पुर-वाव्यासें वाटत नाहीं या सर्वांचें कारण अगदीं उघड आहे. माणसाला संसारांत उल्हास व उत्साह वाटण्यास कोणी तरी जवळचें लागत असतें खास!

उद्यां रविवार, उद्यां मंडळी येणार अशा विचारानें शनिवारीं अगदीं सुस्त व गाफील होतों. इतक्यांत दाराशीं टांगा थांबला. दरवाजावर टक् टक् असा आवाज झाला. 'येस्' म्हणून आंतूनच पडल्या पडल्या उत्तर दिलें, अन् इंदु व तिची आई एकदम आंतमध्यें डोकावल्या! 'आँ! आज कश्या?' असें म्हणत उठलों. माझी वाढलेली दाढी, तो सांचलेला केर व कोपऱ्यांतला तो कपूबश्यांचा ढीग पाहून त्या दोघीहि मोठ्यानें हसूं लागल्या. मीहि त्या हसण्यांत सामील झालों, पण मनांतून मात्र यांनीं मला अश्या अचानक रीतीनें पकडलेलें पाहून खजील झालों. झालें, घरांतील लक्ष्मी घरीं परत आल्याबरोबर जिकडे तिकडे पुन्हा ऊन्ह पडल्यासारखें चक्क दिसूं लागलें. सौभाग्यवतीचा सर्व दिवस पतिराजांनीं केलेल्या प्रतापांची निस्तरानिस्तर करण्यांत गेला. मीहि मला न कळत जरा चांगला वागूं लागलों. रात्रीं सौभाग्यवतीची गांठ पडल्यावर तिनें माझी या अस्ताव्यस्त प्रकाराबद्दल चांगलीच हजेरी घेतली. 'दोन दिवस आम्ही नव्हतों तर लगेच घराला धर्मशाळेची कळा आली! बायकांना हसायला काय होतें? मला तरी एकदां पुरुषांचें, ते एकटे असले म्हणजे कसे वागतात, हें पहायचेंच होतें. तुम्हीच ना म्हणतां, कीं माणसानं एकटेपणीं सुद्धां संसारांत आस्थापूर्वक वागलं पाहिजे म्हणून? अन् आतां'? "अग, देव्हाऱ्यांत देव आहेत तोंपर्यंत त्यांचें सौंदर्य नि पावित्र्य! मुमताज गेल्याबरोबर ताजमहालाचीं सुद्धां जर अशी स्थिति होते, तर आपल्या घराची काय कथा?" असें-कांहींतरी काव्यात्मक बोलून वेळ मारून नेली. "बरं, तें असो. तुमचं तर सगळं ठीक झालं ना? सर्व खुशाल? आजोबांची तब्येत काय म्हणते? आजीबाईंचें पुराण-बिराण सर्व यथास्थित? इंदूनं म्हणे दोघांवर भारी इंप्रेशन मारलं? लक्षुंमामींना मात्र तिचं वागणं आवडलं नाहीं ना? केलन् काय इंदूनं असं?" असे कितीतरी प्रश्न मीं एकदमच विचारले!

ती सबंध रात्र अशीच गेली. सुटी संपून सोमवारीं इंदु शाळेंत गेल्यावर मागच्या सगळ्या गोष्टी क्रमाक्रमानें पुन्हा निघून इंदूच्या तिथल्या वागण्याबद्दलचा प्रश्न निघाला. "नाहींतरी शिकलेल्या मुलींचं थोडंसं चुकतंच. त्यांची ती पुरुषी मिजास, स्वैच्छाचारी वर्तन, सोळ्याओळ्याचा व उष्ट्याखरकट्याचा विधिनिषेध नसणं, घरांतल्या कामांत मुळींसुद्धां लक्ष नसणं, अश्या गोष्टी सगळ्यांनाच कश्या खपणार? ही आपली भाजीबिजी चिरायचं सोडून सकाळच्या वेळींसुद्धां वर्तमान-पत्रं नाहींतर कादंबऱ्या वाचणार! पुरुषांशीं लगट करणार, ओचे पदर फलका-

वीत मिरवणार, अन् सारखी नटणार-मुरडणार! कामाला बोट देखील लावणार नाहीं. हें तिच्या माम्यांना कसं खपणार? माहेरवाशीण झाली म्हणून काय झालं? इंदु एक दिवस सकाळीं तोंडबिंड कांहीं न धुतांच झोपाळ्यावर बसली, आणि तोंडानं 'डोळे हे जुलमी गडे, रोखुनी मज पाहूं नका' हें गाणं घोळून घोळून म्हणूं लागली. दादा तिथंच समोर पूजा करीत बसले होते, ते आईला हाक मारून म्हणतात कसे 'अहो, ऐकलंत का? तुम्ही हं गाणं एकदां शिकून घ्या; आणि मला पाहून म्हणत जा. त्या भूपाळ्या आणि तें व्यंकटेशस्तोत्र आतां बस् झालं!' दादा हें सर्व हसत हसत व डोळे मिचकावीत म्हणाले खरे. आम्हीहि सर्वजणी हसलों. ते इतके उदार मनाचे पण त्यांना देखील असल्या गोष्टी वेळीं अवेळीं केलेल्या आवडत नाहींतसें स्पष्टपणें दिसलें. मीं इंदूला एकीकडे बोलावून जरा दाबलें, पण जो गुण बाळा तो जन्मकाळा. एक-दोन दिवस जरा वचकून होती, पण पुन्हा आपलं येरे माझ्या मागल्या! तुमचीच तिला फूस, माझ्या एकटीच्या हातून ती कितीशी सुधारणार? तुम्ही जातां ममतेनं करायला पण या मुलींना कांहीं तें समजत नाहीं, अन् त्यांना वाटतं आपण करतों तें सगळंच बरोबर. वेळ काळ व माणूस पाहून नको का वागायला? नेहमींच अगदीं खालीं मान घालून व मुक्यानं वावरूं नका. मोकळेपणानं बोला-बसा, शिका-सवरा; पण हें काय? किती झालं तरी आपण बायका आहोंत ही जाणीव सोडून कसं चालेल? वास्तविक मुलांनीं सुद्धां असं वागून चालणार नाहीं, मग ही तर काय मुलगीच! लहानपणींच लग्नं करायचीं नाहींत अन् सासरीं जायचं नाहीं हें खरं, पण केव्हांतरी लग्न व्हायचंच ना? अन् सासूसासरा नसले तरी नवरा असणारच ना? अन् त्याचा संसार चालवावा लागणारच ना? का जन्मभर एकटंच राहायचं आहे? अन् एकटं राहायचं ठरविलं तरी माणसांतून तर निघून जायचं नाहीं ना? एकट्या पशूप्रमाणं रानांतच राहायचं असल्यास गोष्ट निराळी, माणूस मग कसं का वागेना!"

इंदूच्या आईचा बरेच दिवसांचा साठलेला राग बाहेर पडून ती आणखी कितीतरी बोलली असती. वास्तविक तीं जुन्या वळणांत वाढलेली होती, आणि नवराहि तसाच जुन्या वळणाचा मिळाला असता तर तें तिला जास्त आवडलं असतं. पण माझ्यावरच्या व इंदूवरच्या प्रेमानं तीच आमचं सर्व आवडून घेत होती. नवऱ्याला व मुलीला बरं वाटावं म्हणून तिनं आपल्या

सर्व आवडी-निवडी बाजूला ठेवल्या होत्या. केवढा हा तिचा स्वार्थत्याग! आम्ही मात्र तिच्याकरितां असला कसलाच स्वार्थत्याग केला नव्हता.

तो दिवस तसाच गेला व हळूहळू ते विचारहि तिचे मनांतून निघून गेले; पण माझें तसें नव्हतें. एकादी गोष्ट माझ्या सहसा लक्षांत येत नाहीं. पण कोणीं ती तशी आणून दिली म्हणजे ती लवकर जातहि नाहीं. इंदूच्या वागण्यांत चुकत असलें पाहिजे खास; आणि तें मलाच सुधारावयास पाहिजे होतें हेंहि खास. चांगलीशी संधि साधून मीं या गोष्टी इंदूजवळ काढल्या. तिच्याहि मनांत त्या डवचत होत्या. मीं बोलणें काढतांच ती रडूं लागली. मेलेल्याला काय मारायचें आहे असें वाटून माझ्याच्यानेंहि जितकें बोलायचें योजलें होतें तितकें बोलवलें नाहीं. इंदु पुढें कांहीं दिवस गंभीर दिसत असे. ती आपलेकडून सुधारण्याचा बराच प्रयत्न करीत होतीसें दिसलें. जुन्या माणसांचा मुलींच्या नटण्यामुरडण्यावर मोठा कटाक्ष! पण तें वयच तसें नटण्यामुरडण्याचें नाहीं काय? वसंत ऋतूंत वृक्षलतासुद्धां पानां-फुलांनीं नटत नाहींत काय? पक्ष्यांनाहि सुंदर सुंदर रंग व पिसारे येत नाहींत काय? मग इंदूलाहि केसांचा सुंदर भांग काढावासा, किंवा रंगी-बेरंगी पातळें नेसावींशीं किंवा पावडर लावून आपला काळेपणा अंशतः तरी झाकावेंसें वाटलें तर त्यांत बिघडलें कोठें? जुन्या बायकांना तरी सुंदर दिसणें व नटणें-मुरडणें आवडत नव्हतें असें थोडेंच आहे? त्याहि त्या वेळच्या चालीप्रमाणें कांजळ-कुंकू मारवून अथवा भिवयांत किंवा हनवटीवर गोंदून घेऊन सुरूप दिसण्याचा प्रयत्न करीत नव्हत्या का? आतां इंदु नाकांत चमकी व कानांत कुडीं घालते, त्याहि बायका नथबुगड्या घालून आपले नाककान सुशोभित करीत नव्हत्या का? आतां इंदु खऱ्या गुलाबाचें फूल घालून भोंवतालीं हिरवीं पानें बसविते. त्याहि बायका त्या राखड्या, तीं फिरकीचीं फुलें, तीं अग्रफुलें घालून केसांना शोभा आणीत नव्हत्या का? तात्पर्य काय, सौंदर्य वाढविण्याची भावना नेहमींचीच व सर्वच प्राण्यांत दिसून येते. जुन्या-नव्यांत फरक पडत असेल तर तो नटण्याच्या तऱ्हांमध्यें पडलेला आहे. पूर्वीच्या तरुण मुली नटत नव्हत्या, व आतांच्याच तेवढ्या नटूं लागल्या आहेत असें नाहीं. यच्चयावत् प्राणी आपलेकडून बरें दिसण्याचा प्रयत्न करीत असून तो तसा करतो म्हणूनच जग चाललें आहे असें म्हणावें लागतें.

---

नटण्या-मुरडण्यासंबंधींचे हे माझे विचार इंदूचे आईला अर्थातच फारसे आवडले नाहींत. पण तसें स्पष्टपणें न सांगतां 'मग म्हणतां हें असंच चालायचं' असें अर्धवट प्रश्नार्थी व अर्धवट स्वार्थी वाक्य म्हणून ती घरांत वेणीफणी करायला गेली. 'नुसतं चालायचंच नव्हे, तर चाललंच पाहिजे' असें म्हणत मीहि दाढी करण्याच्या उद्देशानें आरशापुढें बसलों. दाढी करून व स्नान करून उद्योगाच्या विचारानें टेबलापाशीं जाणार तों सौभाग्यवती बाहेर आली. तिचा तो त्या वेळचा चेहरा, पोषाख वगैरे सगळंच कांहीं इतकं विलक्षण दिसलं, कीं मी एकदम 'आँ! हें ग काय? हा कुठला अवतार' असें उद्गारलों. 'कां? अवतार कसला? मींहि आजपासून असंच वागायचं ठरवलं आहे. तुम्हांला आवडतं ना असलं नीटनेटकं अन् छान दिसणं?' तिचा तो मुद्दामच वांकडा काढलेला भांग, कपाळाला व गालांना फासलेली पावडर, कपाळावरील कुंकवाच्या मूळच्या चवलीयेवढ्या पांढऱ्या डागाखालीं दोन भिवयांमध्यें रेखून लावलेली मसुरीच्या डाळिंबीयेवढी बारीकशी टिकली, अस्मानी रंगाची गुजराथी साडी व तसलाच ब्लाऊज, देवी सरोजिनीसारखा लांब पाठभर पदर, व छातीवरील रुंद सोनेरी पिन, पायांतील पांढऱ्या पट्ट्याच्या पातळ चपला वगैरे अपटुडेट् पोषाख पाहून मला अतिशय हसूं लोटलें! मनांत घोळत असलेल्या प्रश्नाची दुसरी बाजू दाखवून मला गप्प बसविण्यासाठीं तिनें ही युक्ति योजिली होती हें मी थोड्याच वेळांत उमगलों. 'कां—आतां कां हसतां? माणसांनीं नटलं-मुरडलं तरच जग चालतं असं तुम्हीं आतांच सांगितलंत ना?' असें म्हणून आतां कसे तुमचेच दात तुमच्याच घशांत घातले अशा भावनेनें मजकडे पाहत ती हसूं लागली.

तिच्या त्या मुग्ध भावनेचें व खिळाडू वृत्तीचें कौतुक वाटून मीं तिचे दोन्ही हात धरले व तिला माझ्यासमोरच्या खुर्चीवर बसाविलें. 'असें चिडून कसें चालेल? माझ्याशीं युक्तिवाद करून माझी समजूत घाल ना? मी म्हणालों तें इंदूच्या वयाच्या मुलींसंबंधीं म्हणालों. तुझ्यासारख्या मोठ्या बायकांचे संबंधानें बोललों नाहीं. आतां नटून तुला काय करायचं आहे? नटण्याचा काळ व त्याचें कार्य आतां तुझ्या बाबतींत राहिलें नाहीं. प्रेमानं अंकित केल्यावर व दोन मुलंबाळं झाल्यावर असल्या बाह्य सौंदर्याची गरज तितकीशी उरत नाहीं. योग्य काळीं नटणं

जितकं चांगलं दिसतं, तितकंच अकालीं नटणंहि वाईट दिसतं. म्हाताऱ्या घोडीला लाल लगाम कशाला? मी, सर्व बायकांनीं सर्वच वेळीं नटावें असें कसें म्हणेन? तसा तुझा समज झाला असल्यास तो गैरसमज आहे' असें कितीतरी प्रकारें समजावून दिलें. माझी ती कांहींशी थट्टेची, कांहींशी गंभीर, व कांहींशी काकुलतेची मुद्रा पाहून तिची ती खिजवण्याची वृत्ति ओसरली, व ती आंत गेली. उभ्या उभ्याच आपला नेहमींचा पोषाख करून ती ताबड-तोब बाहेर आली; व 'एकदां आपण मोकळेपणानें पुन्हा बोलूं या' अश्या निश्चयाच्या दृष्टीनें माझ्यासमोरच्या खुर्चीवर बसली. 'मग नटण्यामुरडण्यांतहि वयोमान व काळवेळ पाहिला पाहिजे असं तुमचं म्हणणं? बरं, इंदूच्या त्या घरांतल्या कामासंबंधींच्या टाळाटाळीबद्दल काय आहे आपलं म्हणणं?' असें म्हणाली व भिवया किंचित् वर चढवून ती मजकडे प्रश्नार्थी मुद्रेनें पाहूं लागली. तिच्या प्रश्नाच्या उत्तराकडे लक्ष जाण्याचे ऐवजीं तिच्या त्या 'तुमचं', 'आपलं' या शब्दांकडेच माझें लक्ष गेलें. मला कसें संबोधायचें यासंबंधीं तिचा नेहमींच गोंधळ होत असे. मला ती कधीं आधुनिक स्त्रियाच्या सलगीनें 'तुम्ही' म्हणत असे, तर कधीं जुन्या वळणावर जाऊन 'आपण' म्हणत असे. अद्याप 'अरे, तुरे'पर्यंत पाळी आली नव्हती यांतच मी खूष होतों. बाकी त्यालाहि माझी तयारी होतीच म्हणा. माझेंहि तसेंच होत होतें असें आतां माझे लक्षांत आलें. अगदीं बरोबरची म्हणून कधीं कधीं तोंडांतून 'तूं' येतें; तर तिच्या (का त्यांच्या?) व्यक्तिमत्वाबद्दल आदर वाटून कधीं 'तुम्ही' येतें. पण तें असो.

"बरं विचारलंस! मनुष्यानं काम करायलाच पाहिजे. मग तेथें स्त्री-पुरुषं मुलगी-मुलगा वगैरे भेदाभेद करण्याचं कांहींच कारण नाहीं, आणि तूं पाहिलं असलंस, तर मी स्वतः कामाची कधींच टाळाटाळ करीत नाहीं, असं तुला दिसून आलं असेल. पण मुली पुढं सासरीं जाणार म्हणून त्यानीं काम केलं पाहिजे, मुलगे किती झालं तरी स्वतंत्र व मिळवते व्हायचे असतात म्हणून त्यांनीं काम करूं नये असं जेव्हां तुम्ही ध्वनित करतां, व त्यामुळं मुलींत जो पहिल्यापासूनच एक प्रकारचा हीनभाव व मुलांत जो अहंमन्यपणा—मूजोर-पणा—उत्पन्न करतां तो मला नको आहे. आणि असल्या प्रतिक्रियारूप विचारा-चे भरांत मी काय किंवा माझ्यासारखे दुसरे नवमतवादी लोक काय मुलींनींहि मुलांप्रमाणेंच वागावें असें म्हणतात. शिवाय पुढें लग्न झाल्यावर आपल्याला

विनयानें, अदबीनें, खालच्या नात्यानें वागायचें आहे, म्हणून लग्नाचे अगोदर-पासूनच त्याची संवय व तयारी करावयास पाहिजे असें नाहीं. तुरुंगांत गेल्यावर आपल्याला माती मिसळलेली भाकरी खावी लागेल म्हणून घरींसुद्धां का तसली भाकरी खाण्याला सुरुवात करायची आहे ? ती वेळ व तो प्रसंग प्रत्यक्ष आला म्हणजे त्या वेळीं करायच्या गोष्टी आपोआप सुचतात व साधतात. मी तर असं म्हणेन, कीं बिचाऱ्यांना लग्नानंतर काम करायाचंच आहे म्हणून अगोदर तरी जरा सुखांत राहूं द्या. पुढें करायच्या प्रत्येक गोष्टीची संवय अगोदरपासूनच करायची म्हटलें तर सबंध जन्म मरणाची तयारी करण्यांतच घालवावा लागेल ! तुलाच असं वाटतं असं नाहीं, तर मोठ-मोठ्या विचारी लोकांचीहि यासंबंधींची दृष्टि अशीच आहे. पुढच्या आयुष्या-ची तयारी करण्यांत मागचें आयुष्य घालविण्यापेक्षां विद्यमान आयुष्याला अनुरूप अशा ज्या कांहीं गोष्टी असतील त्या करण्यांतच तें घालविणें अधिक बरें नव्हे काय ? बाल्य, यौवन, तारुण्य, प्रौढत्व, वार्धक्य या सर्व अवस्था व्यक्तिशः स्वतंत्र असून त्या प्रत्येकीचा आपआपल्या परीनें विकास झाला म्हणजेच सर्व जन्माचें सार्थक झालें म्हणायचें. कळीकडे फुलाच्या दृष्टीनें पाहिलें असतां ती अपूर्ण दिसते. परंतु कळी म्हणूनच पाहिलें असतां तिच्यां-तील पूर्णत्व व सौंदर्य आपणांस प्रतीत होईल. मूल चांगलं मूल होईल, तरुण चांगला तरुण होईल, प्रौढ चांगला प्रौढ होईल अशी आपली दृष्टि असावयास पाहिजे. उलट आमचं सर्व शिक्षण लहान मुलाला मोठा माणूस बनविण्याच्या विचारांत व खटपटींत आहे ! तसं करूं पाहणं म्हणजे विनायकाचा वानर करण्यासारखं आहे."

मी आणखीहि कांहीं उपमा दाखले वगैरे देऊन हें तत्त्व सौभाग्यवतीच्या अगदीं गळीं उतरविण्याचा प्रयत्न करणार होतों, पण तिला तें पटलें म्हणून म्हणा, किंवा माझ्या या पुस्तकी बोलण्याचा तिला कंटाला आला म्हणून म्हणा, तिनें 'बरं तें असो' असें म्हणून पुरें करण्याचा इशारा दिला. ती खुर्चीवरून उठली तेव्हां आतां ही जाणार असें मला वाटलें; पण खुर्चीच्या पाठीवर रेलून व फोटोंतल्यासारखें उभें राहून ती मला पुन्हा विचारते. 'एकूण इंदूनें कामाला बिलकुल हात लाविला नाहीं तरी चालेल असेंच ना तुमचें म्हणणें ? पण मग प्रत्येकानें स्वतःचें काम स्वतःच केलें पाहिजे, माणसें स्वावलंबी बनलीं पाहिजेत, काम करण्यांत कमीपणा न वाटतां उलट मोठेपणाच

वाटला पाहिजे, वगैरे गोष्टी मला सांगण्यांत येतात त्यांचा अर्थ काय? कां बायकोचे बाबतींत एक तत्त्व अन् मुलीचे बाबतींत दुसरें?' या तिच्या स्पष्ट प्रश्नाला मींहि तितकेंच स्पष्ट उत्तर दिलें, कीं 'या सगळ्या गोष्टी खऱ्या. मुलगी व बायको यांत या बाबतींत तरी भेदभाव करण्याचें कांहींच कारण नाहीं. माझें म्हणणें इतकेंच, कीं ज्या गोष्टी मुलींनीं कराव्या अशी तुम्ही अपेक्षा करता त्या सर्व वास्तविक मुलग्यांनींहि करावयास पाहिजेत. पण तुम्ही मुलग्यांना मात्र सूट देतां, अन् मुलींना देत नाहीं यावर माझा सर्व कटाक्ष आहे. शिवाय भावी हिताच्या आशेनें आतां कष्ट करायला तयार होणें हें मुलग्यांना काय किंवा मुलींना काय कोणालाच शक्य नसतें. चालू व वर्तमान सुखदुःखांचा विचार करून सुखें प्राप्त करून घेणें किंवा दुःखें टाळणें येवढेंच त्यांना शक्य असतें. आणि म्हणून त्यांना पुढच्या दृष्टीनें कामाला लावणें हिताचें होणार नाहीं. त्यांचेकडून काम करवून घ्यावयाचें झाल्यास त्यांना मोठ्या माणसांबद्दल जें प्रेम व जी सहानुभूति वाटत असते, जें सहकार्य करावेंसें वाटत असतें, व जें कांहींतरी करावेंसें जात्याच वाटत असतें, त्यांचा फायदा घेऊनच करून घेतलें पाहिजे. नुसती आज्ञा करून किंवा नुसती भीति दाखवून कांहीं होणार नाहीं.'

मी हें बोलत आहें आणि सौभाग्यवती उभ्या-उभ्याच पण शांतपणें सर्व ऐकून घेत आहे अश्या स्थितींत 'आई ग, स्वयंपाक झाला, अंग धुवायला चल ना?' असें म्हणत कणकीच्या हातानेंच इंदु आंत डोकावली व निघून गेली. बराच उशीर झाला आहे, हें समोरच्या घड्याळावरून दिसतच होतें. पण आज रविवारच आहे, आणि एकदां केव्हां तरी हें बोलायला पाहिजेच अश्या भावनेनेंच जणुं आम्ही दोघे इतका वेळ बोलत बसलों होतों. न सांगतांच इंदूनें सर्व स्वयंपाक केला या गोष्टीचा त्या वेळीं आम्हांला विशेषच आनंद झाला. तें जसें तिच्या सुधारण्याचें प्रत्यंतर होतें तसेंच तें मी सांगत असलेल्या गोष्टीचेंहि होतें असें नव्हे का? इंदूची आई माझेकडे पाहून व किंचित् हसून केस सावरीत निघून गेली.

इंदूच्या या शाळेंत एक 'बालभाषिणी' सभा होती; ( 'बालभाषिणी सभा' हें बहुतेक तेथील भाषाशिक्षकानें 'डिबेटिंग् सोसायटी' या शब्दांचें भाषान्तर केलें असावें. ) आणि सभेंत बोलण्यासवरण्यांत इंदु बराच भाग घेत असे. तिला म्हणजे चांगलें बोलतां येत असे असें नाहीं. पण निदान 'आपण वाईट तरी बोलत नाहीं' अशी जाणीव तिला असल्यामुळें ती कधीं माघार घेत नसे. एकादा गुण प्रत्यक्ष अंगीं नसला तरी निदान त्याचा अभाव तरी आपणांमध्यें नाहीं या जाणीवेचा परिणामहि मुलांच्या मनावर कांहीं कमी चांगला होत नाहीं. उलट तशी जाणीव नसेल तर जन्मभर त्यांना 'आपण फार कमी दर्जाचे आहों, आपल्या हातून कांहीं होणें नाहीं, आपलें नशीबच असें, आपण फुकट जन्माला आलों,' अशासारखे विकृत विचार मनांत येऊन आपल्या हीनत्वाची त्यांस सारखी बोचणी लागलेली असते.

इंदु एके दिवशीं आपल्या मैत्रिणीचें आलेलें पत्र हातांत घेऊन मी माझीं पत्रें चाळींत बसलों होतों तेथें आली; आणि 'बिचारी मनी' ! असें केंविलवाण्या सुरांत म्हणत तिनें तें पत्र मजपुढें टाकिलें. इंदूनें शाळेंत नुकत्याच झालेल्या वक्तृत्वसमारंभाचें वर्णन करून तिनें स्वतः त्यांत जो कांहीं थोडासा भाग घेतला होता त्यासंबंधीं मनीला पत्रानें कळविलें होतें व त्याला उद्देशून मनीचें पत्र आलें होतें. तिनें इंदूचें अभिनंदन करून 'आमचें मात्र कांहींच धड नाहीं, वास्तविक आपण दोघीहि वर्गांत सारख्याच गोष्टी सांगत असूं, पण पुढें तूं सभांमधून बोलणें चालू ठेवलेंस, आणि मी मात्र कायमची मागें पडलें ! असो—आपल्याला साधलें नाहीं तें निदान आपल्या मैत्रिणीला तरी साधत आहे हेंहि समाधान कांहीं थोडें नाहीं' असें लिहिलें होतें. मनी वास्तविक इंदूच्याच वयाची, पण इतक्या पोक्तपणाचें पत्र लिहितें याचें मला चमत्कारिक व वाईटहि वाटून मी इंदूपाशीं तिच्याबद्दल जास्तच विचारपूस करूं लागलों. अशाच एका भाषणप्रसंगीं वाटतें मनी फार चांगलें बोलेल व वर्गाचें नांव करील अशी तिच्या वर्गशिक्षकांची व सर्व मुलांची अपेक्षा होती. पण ती बोलतां बोलतां अडखळली व त्याबरोबर मुलें हसलीं ! मुलें हसलीं त्याचें तिला इतकें वाईट वाटलें नाहीं; पण शिक्षकानें तिला हिणवण्यासाठीं 'ब—ब—ब—बसा' असें मुद्दामच तोत्रेपणानें वेडावलें हें तिला अतिशय सललें, व

तेव्हांपासून तिनें सभेंत बोलणें जें टाकलें तें कायमचेंच टाकलें! इंदूनें सांगितलेली ही माहिती मी तिच्या आईला जरा गंभीरपणानें सांगूं लागलों; पण तिला ती अगोदरच माहीत असल्यामुळें माझ्या सांगण्याचें तिला कांहींच न वाटतां उलट ती कशीशीच हसावयाला लागली! मी ओशाळलेला पाहून तिनें आपलें हसूं चटकन् दाबलें व आपल्या अप्रासंगिक थट्टेचें वाईट वाटल्याचें चेहऱ्यावर दाखवून ती स्वतःला माहीत असलेली पुढची माहिती मला सांगूं लागली. "त्या दिवसापासून मनी कायमचीच तोत्रें बोलायला लागली. येवढेंच नव्हे तर तिचें शाळेंतील अभ्यासावरचें लक्षहि उडून जाऊन शेवटीं ती परीक्षेंत नापास झाली, आणि आतां तिच्या आईबापांनीं तिला आपल्या मामाकडे पाठविली असून ते तिला तिकडे स्थळें पाहताहेत."

मनीची ही कहाणी ऐकून मला फारच वाईट वाटलें. कमीपणाच्या एका ठिणगीनें तिच्या सबंध शिक्षणाची—व कदाचित् सबंध जन्माचीहि—राखरांगोळी होणार ना? या एका प्रसंगावरून मला आणखी कितीतरी तसल्याच प्रसंगांची आठवण झाली. आमच्या वेळेला आमच्या कॉलेजमध्यें एक धुळ्याचे गृहस्थ होते. मनुष्य एरवीं किती हुशार व चांगला; पण मनानें एकदां घेतलें कीं आपण कुरूप आहों! सारखा आरशांत चोरून पाहायचा, चेहरा सारखा साबणानें साफ करायचा, पण सुरूप कांहीं येईना अन् मनांतला कमीपणा कांहीं जाईना! झालें. आपण आपल्या बायकोला आवडत नाहीं, तिचें आपल्यावर प्रेम नाहीं, मग निष्प्रेम जगांत जगायचें तरी कशाला? येथपर्यंत विचारांची मजल गेली. साक्रेटिसाच्या बसक्या नाकाचें, बेथोवेनच्या खाटकासारख्या चेहऱ्याचें, जॉनसन्च्या थुलथुलीतपणाचें, वेबस्टरच्या टेंगळांचें वगैरे मोठया माणसांतील कुरूपतेचीं कितीतरी उदाहरणें घेऊन आम्ही त्याची समजूत करण्याचा प्रयत्न करूं! पण कमीपणाच्या जाणीवेनें मनांत जें एकदां ठाण मांडलें तें कांहीं केल्या हललें नाहीं.

एका पारशी विद्यार्थिणीचीहि तीच स्थिति. तिच्या वरच्या ओठावर एक चामखीळ होता. तो दिसूं नये म्हणून तिनें तोंडावरचा रुमाल कांहीं कधीं दूर केला नाहीं! आपल्याला लोक हसतील म्हणून ती कधीं पुढें आली नाहीं, कधीं कोणाशीं बोलली नाहीं! आणि अजूनहि लग्न वगैरे कांहीं एक न करतां किंवा दुसराहि कांहीं धंदा न करता ती एकलकोंडें आयुष्य कंठीत असल्याचें समजतें. वास्तविक एका चामखिळामुळें किंवा बटबटीत डोळ्यांमुळें किंवा

थबकड्या नाकामुळें सबंध शरिरांत कांहीं व्यंग उत्पन्न होतें किंवा त्याच्या शरिरावर कांहीं घातुक परिणाम होतो अशांतली गोष्ट नाहीं; आणि त्याची जाणीव तीव्रतेनें होण्याचा प्रसंग आला नसता तर हींच माणसें संसारांत किती सुखी व कर्तृत्ववान् झालीं असतीं. पण कोणा तरी महात्म्यानें आपल्या मूर्खपणानें त्या दोषांची जाणीव करून देऊन त्यांस कायमचें दुःखांत लोटण्याचें पुण्य संपादन केलेलें असलें पाहिजे खास.

बाहेरच्या फिरतीवर असलेली दृष्टि स्वतःकडे वळली, आणि आपल्याहि हातून इंदूचे बाबतींत असें कांहीं होत नाहीं ना याचा शोध करूं लागली. तिच्या काळेपणाला उद्देशून मीं गडकऱ्यांच्या भावबंधनांतील इंदूप्रमाणें आमचीहि एक इंदु आहे असें एकदोनदां थट्टेनें म्हटल्याचें आठवलें; पण इंदूंत खिळाडूवृत्तीच जास्त असल्यामुळें 'राम, कृष्ण वगैरे देव काळेच होते' असें उलट म्हणून तिनें हसण्यावारीच गोष्टी नेल्या होत्या. तिला आपल्या काळेपणाची जाणीव होऊं नये व त्या जाणीवेमुळें होणारा विपरीत परिणाम टळावा म्हणून आम्ही हल्लीं हल्लीं तिच्या रूपांतील चांगल्या गोष्टींचेंच कौतुक करीत असूं. पण पुन्हा या कौतुकाचाच कांहीं वाईट परिणाम होणार नाहीं ना असाहि उलट विचार मनामध्यें येऊं लागला. हो, करतां काय! आगींत पडूं नये म्हणून जरा जास्त मोठी उडी मारावी, तों नेमकें फुपाट्यांत पडण्याची पाळी यायची! आणि यासंबंधींचींहि उदाहरणें डोळ्यांपुढें दिसूं लागलीं. माझ्या मामेबहिणीचीच गोष्ट अशी नव्हती का झाली? 'पोर काय सुंदर आहे, पोर काय नक्षत्र आहे, पोर काय गोड आहे', असें माझ्या मामामामींनीं सारखें म्हणावें; व या त्यांच्या म्हणण्यानें फुशारून अगोदरच सुंदर असलेल्या पोरीनें जास्तच सुंदर दिसण्याचा प्रयत्न करावा! इतका कीं, सुंदर दिसण्यापलीकडे व त्याकरितां नटण्यामुरडण्यापलीकडे तिला दुसरें कांहीं सुचूंच नये! धुळेंकर मित्राप्रमाणें तिच्याहिपाशीं नेहमीं एक आरसा असायचा, व ती नेहमीं त्यांत आपली छबी पाहत बसायची! कपाळावर रुळणारी बट जरा ढळली तर नाहीं ना, बोलतांना होणारी भिवयांची कमान कमी बांकदार तर होत नाहीं ना, हसतांना पडणारी गालावरची खळी उथळ तर होत नाहीं ना, असल्या विवंचनेंत ती सदा असायची. परिणाम असा झाला, कीं सौंदर्य हेंच काय तें जीवित-सर्वस्व अशी चुकीची कल्पना होऊन तिचे हातून मनोविकास, शील, वगैरे जीवितांतल्या इतर स्पृहणीय गोष्टींची हेळसांड झाली.

आज तिची योग्यता एकाद्या सुंदर बाहुलीपेक्षां जास्त नाहीं. आणि जसजसें वय होईल आणि हा आणलेला सुंदरपणा जात जाईल तसतसें तिच्याबद्दलचें चांगलें मत वाईट होत जाईल, आणि म्हातारपणीं तर तिची स्थिति अत्यंत केंविलवाणी होईल!

इंदूच्या मनीचें पत्र हा वास्तविक प्रसंग; पण त्या निमित्तानें किती निर-निराळे व उलटसुलट विचार मनांत आले, पाहिलेत? बरें झालें, इंदूची शाळेंत जाण्याची वेळ होऊन ती मला जेवायला बोलवायला आली,—नाहीतर माझे विचार तसेच आणखी कोठें तरी बहकत चालले असते!



इंदूंत वक्तृत्व नसलें तरी ती सभाधीट होती हें मागें सांगितलेंच आहे; व शाळेंतील बहुतेक समारंभप्रसंगीं तिला बोलण्याची पाळी येत असे. असाच एक समारंभप्रसंग शाळेंत व्हावयाचा होता. दादा मास्तर शाळा सोडून जात असल्या कारणानें त्यांचा सत्कार करण्याचें सर्व मुलांनीं ठरविलें असून मुख्य भाषणाचें काम त्यांनीं इंदूवर सोंपविलें होतें. तिला बोलतां येत होतें हें तर एक कारण होतेंच; शिवाय दादा मास्तर आमचेजवळच राहात असल्या कारणानें इंदूचा व त्यांचा बराच परिचय होता हेंहि एक दुसरें कारण होतें. आपल्यावर बरीच जबाबदारी आहे या जाणीवेनें इंदु जरा भेदरलेली दिसत होती. ती मजजवळ येऊन जरा गयावया करून म्हणते, "नाना, बोलायचें सांगा ना. आजचा दिवसच काय तो मधें. उद्यां एव्हांना मला बोलायला लागेल." बोलायचें तें ज्याचें त्यानेंच बोलावें, तें शिकवून फारसें यायचें नाहीं; बोलण्यासारखें कांहीं असेल तरच बोलावें, बोलायचें म्हणून कांहीं उकरून काढून बोलूं नये अशा विचाराचा मी असल्यामुळें माझी इंदूला फारशी मदत करण्याची इच्छा नव्हती. पण मी सांगत नाहीं असा एकदम नकार देणेंहि प्रशस्त वाटेना. तेव्हां तिच्याकडूनच मीं तिनें जें कांहीं बोलायचें योजिलें होतें तें काढून घेतलें व एकाद-दुसरी सूचना करून व 'छान आहे' असे उत्तेजनाचे खरोखरचेच दोन शब्द बोलून मीं तिला वाटेला लाविलें. वास्तविक मीं तिला फार मदत केली होती असें बिलकुल नव्हतें. पण तिला आपल्या विश्वासांतल्या माणसाकडून एक प्रकारचा धीर पाहिजे होता व तो तिला माझेकडून मिळाल्याबरोबर तिचें समाधान झालें.

दुसऱ्या दिवशीं शाळेंत जातांना तिनें आपल्या टेबलावरच्या दत्ताच्या तजबिरीला नमस्कार केला व ती आम्हां उभयतांकडे आशीर्वाद मागणेकरितां आली. सौभाग्यवती मोठ्यांदा हंसून मुलीच्या धर्मभोळेपणाची तिला जाणीव करून देण्याच्या बेतांत होती; पण तितक्यांत मी तिला ओठानेंच दाबून 'आज तुझें भाषण चांगलें होईल' असा इंदूला आशीर्वाद दिला. मनुष्य शक्य ते परिश्रम करीतच असतो, पण स्वतःच्या परिश्रमांना देवाच्या दयेची व आप्तेष्टांच्या आशीर्वादाची जोड मिळाल्याशिवाय त्याच्या मनाचें खरें समाधान होत नाहीं. वास्तविक देवाला नमस्कार वगैरे करून स्वतःनें

स्वतःलाच आणलेला धीर किंवा लोकांनीं दिलेल्या आशीर्वादांनीं अथवा चिंतिलेल्या शुभाशांनीं होणारें समाधान हे सर्व सूचनेचेच प्रकार असून सूचनेचे जे जे सुपरिणाम मनावर होतात असें मानसशास्त्रज्ञ सांगतात, ते सर्व यांचे योगानेंहि होतात. आणि म्हणून वडीलधाऱ्या माणसांनीं या गोष्टी अवश्य करावयास पाहिजेत. कावळ्याच्या नुसत्या शापानें गुरें मरत नाहींत हें जसें खरें, तसेंच बगळ्याच्या नुसत्या आशीर्वादानें माणसें तरत नाहींत हेंहि खरें. मरायला काय किंवा तरायला काय स्वतःची करणी कारण होतच असते. तथापि शुभाशा, आशीर्वाद यांनाहि मानवी जीवनांत स्थान आहे हें नाकारतां यावयाचें नाहीं.

पुष्कळ वेळां परिश्रमवादी व तर्कश्रद्ध लोकांना असल्या आशीर्वाद वगैरेंत कांहीं अर्थ नसून उलट त्यांनीं भोळसटपणाला उत्तेजन दिल्यासारखेंच होतें असें वाटतें. आपला आत्मविश्वास किंवा आपलें मन आपल्याला सांगत असलें म्हणजे या बाह्य सूचनांची कांहीं जरूरी नाहीं असें यांचें म्हणणें. आमच्या विनायकरावांची शकी परीक्षेला जातांना बापाला नमस्कार करायला गेली. 'अभ्यास केला असलास तर मी शाप देऊनहि तूं पास होशील, आणि केला नसलास तर मी आशीर्वाद देऊनहि तूं नापास होशील; तुला पाहिजेच असला माझा आशीर्वाद तर मी काय बापडा एक सोडून दहा देखील देईन, पण त्यांनीं कांहीं तुझें काम होणार नाहीं' असे उद्गारले! या भावनाशून्य बोलण्यानें 'कोठून गेलें नमस्कार करायला' असें त्या बिचारीला वाटलें असल्यास कांहीं नवल नाहीं. तर्कश्रद्ध माणसांची विचारसरणी सुजाण माणसांच्या दृष्टीनें खरी असेल, पण सामान्य माणसांना व विशेषतः मुलांना वैयक्तिक अंतःसूचना मिळणें मानसशास्त्रदृष्ट्याच शक्य नाहीं. मुलांचीं मनें हीं बहिर्वृत्तीचीं व वस्तुनिष्ठ असल्यामुळें त्यांच्या मनावर परिणाम व्हावयाचा तो बाह्य सूचनांचे योगानेंच होत असतो. सॉक्रेटिसासारख्या ज्ञानयोग्यालासुद्धां स्फूर्तीकरितां 'डीमन्' नांवाच्या एका बाह्य प्रेरक शक्तीची, व शिवाजीसारख्या कर्मयोग्यालाहि भवानीसारख्या अनात्मिक शक्तीची आवश्यकता भासते. मोठमोठ्या माणसांची जर ही स्थिति तर बिचाऱ्या इंदूसारख्या सामान्य बालकांनीं धीर व उत्तेजन मिळविण्याकरितां दत्ताच्या दयेची किंवा आपल्या 'पूज्य'(!) मातापितरांच्या आशीर्वादाची अपेक्षा केली तर त्यांत त्यांचा काय दोष? आणि असें जर खरें तर त्यांची ती अल्प अपेक्षा पुरी करण्याचे बाबतींत

आईबापांनीं येवढे आढेवेढे तरी कशाला घ्यायला पाहिजेत ? किंवा त्यांना त्यांत हसण्यासारखें तरी काय दिसावें ?

गोष्ट निघालीच आहे म्हणून सांगतों. इंदूचा देवावर नितान्त विश्वास आहे. पहिल्या पहिल्यांदा ती विनायकरावांच्या शकीचें पाहून रामाच्या एका मूर्तीची पूजा वगैरे करीत असे. स्नान झाल्यानंतर ती बागेंतलें एक गुलाबाचें फूल काढून तें आपल्या रामाला वाहात असे; आणि कांहीं वेळानें तेंच देवाचा प्रसाद म्हणून आपल्या डोक्यांत घालीत असे. हळू हळू ती रामाची मूर्ति दिसेनाशी होऊन तीऐवजीं चित्रशाळेंतील एक तजबीर आली; पण नंतर, कां कोणास ठाऊक, चित्रशाळेच्या रामाच्या तजबिरीचे जागीं रविवर्म्यानें काढलेल्या दत्ताच्या सुंदर चित्राची स्थापना झाली. वास्तविक अलीकडे पुष्कळ वर्षें मी काय किंवा इंदूची आई काय एकादी मूर्ति वगैरे स्थापून तिची पूजावगैरे कांहींच करीत नसूं. मध्यंतरीं सौभाग्यवती शिवलीलामृत, दासबोध वगैरे प्राकृत पोथ्या जेवणापूर्वीं नियमानें वाचीत असे; पण आतांशा आतांशा तिनें गीता वाचावयास सुरुवात केली होती. मीहि पहिल्यापहिल्यांदा या सर्व स्थितींतून थोडाफार गेलों होतों. पण इंदूच्या पाठच्या मुलाच्या मृत्यूपासून माझा कशावरच विश्वास राहिला नव्हता. त्या प्रसंगाच्या सगळ्या गोष्टी कश्या डोळ्यांपुढें अगदीं ठळक उभ्या राहतात. घरांतल्या घरांत डॉक्टरांचे सर्व उपाय खुंटले म्हणून त्याला हॉस्पिटलमध्यें नेलें. तेथें थेट सिव्हिल सर्जनपर्यंत सर्व बड्या डॉक्टरांनीं आपली शिकस्त करून पाहिली. कोणाच्याच हाताला यश म्हणून येईना. साहजिकच मी देवाची करुणा भाकूं लागलों, बायकांसारखे किती नवस केले, अन् किती आणाभाका वाहिल्या; पण कांहीं उपयोग झाला नाहीं ! माझ्या सर्व शपथांचा व प्रार्थनांचा अव्हेर करणाऱ्या देवाला देव तरी कसें म्हणावयाचें ? मनुष्याचें कांहीं चाललें नाहीं, देवाचेंहि कांहीं चाललें नाहीं. मग देवाचा देवपणा तरी कुठें राहिला ? त्या लहानग्या अर्भकाचा असा काय अपराध होता, कीं त्याच्या जीविताची कळी उमलण्यापूर्वींच देवानें ती पायाखालीं चुरगाळून टाकावी! देवानें त्याला खऱ्या खेळाडूप्रमाणें एकदां तरी 'चान्स' द्यावयास नको होता काय ? अपराध कोणाचा कांहीं असलाच तर तो त्याच्या आईबापांचा. पण आईबापांच्या पातकाबद्दल मुलाला जबाबदार धरून त्याला देहान्त प्रायश्चित्त देणारा देव अत्यंत बेजबाब-

दार व अन्यायी असला पाहिजे—वगैरे कितीतरी देवाविरुद्धचे विचार तेवढ्यां-तल्या तेवढ्यांत माझ्या मनांत येऊन गेले. आणि तेव्हांपासून देवाच्या दयालु-त्वावरचा व खुद्द त्याच्या अस्तित्वावरचाहि जो माझा विश्वास उडाला तो पुन्हा म्हणून कांहीं परत आला नाहीं. एकदां वाटे इंदूच्या त्या सर्व तजविरी अन् तिच्या आईच्या त्या पोथ्या, गाथा, गीता वगैरे सर्व कांहीं भिरकावून द्यावें; पण पुन्हा मनानें सांगितलें, 'तुझा विश्वास नसला तर नसूं दे, पण त्या विचाऱ्यांना पूजेअर्चेनें खरोखरच समाधान वाटत असेल तर त्यांचें तें समा-धान तूं कशाला हिरावून घेतोस ? देवानें तुझें मूल हिरावलें म्हणून तूंहि दुसऱ्यांचें कांहीं हिरावलेंच पाहिजे असें नाहीं.' आणि मनाच्या या सांगीनेंच मी गप्प बसून देवाधर्माच्या बाबतींत इतरांचे आड येईनासा झालों.

इंदूच्या नमस्कारावरून व विशेषतः तिच्या आईच्या हसण्यावरून या सर्व गोष्टी निघाल्या. झालें; इंदु शाळेंत निघून गेली. आम्हांलाहि समारंभाचें आमंत्रण होतें. आम्ही नेहमींच समारंभांना जात असूं असें नाहीं. पण दादामास्तरांबद्दल आमचे मनांत आदर होता हें एक, शिवाय इंदु कशी बोलते हेंहि आम्हांस—विशेषतः तिच्या आईला—पहावयाचें होतें. आणि म्हणून आम्हीहि इंदूचे मागोमाग तिच्या शाळेंत गेलों. पहिल्या प्रास्ताविक गोष्टी झाल्यावर इंदूची बोलण्याची पाळी आली. सर्व मुलांनीं तिला टाळ्या वाज-विल्या. अगोदरच घाबरलेली इंदु त्या टाळ्यांच्या गजरानें जास्तच घाबरली; पण दोनचार मिनिटांतच तिचा तो घाबरटपणा जाऊन इंदु रंगांत आली. सर्व मुलांना दादामास्तर कां आवडतात याचें विवेचन करतांना ती म्हणाली " दादांच्यांत असे कितीतरी गुण होते, कीं जे इतरांत सांपडत नाहींत. त्यांची ती प्रेमळ व हसरी मुद्रा आमचे नजरेंतून कधींहि जाणार नाहीं. वास्तविक पाहतां त्यांच्या घरच्या अडचणी व दुःखें कांहीं कमी नाहींत. दादांच्या पत्नी कायमच्याच अंथरुणावर पडून असतात. करतासवरता मुलगा मधून मधून नेहमींच तुरुंगांत असतो. १५ दिवसांपूर्वींच त्याला सत्याग्रहांत तिसऱ्यांदा का चवथ्यांदा शिक्षा झाल्याचें आपण ऐकलेंच असेल. आणि असें असूनहि दादा शाळेंत येत ते घरचीं सर्व दुःखें घरींच ठेवून; व स्वतः हसत व लोकांना हसवीत आपल्या शिकविण्यांत रंगून जात. त्यांनीं आम्हांला संस्कृत नुसतेंच शिकविलें नाहीं, तर आम्हांला खरोखरच त्यांनीं सुसंस्कृत केलें. आमच्यां-तील कांहीं मुली दादांना शिकवणीसाठीं विचारायला जात; पण दादांचें

सगळ्यांना अगदीं एक उत्तर–'मी तुम्हांला शिकवीन, पण शिकवणी म्हणून पैसे घेऊन शिकवणार नाहीं. मी जातीनें ब्राह्मण नसलों तरी कर्मानें ब्राह्मण आहें.' आम्हां मुलींनाहि दादांकडे जाण्यायेण्याला व त्यांच्याशीं मोकळेपणानें बोलण्या-सवरण्याला संकोच वाटला नाहीं. प्रेमळ पित्याप्रमाणें दादांनीं आम्हांला अगदीं जवळ घेऊन शिकवावें. दादांच्या वाणीमध्यें हल्लीं थोडासा दोष उत्पन्न झाला असून त्याकरितां म्हणे इन्स्पेक्टरसाहेबांनीं त्यांना पेन्शनींत काढण्याचा अधिकाऱ्यांना सल्ला दिला आहे. हें खरें असल्यास त्या इन्स्पेक्टरसाहेबांना कांहीं..."

इतक्यांत अध्यक्षसाहेबांनीं टेबलावरची घंटा जोरानें दाबून इंदूला बोलणें तावडतोब आटोपतें घेण्याबद्दल फर्मावलें. इंदूनें तें वाक्य कसें बसें पुरें करून आपलें भाषण संपविलें. इंदूच्या मनांतून आणखीहि कांहीं बोलायचें होतें हें तिच्या पहिल्या भाषणावरून स्पष्ट दिसत होतें. पण वेळ भरल्याच्या निमित्तानें अध्यक्षसाहेबांनीं तिच्या शेवटच्या सत्य पण त्यांना पथ्यकारक नसलेल्या वावड्या उल्लेखाला पायबंद घातला. अर्थात् लोकांना सगळं कांहीं अगोदरच समजून चुकलं होतं. सगळ्यांचीं भाषणें संपल्यावर दादामास्तर उत्तर द्यावयास उभे राहिले; पण त्यांना इतकें गहिंवरून आलेलें दिसलें, कीं त्यांचे तोंडून एकहि शब्द बाहेर फुटेना. त्यांच्या त्या डबडबलेल्या डोळ्यांचा व गहिंवरलेल्या चेहऱ्याचा आम्हां श्रोत्यांवर जितका परिणाम झाला त्याच्या शतांशहि त्यांच्या वक्तृत्वपूर्ण भाषणाचा झाला नसता. थोडेंसेंच व तेंहि कसेंतरी बोलून त्यांनीं आपलें स्खालित भाषण संपविलें, व बसतां बसतां मोठ्या प्रेमानें सर्वांकडे पाहून विनयानें नमस्कार केला! मुलाचा दादांसंबंधींचा तो आदर व दादांचें मुलांवरचें तें प्रेम पाहून अतिशय कौतुक वाटलें.

समारंभ आटोपून आम्ही घरीं जात असतांना सौभाग्यवतीनें विचारलें 'काय हो! दादामास्तरांना कितीसें पेन्शन् बसेल?' मीं म्हटलें 'बसेल तेरा-चवदा रुपये.' 'बास, इतकेंच?' आणि ती जरा कष्टी झाली. मी तिचें समाधान करण्यासाठीं म्हणालों, 'शिक्षकाचा धंदा प्राप्तीनें हलका असो, पण प्राप्तीची भरपाई प्रेमानें होत असेल तर कोणत्या माणसाला शिक्षक व्हावयास आवडणार नाहीं? पण प्रेमाचें बक्षीस मिळायला निःस्वार्थी व निःस्पृह वागणें, कार्यतत्परता, विषयव्यासंग, विद्यार्थ्यांबद्दलचें सात्त्विक प्रेम असले गुण अगोदर अंगीं असावयास पाहिजेत.'उपरणें झाडून मोकळें होण्याच्या' किंवा 'दोन पाट्या टाकण्याच्या' क्षुद्र वृत्तीनेंच शिक्षक काम करीत असेल तर त्याला त्या धंद्यात कांहींच किफायत नाहीं. त्यानें बेलाशक दुसरा एकादा धंदा पहावा हें बरें.'

---

दादामास्तर गेले हा मुलांच्या मतें शाळेला एक अपशकुनच झाला होता. कारण थोडेच दिवसांत शाळेच्या चालकांना सांपत्तिक दृष्टया फारच मोठी खोट येऊन कमी झालेल्या उत्पन्नांत शाळा चालविणेकरितां त्यांना बरीचशी जुनी व कसलेली शिक्षक मंडळी कमी करावी लागली. अर्थात् शिक्षणाचा कस कमी झाल्याबरोबर विद्यार्थ्यांची संख्याहि घटत चालली. या गोष्टीचा परिणाम इंदूवर होऊन तीहि ही शाळा सोडण्याची गोष्ट काढूं लागली. तिच्या कांहीं मैत्रिणींनीं मुंबईच्या एका मुलींच्या बोर्डिंगांत राहून याच संस्थेच्या तेथील शाळेंत जाणेचें ठरविलें होतें. इंदूलाहि अर्थात् तेथेंच जावेंसें वाटून ती त्याप्रमाणें आमचें मन वळवूं लागली. मुलीचें मन मोडण्याची आजपर्यंत कधीं संवय नाहीं म्हणून, व मुलीला कांहीं दिवस तरी घरापासून दूर ठेवण्यावर माझाहि विश्वास असल्यामुळें मी इंदूला मुंबईस पाठविणेस तयार झालों. 'ती गेल्यावर घरांत अगदीं दोघेच दोघे, हाताखालीं येवढेंसुद्धां माणूस नाहीं, अगदीं सुनें सुनें वाटेल, मुंबईची राहणी महागाईची व वाटगी, तेथील मुली फारच फॅशनेबल, अगोदरच तिच्या नटण्यामुरडण्याचा बोभाटा, अन् माझें एक असो, पण तुम्हांलाच करमणार नाहीं' अश्या कितीतरी गोष्टी पुढें आणून इंदूचे आईनें माझें मन परावृत्त करण्याचा प्रयत्न केला. इंदूची व माझी तिनें जावें अशी इच्छा, तर तिनें जाऊं नये अशी तिच्या आईची इच्छा! कोणाचें ऐकावें? मीं बोर्डिंगमध्यें राहण्याचे होते नव्हते तेवढे सर्व फायदे तिचेपुढें मांडले. परिस्थितीचें क्षेत्र जितकें जितकें विस्तृत होत जातें तितका तितका व्यक्तीचा स्वार्थी संकुचितपणा कमी होत जाऊन ती मनानें व दृष्टीनें उदार बनत जाते. व्यक्तींतील समष्टिरूपाचा विकास हेंच खरें शिक्षण—वगैरे कितीतरी गोष्टी मीं सांगून पाहिल्या. पण सौभाग्यवतीहि कांहीं कमी नव्हती. 'ज्या मुलांना आईबाप नाहींत, किंवा असून अशिक्षित असल्यामुळें घरचें वळण वाईट आहे, किंवा ज्यांचे घरीं कांहीं सावत्रसंबंध वगैरे आहे, अगर ज्यांचे घराला कांहीं स्थैर्य नसून आज येथें तर उद्यां तेथें असें सारखें बदलत आहे, अशा कुटुंबांतील मुलामुलींना बोर्डिंगांत घालून उसन्या पालकांचे देखरेखीखालीं ठेवणें ठीक होईल, पण आपलं तर तसं कांहीं नाहीं ना? आई एक सुशिक्षित नसेल पण देवाच्या दयेनं दुसरीं माणसं तर पोरीच्या शिक्षणाकडे

पाहण्यास समर्थ आहेत ना ?' असा निरनिराळ्या प्रकारचा युक्तिवाद करून व शेवटीं 'शेषं कोपेन पूरयेत्' या न्यायानें माझेवर थोडेंसें रागवूनहि तिनें माझी उलट समजूत करण्याचा प्रयत्न केला.

मी थोडासा विरघळूं पाहत होतों; पण रात्रीं इंदूनेंच वाटतें तिच्या पोटांत शिरून तिला आपलेंसें करून घेतलें, आणि जी गोष्ट मला बुद्धिसामर्थ्यानें करतां आली नव्हती ती तिनें आपल्या अश्रुसामर्थ्यानें घडवून आणली ! मातेचेंच अंतः-करण तें, ममतेनें द्रवल्यावांचून थोडेंच राहणार ! दुसऱ्या दिवशीं सकाळींच तिनें इंदूच्या जाण्याची गोष्ट काढली, येवढेंच नव्हे तर ती मोठ्या हुरुपानें त्या तयारीलाहि लागली. जाण्याचा काळ जसजसा जवळ येत चालला तसतशी ती जास्तच उल्हासी दिसूं लागली; पण माझी स्थिति मात्र उलट होऊं लागली. माझी पहिली आनंदी वृत्ति डळमळूं लागून मीच बावरल्यासारखा झालों. आम्हां उभयतांत असा हा फरक नेहमीं पडतो. माझें मन पहिल्यांदा मोठें हुरळून जातें; पण वेळ आली कीं तें डळमळूं लागतें. ती पहिल्यांदा बिलकुल हुरळणार नाहीं; उलट प्रत्येक गोष्टीचा विचार जरा साशंकपणेंच करील; पण एकदां एकादी गोष्ट करायची तिनें ठरविली, कीं मग मात्र तिचें मन कचरणार नाहीं. इंदूचेंहि थोडेंसें माझेप्रमाणेंच झालें होतें. आधीं अगदीं आनंदी दिस-णारी इंदु पुढें कष्टी दिसूं लागली, आणि खुद्द जाण्याचे वेळीं तर तिला इतकें कांहीं भरून आलें, कीं कांहीं 'सीन' होतो कीं काय अशीहि मला शंका येऊं लागली; पण एकदांचें सर्व सुरळीत पार पडलें.

सर्वांचा निरोप घेऊन आम्ही निघालों तों मुंबईस दुसरे दिवशीं सकाळीं सुखरूप पोंचलों. 'सेवाश्रम विद्यार्थिनीवसतिगृह शाखा ४, गिरगांव' अशी मोठी पाटी लागतांच आमची व्हिक्टोरिया थांबली. फाटकावरील शिपायानें माझ्या नांवाची चिठी पोंचविल्याबरोबर त्याच चिठीचे मागें वर 'यस' व खालीं 'मिसेस् गौतमाबाई' असें लिहिलेलें परत आलें. आम्हांला शिपायानें Lady Superin-tendentच्या खोलीशीं नेल्याबरोबर गौतमाबाई हसत हसत आमचें स्वागत करण्याकरितां खोलींतून बाहेर येऊन आम्हांस आंत घेऊन गेल्या ! व इंदूकडे एकदां प्रेमपूर्ण दृष्टीनें पाहत, व 'A bright girl आं' असें अर्धवट प्रश्नार्थी व अर्धवट स्वार्थी वाक्य म्हणत त्यांनीं आम्हांस खुर्च्यांवर बसविलें. त्यांचा तो निमगोरा वर्ण, उंच—सडपातळ बांधा, साधा स्वच्छ पोषाख, पायांतील पंजाबी धर्तीच्या जरीच्या खडावा, दांत किंचित् उघडे ठेवून हसण्याची

ढब, इंग्लिशमिश्र मराठी बोलण्याचा झोंक वगैरेंनीं त्यांच्यासंबंधींचें माझें मत फार चांगलें झालें; व गड्याकडून इंदूच्या सामानाची व्यवस्था लावणेकरितां त्या बाहेर गेल्या असतां मीं इंदूला तसें बोलूनहि दाखविलें. पण कां कोणास ठाऊक, इंदूचें मत मात्र तितकेंसें चांगलें झालेलें दिसलें नाहीं. ती नुसतेंच 'हं' म्हणून दुसरीकडे पाहूं लागली. गौतमाबाईनीं आपल्याच ऑफिस्‌मध्यें आमचेकरितां चहा मागविला, व 'Come on Miss Agashe, let us have our first tea together' असें म्हणून आम्हांला चहाची सूचना दिली. 'आम्ही सहसा मुलींना चहा वगैरे कांहीं देत नाहीं. मीहि फारशी कधीं घेत नाहीं; पण इंदूला संवयच असली तर ७-८ मुलींचा चहा होतो त्यांत तिचाहि होईल. बाकी चहा न पिणें हें बरें. अहो, एक चहा आला कीं गप्पा, नी गोष्टी, नी गोंधळ, नी गडबड सर्व कांहीं येऊन मग कांहीं शिस्तच राहत नाहीं. आणि मला कशाची जास्त चीड असेल तर ती या बेशिस्तीची.' 'हं, हं,' म्हणत मीं चहा संपविला. मनांत-मात्र समजलों, कीं बाई पक्की चहाबाज, गप्पाबाज, 'नी' शिस्तबाज दिसते आहे. कोणीं 'मी अमुक एक गोष्ट सहसा करीत नाहीं' असें समर्थनपर सांगूं लागलें, कीं हटकून समजावें, कीं ती गोष्ट केल्यावांचून तो सहसा राहत नाहीं!

असो, चहा झाल्याबरोबर गौतमाबाईनीं आपल्या चांदीच्या डबींतील चिकणी सुपारी मला देऊन व 'No, you won't have it' असें हसत हसत इंदूला सांगून आम्हां दोघांची दोन दिशांना रवानगी केली. वसतिगृहाच्या आवाराला सर्व बाजूंनीं भिंती असून त्यांवर कांचांचे तुकडे बसविलेले होते. सर्व आवार एकंदरींत अगदीं स्वच्छ व व्यवस्थित दिसलें. जिकडे तिकडे पाट्या, सूचना, घंटा, वेळापत्रकें वगैरे लटकलेलीं असून व्यवस्थापकांचा सुयंत्रितपणावर फार कटाक्ष दिसला. ९॥ वाजतां जेवणाची घंटा झाल्याबरोबर स्वतः गौतमाबाईच येऊन त्यांनीं मला भोजनगृहांत नेलें. 'मी सहसा मुलींच्यांत जेवत नाहीं, पण आज तुम्ही आहांत म्हणून, नि स्वयंपाक कसा झाला आहे हें प्रत्यक्ष पाहण्याची आजची पाळी असल्यामुळें मी येथें जेवीत आहें' असें म्हणून त्यांनीं मजबरोबर जेवायास येण्याचें समर्थन केलें.

"कां, आपण मुलींच्यांतच कां जेवीत नाहीं? आपल्यालाहि-म्हणजे एकएकटें जेवावें लागणार नाहीं, आणि मुलींनाहि तितका घरोबा वाटून देखरेखीचें कामहि चांगलें होईल." मी कांहींतरी बोलायचें म्हणून भरदिशीं बोलून गेलों.

" तुम्ही म्हणतां तें कांहीं खोटं नाहीं मिस्टर आगाशे; नी मी बहुधा मुलींतच जेवतें; पण खरं म्हणाल तर घरोबा फार झाला म्हणजे मान तितकासा राहात नाहीं. तुम्हांलाहि नाहीं तसं वाटतं ?" गौतमाबाईनीं भिवया वर उडवून विचारलें. मला तें पटलें नाहीं, पण बाईच्या बोलण्यांत बोल दिसत नाहीं, तेव्हां फारसें बोलायचेंच नाहीं, असें मनाशीं ठरवून मी खालीं पाहून जेवूं लागलों. थोड्याच वेळांत आपली ताटवाटी घासून इंदु समोरून जातांना दिसली. 'आँ ! इतक्यांत जेवण झालं ? पोरीला जेवण गेलेलं दिसत नाहीं', असा विचार मनांत येऊन तोंडांतला घास तोंडांतच गोंधळला. 'Did you like the food Miss Agashe ? ' असें गौतमाबाईनीं विचारलें, आणि तिचें हो किंवा नाहीं असें कांहींतरी नक्की उत्तर येण्यापूर्वींच 'All right, go on' असें सांगून त्यांनीं विचारपूस केल्याचें श्रेय घेतलें ! सर्व विद्यार्थिनी शाळेंत गेल्या. गौतमाबाईनीं माझेकरितां एक व्हिक्टोरिया आणविली आणि मी, इंदु व त्या असे मिळून इंदूच्या नवीन शाळेंत गेलों.

Lady Superintendent बाईनीं आमची सर्व व्यवस्था तावडतोब लाविली, व 'आपण अगदीं निर्धास्त जा, त्यांतूनहि वाटल्यास उद्यां एकदां येऊन जा' असें मला सांगून व 'काय ठीक चाललें आहे मिसेस भोपळे ?' असें गौतमाबाईस विचारून त्या वर्गावर निघून गेल्या. त्यांचें तें नेमकें कामापुरतेंच बोलणें, कामाचा उरक वगैरे युरोपियन बायांत दिसून येणारे गुण पाहून त्यांजबद्दल माझा ग्रह फार चांगला झाला; आणि मीं तसें गाडींत बसल्या-बसल्या गौतमाबाईना बोलूनहि दाखविलें. बाई जरा अवांकत अवांकत म्हणाल्या 'ये ऽऽऽस्. पण मिस् अघारकर जरा अबोल व तुटक आहे.' गौतमाबाईसारख्या बहुभाष व चेंगट बाईला मिस् अघारकरांचें मितभाषणं अबोल-पणाचें व त्यांची तडफ तुटकपणाची वाटल्यास नवल नाहीं. संभाषण चालू ठेवण्याचे निमित्तानें मिसेस भोपळ्यांनीं विचारलें "Well, Mr. Agashe, तुम्हांला यांच्या या देशी युनिव्हर्सिटीसंबंधीं काय वाटतें ? ती जगेल का ? यांच्या या मराठी मीडिअम्च्या फॅडमुळें Don't you think the poor girls are suffering ? आतां याच मिस अघारकर पहा. एरव्हीं बिचारी किती हुशार व एबल् आहे; पण इंग्रजी बोलतांना काम लंगडं पडतं. स्वतःच स्वतःचं सांगूं नये, पण माझं जितकं मुलींवर व public वर influence पडतं तितकं कांहीं बिचारीचं पडत नाहीं. कधीं कोठें Public मधें mix

होत नाहीं. आपलं शाळेंतील काम करीत बसलेली असते. नाहीं म्हणायला मराठींत ४-२ बुकं लिहिलीं आहेत येवढंच."

"पण शिक्षण म्हणजे कांहीं इंग्रजींत घडघड बोलतां येणं येवढंच नव्हे. विचार करतां येणं म्हणजे शिक्षण; आणि त्या दृष्टीनं मराठी माध्यम तोटयाचं नसून उलट फायद्याचंच आहे." मीं बोलूं नये, पण बोलला.

"Ah! I thought you would say so, Mr. Agashe. तुम्हांला अजून अनुभव नाहीं marriage-market चा. मार्केटमध्यें हल्लीं कोणत्या मालाला मागणी आहे? देशी का विदेशी?

"असेल विदेशीला, पण असावयास पाहिजे कशाला?" मी म्हणालों. माझं वाक्य न समजूनच कीं काय त्यांनीं विचारलें, "You mean 'ought' Mr. Agahe? Oh! damn that 'ought'." असें म्हणून बाईनीं मोठ्या त्वेषानें उजव्या हाताची पालथी बाजू डाव्या हाताच्या उलथ्या बाजूवर आपटली! गाडीवानाला तो टाळीचाच आवाज वाटून 'हाँ ठैरता हूं बाईसाब' असें म्हणून त्यानें गाडी थांबविली. इंदूची शाळा बोर्डिंगपासून जवळच असल्यामुळें वास्तविक गाडीची कांहीं जरूरी नव्हती असें मघांचपासून वाटत असून बाईनें गाडी करून मला भूर्दंडांत पाडिलें याचा राग मीं बिचाऱ्या गाडीवानावर मनांत काढीत होतों. पण आतां मला त्याने बाईच्या तडाक्यांतून अशा अचानकपणें सोडविल्याबद्दल त्याचेवरचा माझा राग नाहींसा झाला व मीं त्यानें मागितलेले पैसे खुशीनें दिले.

बाईनीं मधल्या वेळीं पुन्हा चहाला बोलावलें. अर्थात् 'मी मधल्या वेळीं सहसा चहा घेत नाहीं' वगैरे पुन्हा आलेंच. चहा झाल्यावर मला त्यांनीं सर्व मुलींच्या —विषेशतः इंदूची—खोल्या दाखविल्या. पुन्हा एकदां त्यांनीं मी इंदूचें अप्रत्यक्षपणें कसें नुकसान करीत आहें याची जाणीव करून दिली, आणि "आतां We shall meet at the evening prayer" असें सांगून त्या बाहेर पडल्या. मीहि कांहीं खरेदी करण्याकरितां बाहेर पडलों. २-३ तासांनीं परत आलों तों जेवण आटोपून मुली प्रार्थनेच्या जागीं येऊन बसल्या होत्या. मिसेस भोपळे मधल्या व्यासपीठावर आसनमांडी घालून एक भक्तिपर गाणें सांगत होत्या. गाणें झाल्यावर 'माणसाचें बोलणें कसें बेताचें असावें' याच विषयावर त्यांनीं प्रवचन केलें, आणि प्रार्थना संपविली. रोजच्या विषयांतून एकादें तत्त्व काढून तें पटवून देण्याची त्यांची पद्धति चांगली होती. पण

'सेटन प्रीचिंग बायबल' या म्हणीची आठवण होऊन मला आंतून हसूं येत होतें. मुलींचेंहि त्यांचे सांगण्याकडे मुळींच लक्ष नव्हतें. मुलींच्या अभ्यासाची घंटा झाली, मुली अभ्यासाला गेल्या; निजावयाची घंटा झाली, मुली निजल्या. मला मात्र जेवण नसल्यामुळें चांगलीशी झोंप आली नाहीं. दुसरे दिवशीं सकाळीं इंदु बाईची परवानगी काढून मला भेटायला आली, व " काल रात्रीं जेवायला मिळालं नाहीं ना ? मुली म्हणतच होत्या, कीं वेळेवर आलांत तर ठीक, नाहींतर आटोपलंच ! " असें म्हणाली.

" अग, मग Boarding म्हटलं कीं असंच चालायचं. ती का खाणावळ का आहे ? वाटेल त्यानें यावें व वाटेल तेव्हां जेवून जावें ? मीच उशीरां कां यावें ? " मी सावरून घेण्याच्या इच्छेनें म्हणालों.

" तुम्ही असं म्हणणं ठीक आहे, पण मुली म्हणत होत्या, कीं बाईंचे कोणी पाहुणे आले, कीं वाटेल ती व्यवस्था वाटेल तेव्हां होऊं शकते." इंदु चिडून म्हणाली.

पण इतक्यांत मिसेस भोपळे येऊन त्यांनींच मला रात्रीं उपाशी रहावें लागलें याबद्दल दिलगिरी प्रदर्शित केली. " काय Miss Agashe, everything O. K. ? काय हवें नको मला सांगत जा. मुलींवर विसंबून राहत जाऊं नको. अच्छा, जा अभ्यासाला लाग." असें म्हणून गौतमाबाईंनीं इंदूला—ती कांहीं बोलण्यापूर्वींच— खोलींत लावून दिली. बोर्डिंगचें व शाळेचें सर्व सुरळीत लागलेलें पाहून मीं इंदूचा निरोप घेतला, व संध्याकाळचे गाडीनें घरीं येण्यास निघालों.

---

मी घरीं आलों तों सौभाग्यवती पडून असलेलीच दिसली. मी व इंदु मुंबईस गेल्यावर, म्हणे थोडासा फिटीसारखा प्रकार होऊन सौभाग्यवती अस्वस्थ झाली होती. मनाला ज्या वेळीं कांहीं त्रास होईल त्या वेळीं उसना धीटपणा आणून तो दाबून ठेवायचा; जसें कांहीं, कांहीं झालेंच नाहीं अशी ऐट आणायची; आणि नंतर कांहीं काळानें मन गैरसावध स्थितींत असलें म्हणजे अचानक रीतीनें तो मानसिक त्रास 'फिट'च्या रूपानें बाहेर पडायचा अशी स्थिति लग्नानंतर कांहीं दिवस सौभाग्यवतीची होत असे; पण त्याला आतां पुष्कळ वर्षें होऊन गेलीं होतीं. मध्यंतरीं मूल गेल्यावेळींच काय ती अशी फिट आली होती. हल्लीं हल्लीं मात्र विचारानें तिनें आपलें मन खंबीर केलें असल्यामुळें असा प्रसंग येत नसे. पण या वेळीं तो पुनः आलाच! सौभाग्यवती १-२ दिवसांत पूर्वस्थितीवर येऊन आमचें सर्व बस्तान पुनः पूर्वीप्रमाणें बसलें. एके दिवशीं ती खुशींत आहे असें पाहून मीं थट्टेनें म्हटलें " तुम्हीं बायकांनीं किती पुरुषी ऐट केलीत तरी तुम्ही बायका त्या बायका! मुलगी परगांवीं निघाली, आली फिट् आईला! आम्ही पुरुष पहा कसे असतों! जें काय थोडेंसें वाटेल तें त्या वेळींच बाहेर पडून जाऊन तो क्षण गेला, कीं पुनः आपले मोकळे दुसरे विचार करायला. तुमच्यासारखें आंत घाण सांचूं देऊन वरून मलमपट्टी करण्याचा प्रयत्न करणार नाहीं. एके ठिकाणीं पट्टी मारून आंतल्या घाणीची मुस्कुटदाबी कराल, तर दुसऱ्या ठिकाणीं तिला तोंड फुटून तुम्हीं चालविलेल्या जुलमाला वाचा फुटल्यावांचून राहणार नाहीं."

सौभाग्यवती या वेळीं अगदीं मुद्देमालासकट सापडली असल्यामुळें तिला माझें बोलणें निमूटपणें ऐकून घ्यावें लागत होतें. तिच्या त्या असहाय स्थितीचा मी या वेळीं वास्तविक फार फायदा घेणें बरें नव्हतें; पण प्रसंग आलाच होता आणि राहवेना म्हणून मीं हळू हळू मनोगाहन, Suppression repression, expression वगैरे तत्त्वांचा 'डोझ्' तिच्या गळीं उतरविलाच. परंतु आतां तिला राहवेना म्हणून ती म्हणते, " मला मानसशास्त्राच्या गोष्टी सुनवून व स्वतःला मानसशास्त्रज्ञ म्हणवून घेऊन स्वतःच दुसऱ्याचें मन ओळखीत नाहीं हें कसें? इंदूला पोंचवून आलांत, तर पहिल्यांदा त्यासंबंधीं कांहींच न सांगतां मनोगाहन वगैरे अप्रस्तुत गोष्टींचीच चर्चा तुम्हीं चालविली

आहे. अन् म्हणे माणसाचें मन ओळखून त्याला काय हवें आहे हें पाहून बोलावें. मला आता तुमचें मनोगाहन पाहिजे आहे वाटतें?" आणि खरो-खरच माझी चूक झाली होती. तिला पकडण्याच्या भरांत मीच तिच्या हातीं सापडलों होतों! "बरं बुवा तसं का होईना" असें कांहींतरी अळसट हेल काढून मीं म्हटलें, व निघाल्यापासून तों परत येईपर्यंतची सर्व हकीगत सांगितली. गौतमाबाईंचा बोलघेवडेपणा व अहंमन्यता, मिस् अघारकरांचा अबोल व उद्योगी स्वभाव, मुलींचें गौतमाबाईबद्दलचें मत, आवारांतील स्वच्छता व टापटीप वगैरे सर्व कांहीं– होतें त्यापेक्षां जरा जास्तच खुलवून– सांगितलें.

'इंदूच्या खोलींत पहिल्यापैकीं कोण मैत्रिणी आहेत? मुलींना काय काय कामं करावीं लागतात? आजारीबिजारी पडलं तर कामाची सूट वगैरे मिळते का नाहीं? गांवांत कोणाला भेटायला जाऊं देतात कीं नाहीं?' वगैरे कितीतरी प्रश्न तिनें मला एकदम विचारले. आणि खरें सांगायचें म्हणजे यांतील एकहि गोष्ट माझे मनांत आली नसल्यामुळें मीं कशाचीहि चौकशी केली नव्हती. स्त्रीपुरुषांच्या पाहण्याच्या दृष्टि अगदीं निराळ्या पडतात तें कांहीं खोटें नाहीं. मीं फक्त पुरुषी दृष्टीनेंच पाहिलें होतें, हें सौभाग्यवतीचें लक्षांत येऊन ती जरा रागावली, पण लगेच मोठ्यानें हसून व माझेपुढें हात ओवाळल्यासारखें करून म्हणते, "अहाहाहा! कांहीं म्हणून कांहीं समजत नाहीं पुरुषांना! तिथें गेलांत, अन् त्या गौतमा का कोण फलाण्या बाई तिच्याशीं गप्पा मारून आलांत झालं. बायकांशीं गप्पा मारण्यापलीकडे पुरुषांना कांहीं सुचेल तर ना? हा आतांचा एक साधा प्रसंग आहे; पण लग्नासारख्या जन्माच्या गोष्टी पाहतांना सुद्धां तुम्हांला मुलीच्या दृष्टीनें काय पाहायचें हें समजत नाहीं. हें पुस्तकांतून आणि परीक्षेला नसतें त्याला तुम्ही काय करणार?" सौभाग्यवतीनें आमची चांगलीच शोभा केली; तेव्हां पुढच्या कामाला लागण्याच्या निमित्तानें मीं तेथून पाय काढला.

पुढें ७-८ दिवसांनीं इंदूचें पत्र येऊन सौभाग्यवतीला हव्या असलेल्या सर्व गोष्टींचा खुलासा होईतों मध्यंतरींचा आमचा काळ कसासाच गेला. दोघेंहि कष्टी व मनांतल्या मनांत चूर असे होतों. सर्व व्यवहार 'हो', 'नाहीं' अशा तुटक, एकेरी व जरूर तेवढ्याच शब्दांनीं व अगदीं तांत्रिक पद्धतीनें चालले होते. त्यांत घरोब्याचा अधिकपणा बिलकुल नव्हता. लग्नानंतर पहिले कांहीं

दिवस नवराबायकोंना दोघेंच दोघें असावेंसें वाटतें; त्या वेळीं तिसरें कोणीहि खपत नाहीं; ‘ two make a company, and three a crowd ’ अशी त्यांची स्थिति असते ! पण पुढें पुढें मात्र दोघेंच दोघें अश्या दुकलकोंड्या स्थितीचा कंटाळा येऊन कोणीतरी तिसरें लिंबलोणचें असावेंसें वाटूं लागतें. संसारांत मुलाची योजना नसती आणि सबंध जन्म दोघा नवराबायकोनींच काढायचा असें असतें, तर मला वाटतें, लग्नाच्या फंदांतच कोणी पडलें नसतें. नात्यागोत्यांतलीं पहिलीं जुनीं माणसें सोडून एका नवीन व्यक्तीचे पायीं सर्व आयुष्य वाहायला दुसरी व्यक्ति तयार होते, ती कांहीं त्या एकट्या व्यक्तीकरितां खास नव्हे. आईबापांच्या साम्राज्यांतून फुटून बाहेर पडायचें तें नुसत्या मियाबिबीचें स्वराज्य स्थापण्यासाठीं नव्हे, तर मुलाबाळांचें दुसरें स्वतंत्र साम्राज्य स्थापण्यासाठीं. स्वराज्याची तहान नुसत्या सुराज्यानें जशी भागत नाहीं, तशी साम्राज्याची तहान नुसत्या स्वराज्यानें भागणेंहि शक्य नाहीं. स्वराज्याची पूर्तता साम्राज्यानेंच व्हावयास पाहिजे.

सात-आठ दिवसांनीं इंदूचें पत्र तिच्या आईला आलें. “ मी खुशाल आहें. माझें सगळें ठीक जमलें आहे, कांहीं काळजी करूं नये ” वगैरे पहिला मामुली मजकूर लिहून झाल्यावर तिनें आपल्या खऱ्या अडचणी व तक्रारी लिहिण्यास सुरुवात केली.

“ दुसऱ्या दिवशीं मीं बाईंच्याकडे जाऊन चिंगी, वासंती व मी अश्या तिघींना एकाच खोलींत ठेवा असें सांगितलें. पण बाईंनीं ‘छे ! मीं केलें आहे तेंच बरोबर आहे’ असें सांगून माझी बोळवण केली. इतर मुली सांगत होत्या, कीं तूं त्यांचेकडे जाऊं नको. त्या नाहीं म्हणतील आणि मग मात्र तुला वाईट वाटेल. आई, एकाच गांवच्या मैत्रिणी-मैत्रिणींना एका ठिकाणीं नाहीं कां ग रहावेंसें वाटणार ? अन् आम्हांला एकत्र राहूं दिलें असतें तर त्यांत त्यांचें काय मोठेंसें बिघडलें असतें ? येथली कामाची तऱ्हाहि कांहीं निराळीच आहे. धुणें, झाडणें, भांडीं घासणें वगैरे कामें तर ज्यांचीं त्यांनीं करायचींच, पण आणखी पाळीचीं कामें म्हणून निराळीं असतात तींहि करायचीं ! माझ्यावर सुरुवातीलाच भाजी निवडण्याचीहि पाळी आली असून, मुली म्हणतात, थोडेच दिवसांत झाडण्याची पाळी येईल ! चाळीस मुलींची येवढी भाजी आम्हीं ७-८ मुलींनीं कशी ग निवडायची ? आणि ते मोठे मोठे व्हरांडे झाडावे लागले म्हणजे तर काय हाताचीं नुसतीं सालटीं

निघतात म्हणतात. आई, आम्ही मोलकरणी का ग आहों ? कां फुकट पोस-लेल्या पोरक्या पोरी आहों ? आम्ही येवढाले पैसे देऊन राहतों त्या यांचीं असलीं कामं करायला होय ? अन् जरा काम यांच्या मनासारखं झालं नाहीं, कीं वर यांचीं बोलणीं खायचीं ! परवां झाडणारी मुलगी झाडून गेल्यावर कोंपऱ्यांत एक गुंतवळाची जुडी दिसली, तश्या मेट्रनबाई एकदम गुरगुरल्या ! आणि त्या मुलीला बोलावून आणून तिच्याकडून त्यांनीं ती उचलून टाक-विली ! आजोळीं शेलारकरणीला नुसती शिवल्यें तर आजीनं मला लुगडं बदलायला सांगितलं, अन् आतां इथं कुणब्यांच्या मुली धडधडीत पंक्तींतून वाढतात, आणि आम्हांला खेटून जेवायला बसतात. आणि आतां लवकरच एक महाराची मुलगी येणार आहे म्हणतात ! मग तर कांहीं विचारायलाच नको !

बोर्डिंगचें कांहीं असलें तरी शाळेचें चांगलें चाललें आहे. मिस् अधारकर बाई फारच प्रेमळपणानें विचारपूस करतात. अन् शिकवितात तरी किती छान् अन् हसतखेळत ! त्यांनीं म्हणे पुस्तकें लिहिलीं आहेत. अन् चित्रें-सुद्धां किती छान काढतात ! इतर शिक्षकहि ठीक आहेत. पण दादामास्तरां-ची व इतिहास मास्तरांची सर कांहीं येथल्या सरांना येत नाहीं ! खेळण्याचें नीटसें न जुळल्यामुळें व अजून ओळखीहि चांगल्याश्या झाल्या नसल्यामुळें संध्याकाळीं मात्र अगदींच करमत नाहीं. कैद्यासारखें खिडक्यांचे गजाशीं येऊन व आभाळाकडे पाहत 'तूं आतां तांदूळ धूत असशील, नाना झाडांना पाणी घालीत असतील' अश्या आठवणी करीत बसतें, पण काळजी करूं नये; मी खुशाल आहें. ती० नानांना माझा शिरसाष्टांग नमस्कार.

तुझी आज्ञाधारक कन्यका

इंदु

ता. क. हें पत्र मी बाहेरून—चोरूनच म्हणेनास—पाठवीत आहें. येथें येणाऱ्या व येथून जाणाऱ्या पत्रांवर बाईंची देखरेख असते. भारी राग येतो, पण त्याचें आतांच नको. मीं केलेल्या कागाळ्यांसंबंधीं तुझे पत्रांत उल्लेख करूं नकोस. नाहीं तर सर्व प्रकार बयाबाईंच्या लक्षांत येऊन सगळेंच बेंड बाहेर फुटायचें!

इंदु "

पत्र वाचून झाल्यावर सौभाग्यवतीनें मजकडे पाहून जरा हसल्यासारखें केलें. इंदु गेल्यापासून असलें सहजसुंदर हसूं आज पहिल्यांदाच झळकलें असेल !

तिला आलेला 'मूड' घालविण्याकरितां मी मधूनमधून कांहीं तरी कोट्या व विनोद करून तिला हसविण्याचा प्रयत्न करीं; पण हा सर्व विनोद सहेतुक असल्यामुळें सहजसिद्ध व निर्हेतुक विनोदांतल्याप्रमाणें त्यांत मजा येत नसे. एकदां तर सौभाग्यवती चिडून म्हणाली सुद्धां, 'तुम्ही कां हसतां आहां हें मला काय समजत का नाहीं? मला हसविण्याकरिता हें सर्व चाललं आहे! आणि खरं सांगायचं तर इंदु गेली म्हणून तुम्हांला काय कमी वाईट वाटत आहे? बोहारणीला देण्याचे निमित्तानं मी इंदूच्या जुन्या साड्या गाठोड्यांतून काढून पुढें घेऊन बसतें, तर तुम्ही तिचीं जुनीं पत्रं पुस्तकांत खूण म्हणून घालून वाचीत बसतां! दोघांचेहि काय, अंतर्यामींचं दुःख आंतल्याआंत जिरवून टाकण्याचे प्रयत्न चालले आहेत, दुसरं काय? तुम्ही पुरुष जास्त लुच्चे म्हणून वरपांगीं हसण्याचा बहाणा करतां, आम्ही स्त्रिया जास्त सच्च्या म्हणून जश्या असतों तश्या दिसतों येवढंच."

असला अहेर झाल्या दिवसापासून मी सौभाग्यवतीला मुद्दाम हसविण्याचा प्रयत्न करण्याचें सोडून दिलें होतें. आणि म्हणून आज ती बरेच दिवसांनीं अगदीं स्वाभाविक रीतीनें हसल्यामुळें मला फारच आनंद झाला. मींहि तिच्या हसण्याला सारंगीसारखी मृदु व सुरेल साथ केल्यावर ती म्हणते, "तुम्हांला कोणीतरी उपदेश करायला हवंच असतं ना? हं—ही घ्या अगदीं वाढून संधि आली आहे. लिहा उत्तर, अन् काय तिला सांगायचं तें सांगा."

"अंहं! मी नाहीं लिहीत. ज्याला पत्र आलें असेल त्यानें उत्तर लिहावें! आम्ही कशाला मधें उगीच!" माझें हें जरा रुसव्याचें भाषण ऐकून सौभाग्यवती हसली व चेष्टेनेंच म्हणते, "अहाहा! बायकांना हसतां, पण आतां बायकांपेक्षांहि जास्त मत्सर वाटतो आहे कीं पुरुषांना! मीं समजलें, तिनें तुम्हांला न लिहितां मला लिहिलें म्हणून हें सर्व चाललें आहे. पोरीच्याऐवजीं एकादा पोरटा असता तर त्यानें तुम्हांलाच लिहिलें असतें. कोणीहि काय आपल्या जातीवर जायचें. आणि तसेंच म्हटलें तर मुलांना बापापेक्षां आईबद्दलच जास्त वाटलें तर त्यांत कांहीं नवल नाहीं. मुलाला मिळालेलें रक्तमांस तिनें आपल्या रक्तमांसांतून दिलेलें असतें. आणि कांहीं कांहीं वेळा तर पोराला जन्म देतांना बिचारीला स्वतःचा जीवहि द्यावा लागतो! पुरुषांचं ठीक आहे. त्यांचा होतो खेळ, पण जीव जातो बायकांचा. सर्व खस्ता खायच्या आयांनीं, आणि जन्मदाते म्हणून मिरवायचं बापांनीं! सगळं चांगलं असलं तर

बाप म्हणून नांव लावायला हे ऐतोबा तयार; पण जर का तसं नसलं तर तोंड काळं करून नामानिराळे व्हायलाहि हे तयार! काय पण कृतज्ञताबुद्धि!" सौभाग्यवतींचे हे शेवटचे शब्द अगदीं त्वेषानें उच्चारलेले होते. गोष्ट निघाली कशावरून, आणि गेली कशावर! वास्तविक हें सर्व अगदीं अप्रस्तुत व कांहींसें असंबद्धहि होतें; पण कुठला तरी राग कोणावर तरी निघाला झालं!

तिचें तें बोलणें त्या वेळीं अप्रिय व कडू वाटले खरें; पण पुढें त्यासंबंधीं विचार करूं लागलों तेव्हां त्यांत बराच सत्यांश दिसूं लागला. वास्तविक मूल व्हावेंसें दोघांनाहि वाटत असतें. आणि दोघेहि सुरुवात करितात ती आनंदानें व खेळ म्हणूनच करतात. तेव्हां 'तुमचा खेळ होतो, पण आमचा जीव जातो' हें जें बायकांचें म्हणणें आहे तें पहिल्यांदा तरी खरें नसतें. खेळाच्या सुरुवातीला दोन्ही पक्षांना सारखाच आनंद होत असतो. जीव जातच असला तर तो पुढें जातो. आणि त्यालाहि कारण पुरुष नसून निसर्गच आहे. तेव्हां या दृष्टीनें एकट्या पुरुषाला फारशीं नांवें ठेवतां येणार नाहींत. बायकांना पुरुषांचा खरा राग यावयास पाहिजे तो ते स्त्रियांवर निसर्गानें लादलेलें हें काम स्वतःचे शिरावर घेत नाहींत म्हणून नव्हे—कारण तें त्यांना तसें घेतांच येणार नाहीं—तर स्त्रियांची ही असहाय स्थिति लक्षांत घेऊन त्यांना त्यांच्या इतर कामांत ते शक्य तितकी मदत करीत नाहींत; उलट जशी आपल्यावर कांहीं जबाबदारी नाहीं, अश्या भावनेनें व निर्लज्जपणें खाका वर करून वागतात म्हणून यावयास पाहिजे. पुरुषांनीं यासंबंधीं जास्त कृतज्ञता-बुद्धि दाखविली पाहिजे यांत कांहीं शंका नाहीं. पुरुषांचें दुसरेंहि एक चुकतें, तें असें, कीं स्वतः तर ते आत्मसंयमन करीत नाहींतच, पण स्त्रियांचें आत्म-संयमनहि चालूं देत नाहींत. दोघांत पुरुष जास्त विचारी म्हणून जर म्हणायचें तर याहि बाबतींत पुरुषानेंच जास्त विचार करावयास नको काय?

इतकें झाल्यावरहि 'तूंच पत्र लिही' असा आग्रह धरणें बरें नव्हतें. आणि म्हणून मींच लिहूं लागलों; पण मनांत पुनः एक आडविचार आला, कीं लिहायचं आपण, पण दाखवायचं जसं कांहीं तिनं लिहिलं आहे. कितपत साधतें तें पहावें, असाहि एक दुसरा विचार येऊन येत कायम झाला. कोते विचार, बायकी भाषा, अशुद्ध लेखन हें सर्व कसें काय साधणार? शिवाय पत्रांत इंदूनें केलेल्या तक्रारींचें निराकरण झालें पाहिजे, व पुनः तिनें त्या केल्या आहेत असें तर तिच्या बाईंना समजतां उपयोगी नाहीं! नाटक बेमालूम होणें कठीणच होतें, पण करायचें ठरवलें, आणि लिहायला सुरुवात केली:—

मुक्काम कदंबपूर, मंगळवार.

"चिरंजीव इंदूस तिच्या आईचा अनेक अशिर्वाद. तुझी खुशाली ऐकून आम्हां उभयतांना फार आनंद झाला. तिकडून आल्याबरोबर मला सगळं सांगायचं झालं. पण तुझ्या हातचं पत्र येईतोंपर्यंत खरं समाधान झालं नव्हतं. शाळेची अन् बोर्डिंग्‌ची सर्व वेवस्था तुला अगदी आवडली अन् तुझ्या दोघी बाई फार चांगल्या आहेत असं ऐकल्यापासून सर्व काळजी नाहींशी झाली. देवाच्या दयेनं पुढं सासूही अशीच प्रेमळ भिळो म्हणजे झालं!

तुला भांडींचिंडीं वगैरे स्वतः घासावीं लागतात व इतरहि थोडंफार करावं लागतं असं इकडून समजल्यावर थोडा वेळ कसंसंच वाटलं. तुला तें आवडणार नाहीं अन् तूं कदाचित् पत्रांतून कागाळ्याहि करशील असं वाटलं होत. पण पोरी, तूं फार शहाणी आहेस! स्वतःच्या कामाकरतां दुसऱ्यावर काय म्हणून अवलंबून राह्यच? माणसाला स्वतःचं काम स्वतः करण्यान कांहीं कमीपणा येत नसून उलट मोठेपणाच येतो. कांहीं दिवसांमागं आपण रात्रीं कृष्णमूर्तीचं चरित्र वाचीत होतों. लांकडं फोडण्यापर्यंतची सगळीं काम कृष्णमूर्ति स्वतः करीत! अन् ओघानें गांधीजींची गोष्टहि सांगायची झाली. स्वतःच्या कामाशिवाय दुसऱ्यांचींहि कांहीं काम करावीं लागलीं तरी माणसानं तींहि आनंदानं केलीं पाहिजेत. आपल्या घाटावरील पर्वतेश्वराचा उच्छव होतो तेव्हां गांवांतील सर्व बायकापुरूष कामाला जातात. पुरूष वाढायला सुद्धां लागतात. त्यांनीं उष्टीं काढलीं म्हणजे त्यांना कमीपणा येतो असं का तुला वाटतं? प्रत्येकाच्या स्वतःच्या कामाशिवाय सर्वांची म्हणून

कांहीं कामं असतातच. अन् तीं करायला कांहींनीं पुढं झालंच पाहिजे. कामं फक्त पैशाकरितां अन् गरिबांनींच करायचीं असतात असं नाहीं. श्रीमंतांनीं सुद्धां व पैसे वगैरे न घेतां कामं करायचीं असतात. मी इथं बायकांच्या वाचनालयांत काम करतें त्याचा मला कांहीं पगार मिळत नाहीं. अन् तें काम फार मानाचं किंवा कमी मेहनतीचं असतं असंहि नाहीं. एखादी सभा करायची झाली म्हणजे दारं उघडून बसकण घालण्यापासून सर्व कामं खसमसून स्वतःलाच करावीं लागतात. आपल्या गांवांत गांधीजी आले होते तेव्हां मोठमोठया श्रीमंतांचे मुलगे देखील स्वयंसेवक म्हणून कामं करीत होते. तेव्हां मला सांगायचं काय, कीं इतरांचीं कामं करणं जरूर आहे, अन् तीं तूं मोठया हौसेनं करतेस हें ऐकून फारच आनंद झाला.

तुला चिंगी, वासंती वगैरे ओळखीच्या मुलींच्या खोलींत घालतां आलं नाहीं हें मला ह्यांनीं सांगितलं; तेव्हां मला जरा बरं वाटलं नाहीं. आपली ज्यांची ओळख आहे त्यांच्याबरोबरच नेहमीं राहावंसं वाटतं. पण त्याच माणसां-बरोबर नेहमीं राहण्यापेक्षां निरनिराळ्या संवयीच्या, निरनिराळ्या स्वभावाच्या माणसांशीं राहणं फायदेशीर आहे असं जेव्हां मला यांनीं सांगितलं तेव्हां मला त्याचं फारसं वाईट वाटलं नाहीं. खोलींतील नवीन मुलींची ओळख नीट करून घे. त्यांच्या नवीन नवीन गोष्टी शिकून घे. त्यांच्या बोलण्याचाल-ण्यांत कांहीं निराळेपणा असला तर तो पाहण्यांत तुला गंमतच वाटेल. नवीन चालीरीती कळतील. कितीतरी फायदा होईल.

बोर्डिंगांत कांहीं इतर जातीच्या मुली आहेत कीं नाहींत ? जेवणखाणाचे बाबतींत भ्रष्टाकार असेलच ! पण भ्रष्टाकार तरी कसला ? त्यांच्या अस्वच्छ संवयींमुळं आपण त्यांस शिवत नाहीं किंवा त्यांच्यांत मिसळत नाहीं. पण तेथें जर त्यांच्या संवयी चांगल्या असतील तर त्यांच्यापासून निराळें राहण्यांत कांहींच फायदा नाहीं. आतां तर महार वगैरेंना सुद्धां आपण आपल्या बरोबरीनं वागविलं पाहिजे असं गांधीजी म्हणतात; आणि म्हणतात येवढंच नसून त्यांनीं स्वतःच एक महाराची पोर आपल्या सत्याग्रहाश्रमांत ठेवली आहे. तेव्हां, तुझ्या आजोळीं जरी आपण मोलकरणीला वगैरे शिवत नसलों, आणि आपण घरींहि त्यांच्याशीं फारसें मिळून-मिसळून वागत नसलों, तरी

शाळा, बोर्डिंग्सारख्या ठिकाणीं हा भेदाभेद पाळलाच पाहिजे असं नाहीं. खुशाल मिळून-मिसळून वागावं.

तुझ्या मेट्रनबाई आपल्या कामांत मोठ्या चोख दिसतात. स्वच्छतेच्या आणि नेमून दिलेलें काम करून घेण्याच्या बाबतींत माणसानं जरा कडकच असायला पाहिजे, नाहीं ?

तुझ्या अघारकरबाईनीं कोणकोणतीं पुस्तकं लिहिलीं आहेत त्याची चौकशी कर. अन् येथल्या वाचनालयाकरतां कांहीं घेण्यासारखीं असलीं तर तीं विकत घेऊन मला पाठवून दे.

संध्याकाळीं करमत नाहीं म्हणतेस ? पहिल्या-पहिल्यांदा असं व्हायचंच. पण त्या वेळीं खेळत जा. किंवा खेळूनहि वेळ उरला तर विणायला घे. यांच्या नांवाची जिगाची पाटी भरणार आहेस ना तूं ? पण संध्याकाळच्या अंधेराचा डोळ्यांना त्रास होणार नाहीं येवढं बरीक बघ. नाहीं तर घरांत दोन चष्मे व्हायचे !

मुलींनीं पत्र पाठवायचीं तीं वरच्या बाईंना दाखवून पाठवायचीं असतात हें तुला माहीत नाहीं वाटतं ? त्यावर बाईंनीं कांहीं लिहलं नाहीं म्हणून विचारतें. मुलींचीं पत्रं बाईंनीं काय म्हणून वाचायचीं यासंबंधीं येथें आमचा कोण वाद झाला. 'मुलींवर बाईंचा इतका विश्वास पाहिजेच. बरं कांहीं वाईट असलंच आणि मुलींना आईबापांशीं कांहीं तक्रार करावीशी वाटलीच तर ती त्यांना न करूं देणं हा कांहीं खरा उपाय नव्हे. तक्रारीचं मूळ नाहींसं करणं किंवा मुलींना विश्वासांत घेऊन अमुक एकादी गोष्ट वाईट दिसत असली तरी ती तुमच्याच फायद्याची कशी आहे, किंवा ती नाहींशी कां करतां येत नाहीं हें मुलींना पटवून द्यावं' असं यांचं म्हणणं; पण मी म्हणत्यें इतकं कोण करताहे ? अन् करायचं तरी कशाला ? त्यापेक्षां पत्रं पाहूनच पाठवायचीं असं एकदां ठरवून टाकलं, कीं काम झालं. पहिल्यापहिल्यांदा जरा मुलींना वाटेल, पण एकदां संवय झाली, कीं कांहीं नाहीं. अन् शिस्त ठेवायची म्हणजे असं कांहीं तरी करावंच लागतं.

तुझ्या पत्रांतील लिहिण्याच्या चुका दिसायला नकोत म्हणून यांना मी तें स्वतःच वाचून दाखविणार होत्यें. पण यांनीं तें माझ्या हातून ओढून घेऊन स्वतः वाचलंच ! अन् हातांतल्या पेन्सिलीनं पांचपंचवीस फराटे ओढले. जसं कांहीं मास्तरच शुद्धलेखन तपासताहेत ! त्यांना म्हणा फारच नाद आहे. पण

आपलंहि चुकतं यांत कांहीं शंका नाहीं. 'तीर्थरूप' शब्दांतील 'ती' दीर्घ व 'शिरसाष्टांग' यांतील 'शि' ऱ्हस्व काढीत जा. मी तुझ्या चुका दाखवित्यें आहें पण माझ्याहि चुका आतां किती निघताहेत कोणास ठाऊक ? संध्याकाळीं आल्याबरोबर 'पत्र लिहिलं का ?' म्हणून विचारल्याबरोबर पुढं करावं लागेलच ना. असो, इकडील कांहीं काळजी करूं नकोस. आम्ही अगदीं आनंदांत आहों. अभ्यास व प्रकृतीला जपत जा. कळावें हे आशीर्वाद. इकडला तुला आशीर्वाद.

तुझी आई

**सुशिलाबाई."**

पत्रांत लिहिल्याप्रमाणें पत्र लिहून तिनें तें मला दाखविण्याचे ऐवजीं मीच पत्र लिहून तिला दाखवायचें होतें ! आणि मीं तिच्या चुका काढून तिची फजिती करण्याऐवजीं तिनेंच माझ्या चुका काढून केलेली फजिती पाहण्याचें नशिबीं आलें होतें ! कशाला येवढें करीत बसलों कोणास ठाऊक ! पण चेष्टा आणि गम्मत करायचा स्वभावच बनला तो एकाएकीं कसा जाणार ? सौभाग्यवतीनें पत्र वाचून पाहिलें. केव्हांहि काय तिला इतकें चांगलें लिहितां आलें नसतें हें उघडच आहे. आणि या दृष्टीनें तिला माझें थोडेंसें कौतुक वाटलें यांत शंका नाहीं. पण माझ्या या हिकमतीनें ती जरा चिडली व मजकुराच्या दृष्टीनें नाहीं तर निदान बायकी भाषेच्या दृष्टीनें तरी कांहीं चुका काढतां येतात कीं नाहीं हें मुद्दाम पाहूं लागली ! सगळें पत्र बारकाईनें पाहून घेऊन ती म्हणते कशी, " हें पहा तुम्ही किती बायकी आव आणा, पुरुष ते पुरुष. भाषा बायकांसारखी लिहिण्याचा प्रयत्न केलात तरी तुमचं मन का बायकी बनणार आहे ? आम्ही बायका पत्राला सुरुवात 'श्री' वगैरे कांहींएक न लिहितां करूं काय ? तसंच शेवटीं सही करतांना स्वतःच्या नांवामागं 'सौ०' घालायचं आमचे हातून चुकून तरी राहील काय ? तुम्हीं आपल्याकडून मुद्दाम चुका केल्या आहेत. मला 'चांगला दगड' म्हणून चिडविण्याकरितां 'सुशिला' असा ऱ्हस्व शब्द लिहिला आहेत, पण आणखी किती तरी चुका माझ्या लिहिण्यांत झाल्या असत्या ? हो म्हटल्यांनीं पुरुषांना स्त्री होतां येत असतं किंवा स्त्रियांना पुरुष होतां येत असतं तर कितीतरी पुरुष व स्त्रिया, स्त्रिया व पुरुष झाले असते ! कोणींच त्या भानगडींत पडूं नये हें बरं."

आणि हें तिचें म्हणणें मला पूर्णपणें पटलें. 'स्वाभाविक', 'स्वाभाविक' म्हणून जे म्हणतात, तें खरोखरच स्वाभाविक असावयास पाहिजे. स्वाभाविकपणाचा कृत्रिम रीतीनें आव आणण्याचा कोणीं कितीहि प्रयत्न केला तरी तो या ना त्या रीतीनें फसणारच! बायकासारखें लिहावें म्हणून अगदीं बायकांसारखें लिहिलें तरी तें अतिशयच बायकी होतें. इतकें कीं हा मुद्दामचा प्रयत्न आहे असें उघडकीस येतें! बरें, असें उघडकीस येऊं नये म्हणून जरा कमी लिहावें तरी पुनः तेंहि त्याच्यांतील उणीवेमुळें उघडकीस येतें! तेव्हां काय? असा अस्वाभाविक प्रयत्न करूं नये हेंच उत्तम. कोणतेंहि लिखाण जातिवंत होण्यास ज्यानें त्यानें जातीनेंच लिहिलें पाहिजे.



इंदूला पाठविलेल्या पत्राचें उत्तर येण्याची वाट पाहण्यापलीकडे आम्हांला करायला आतां कांहींच उरलें नव्हतें कीं काय कोणास ठाऊक! तिचें पत्र येवढा एकच आमचा उभयतांचा समान विषय होऊन राहिला होता. इंदूचें जीवन आमच्या जीवनांत इतकें एकजीव होऊन गेलें होतें, कीं आम्हीं आमच्याकरितां म्हणून करीत असलेल्या बहुतेक गोष्टी तिच्यासंबंधींच्याच होत्या. पण तीच आतां आम्हांला सोडून दुसरीकडे गेल्यामुळें आमच्या जीविताचा कोणीतरी एकाद्यानें मधलाच लचका तोडावा, अशी आमची स्थिति झाली होती. राम अयोध्या सोडून लंकेकडे निघाल्याबरोबर सर्व रामायणहि तिकडचेंच झालें. इंदूची गोष्टहि आतां, तीच तिकडे गेल्यामुळें, तिकडचीच होणार! इंदूचीं पत्रें, त्यांना उत्तरें याच आमच्या आयुष्यांतील घडामोडी होऊन बसल्या. त्या दिवसांकरितां बाकीचे दिवस घालवायचे. इंदूला आतां पत्र पोंचलें असेल, तिला तें कितपत आवडेल, पोरीचे वतीनें गौतमाबाईंची क्षमा मागितली होती, पण त्यांचा राग नाहींसा होतो किंवा नाहीं, वगैरे कितीतरी विचार मनांत घोळत. सौभाग्यवती तर 'मंगळवार मंगळवार आठ, बुधवार नऊ, गुरुवार दहा, शिक्कुरवार अकरा दिवस झाले, अजून उत्तर आलें नाहीं' असें जरा सचिंतपणें सांगत आली. पण इतक्यांत इंदूचें पत्र आलें आणि आमची अकरा दिवसांची काळजी संपली.

वंदे मातरम्.

**सेवाश्रम विद्यार्थिनीवसतिगृह**
**शाखा नं.४, गिरगांव, मुंबई.**

तीर्थरूप नाना यांसी कृ. शि. सा. न. वि वि.

ती. सौभाग्यवती आईचें—नव्हे तुमचेंच—पत्र पोंचलें. पत्राचे शेवटीं सही आईची असली तरी लिहिणारे तुम्हीच आहां, हें आंतल्या मजकुरावरून व हस्ताक्षरावरून सहज समजून आलें. गौतमाबाईंचेहि हें लक्षांत येऊन त्यांनीं तसें विचारलेंहि. लेखक कोणीहि असो, आंतील शिकवणुकीवर त्या खूष झाल्या.

नाना, हल्लीं हा नांवें बदलून लिहिण्याचा काय प्रकार निघाला आहे? लेखकाला स्वतःच्या नांवाची लाज वाटते, का त्या लेखाची लाज वाटते म्हणून तो आपलें नांव गुप्त ठेवतो? असो.

तुमची दोघांची खुशाली ऐकून आनंद झाला. वास्तविक 'आम्हां दोघांना कांहीं करमत नाहीं, आणि तुझी आई तर फारच दुर्मुखलेली असते' असें कांहींतरी तुम्ही लिहाल असें वाटत होतें, पण तसें कांहीं झालें नाहीं हें चांगलें झालें. का सगळं खोटंच ? पत्रांतल्या उपदेशाप्रमाणें वागण्याचा शक्य तो प्रयत्न करीन येवढेंच आतां त्यासंबंधीं सांगतां येईल.

या आठवड्यांत बोर्डिंगमध्यें विशेष कांहीं झालें नाहीं. सगळ्या गोष्टी यंत्राप्रमाणें चालू आहेत. नाहीं म्हणयला रविवारीं लाइट फीस्ट असून जेव-तांना बोलायलाहि परवानगी होती. संध्याकाळचा वेळ मात्र अजूनहि चांगला जात नाहीं. तुमच्या नांवाची पाटी करायला घातली आहे. आम्ही खोलीं-तल्या चौधी मिळून एक कॅरम् बोर्ड घेऊं का ? सरोजिनी अय्यर कॅरम्ची चँपिअन् असून ती आम्हांला शिकवणार आहे. तुमच्या पालकांची परवानगी असल्यास माझी हरकत नाहीं असें गौतमाबाई म्हणाल्या. इतर मुली सारा वेळ खेळतात तश्या आम्ही खेळणार नाहीं. फक्त संध्याकाळीं व सुटीचे दिवशींच खेळूं.

शाळेचें उत्तम चाललें आहे. गेल्या रविवारीं आमच्या वर्गांतील नवीन मुलींना मिस् अघारकरांनीं आपल्या खोलींत चहाला बोलावलं होतं. दर रविवारीं ४-५ नवीन मुलींना त्या अशाच बोलावतात. खोल्या लहानश्याच आहेत, पण त्यांतील सामान अगदीं वेंचकें व शेलकें असून तें अत्यंत टाप-टिपीनें मांडलेलें असल्यामुळें खोल्या कश्या आरश्यासारख्या स्वच्छ अन् चित्रा-सारख्या सुंदर दिसत होत्या. त्यांनींच काढलेलीं २-३ मोठीं चित्रें भिंतींवर लटकावलेलीं असून मधल्या टेबलावर त्यांच्या आईवडिलांचा एक फोटो ठेव-लेला होता. (नाना, तुमच्या दोघांचा एक फोटो मलाहि माझ्या टेबलावर ठेवायचा आहे. द्याल पाठवून ?) कोपऱ्यांतल्या शेल्फावर बरेचसे चांदीचें पेले असून मागें त्यांच्या भावाचे फोटो होते. पुस्तकांच्या कपाटांत त्यांचीं स्वतःचीं पुस्तकें दिसतील म्हणून पाहत होतें, पण तीं दिसलीं नाहींत. तीं मीं मिस् अघारकरांचेपाशीं मागून पाहिलीं पण त्या घुटमुळल्या. आणखी एकादे वेळीं पुनः मागेन. चहा पिणें चालू असतांना त्यांनीं आमची पुष्कळच विचारपूस केली. त्यांतल्या त्यांत माझी तर फारच केली; इतकी कीं तेथून निघाल्यापासून मुली मला 'आहेऽऽब्बुवा' असें सारखें चिडवीत असतात. (नाना, एकाद्याला एकाद्याबद्दल जास्त वाटलं तर त्यांत काय हो बिघडलं ?

मलाहि त्यांच्याबद्दल नाहीं का जरा जास्त वाटत ?) चहा पीत असतांना त्यांच्या भावानें आमची कितीतरी थट्टामस्करी केली ! हसतां हसतां पोट दुखून आलें. लहानसा दिसतो पण एम्. ए.चा अभ्यास करतो आहे म्हणे ! चहा झाल्यावर आम्ही थोडेसे पत्ते खेळलों. माझ्यावर गद्धा होण्याची पाळी येणार होती. पण तो मान मला न मिळतां बिचाऱ्या मधुसूदनाला मिळाला. पण तेवढ्यां-तल्या तेवढ्यांत त्याने " You are an assmaker, Miss Agashe ! आपणासारिखे करीती तात्काळ, काळ वेळ तया नलगे कांहीं " अशी कोटी करून बाजू माझ्यावरच उलटविली. खेळ झाल्यावर बाईंनीं व एक-दोन मुलींनीं गाणीं म्हटलीं. बाईंचा भाऊ दिलरुबा किती सुंदर वाजवतो ! मी म्हणत असतांना त्यांनीं फारच चांगली साथ केली. तीं दोघं बहीणभावंडं फारच चांगलीं आहेत, नाना !

शाळेंत काय काय गोष्टी कमी आहेत अशा गोष्टी निघाल्या असतां, मधल्या सुटींत कांहीं खेळण्याची सोय करण्यासंबंधीं मीं सुचविलं. तेव्हां पिंग्पाँग् सुरू करतां आल्यास पाहूं असें त्या म्हणाल्या. 'पुष्कळ गोष्टी आपणांस करायच्या आहेत, पण तुम्हीच पाहतां ना पैशाची किती चणचण आहे ? पुस्तकं वगैरेकरितां लोक कांहींतरी पैसे देतात, पण खेळण्या-च्या सामानाकरितां कोण पैसे देणार ? खेळ पुस्तकांइतकेच महत्त्वाचे आहेत असें लोकांना वाटतें आहे कोठें ?' असें म्हणून आम्हांला त्यांनीं रजा दिली. नाना, म्हणूं नये पण म्हणतें, समजा पिंग्पाँग् काढायचं ठरलं आणि त्याला शाळेंतून खर्च करतां आला नाहीं, तर तुम्ही कांहीं पैसे द्याल ? दुसऱ्याच पत्रांत मी जादा पैशाची गोष्ट काढीत आहें याचें माझें मलाच जरा चमत्कारिक वाटत आहे; पण खरं बोलायचं म्हणजे खेळण्यापेक्षां किंवा शाळे-पेक्षां मला मिस् अधारकरांबद्दलच जास्त वाटूं लागलें असल्यामुळें त्यांनीं मनांत आणलेल्या गोष्टीबद्दल आपणहि कांहीं करावं असं वाटतं; आणि म्हणूनच वरील गोष्ट काढली आहे. त्या स्वतः तसं कांहींच म्हणाल्या नाहींत.

आमच्या वक्तृत्वोत्तेजक सभेमार्फत परवां एका पुण्याच्या बाईंचें व्याख्यान झालें. व्याख्यानाचा विषय 'स्त्रिया धीट कश्या होतील' असा असून मिस अधारकरच अध्यक्ष होत्या. स्त्रियांच्या व्यायामासंबंधीं बोलतांना व्याख्यात्या बाई म्हणाल्या, " लाठी, लकडी, लेजीम वगैरे खेळ स्त्रियांना शिकवूं नयेत, त्यामुळें त्यांचें स्वाभाविक मार्दव व नैसर्गिक सौंदर्य नाहींसें होऊन त्या थेट

पुरुष बनतील, असें कांहीं कावेबाज पुरुष म्हणतात. ही त्यांची भीति अगदींच खोटी नाहीं. पण या घटकेला आम्हांला नुसत्या सौंदर्यापेक्षां धीटपणाचीच जास्त जरूरी आहे. आणि अंगीं धीटपणा येण्याचे दृष्टीनें नुसती लाठी-लकडीच काय, पण मी म्हणत्यें मुलींना Boxing सुद्धां शिकविलें पाहिजे. नाक, तोंड रक्तबंबाळ झालेलीं पाहून मन मेलं पाहिजे. अंगीं धीटपणा येण्याला व तो वाढविण्याला शिक्षणाचीहि वाढ झाली पाहिजे. बायकांतील पुष्कळसा भित्रेपणा त्यांच्या अडाणीपणामुळें आलेला असतो. तेव्हां शिक्षणाची– व विशेषतः व्यावहारिक माहितीची– अत्यंत जरूरी आहे. आपलं स्वतःचं वागणंहि अत्यंत चोख पाहिजे. आपल्या वागण्यांत कांहीं तरी चुकत आहे असं मनांत डांचत असलं म्हणजे, अंगीं धीटपणा येणें शक्य नाहीं. 'ज्याला नाहीं कर त्याला नाहीं डर', 'A guilty conscience makes man coward या म्हणी अक्षरशः खऱ्या आहेत." समारोप करतांना मिस् अधारकर म्हणाल्या, "व्याख्यात्यांनीं सांगितलेल्या गोष्टींत मला आणखी एका गोष्टीची भर घालावीशी वाटते. स्त्रियांना भित्रेपणा येतो तो त्यांच्या आर्थिक परावलंबनामुळें येतो. बायका भिऱ्यासारख्या वागतात त्याचें पुष्कळसें कारण आपण दुसऱ्यावर अवलंबून आहोंत, आपण एकादी गोष्ट धीटपणानें बोललों किंवा केली तर आपण ज्याच्यावर अवलंबून आहोंत त्याला आवडणार नाहीं, आणि मग तें आपल्याला जड जाईल असल्या जाणीवेमुळें त्या पुष्कळवेळां भित्रेपणानें वागत असतात. येवढ्याकरितां इतर गुणांबरोबरच आर्थिक स्वातंत्र्य मिळविण्याचाहि प्रत्येक स्त्रीनें प्रयत्न केला पाहिजे. स्वतः मिळविलेल्या पैशाबरोबर अंगांत एक प्रकारची धमक येते व तिच्या जोरावर मनुष्य धीट बनतो."

स्त्रियांच्या आर्थिक स्वातंत्र्याचा प्रश्न निघाला म्हणजे मिस् अधारकर कश्या अगदीं तावातावानें बोलतात! त्यांचा तो जोम पाहून ऐकणाराला खरोखरच आपण स्वतः कांहींतरी मिळवायला लागलं पाहिजे असं वाटूं लागतं. खालच्या वर्गांतील बायका मोलमजुरीचीं कामें करून स्वतः पैसे कमावतात व घरांत नवऱ्याचे बरोबरीनें स्वतंत्रपणें वागूं शकतात. पण आमच्यासारख्यांनीं काय हो करायचं नाना? त्यांना पुरुषांसारखं खूपसं शिकून मग एकादा धंदा करण्याशिवाय गत्यंतरच नाहीं.

व्याख्यान झाल्यावर मिस् अधारकरांनीं मी आमच्या वक्तृत्त्वोत्तेजक

सभेची सेक्रेटरी व्हावें, अशी इच्छा प्रदर्शित केली. त्यांनीं 'होच' असा हुकूम केला असता तर मीहि सरळ 'नाहीं' असें सांगून मोकळी झाल्यें असत्यें. पण त्यांनीं एकादी गोष्ट हसतहसतच सुचविली म्हणजे नाहीं म्हणायचं जिवावर येतं. मी म्हणाल्यें मला बोलायचं वगैरे साधणार नाहीं; पण त्या म्हणाल्या 'तें मला सर्व अगोदरच तुझ्या गांवच्या मुलींकडून कळलं आहे, आणि म्हणूनच तूं तें करावंस असं मला वाटतं', आणि असं म्हणून त्या निघून गेल्या. नाना, मी होऊं ना सेक्रेटरी?

आई हल्लीं खरोखरच आनंदी असते ना हो? का तुम्ही खोटेंच लिहिलेंत? तुमचें आपलें ठीक आहे. कांहीं सुचेनासें झालें, कीं शेजारच्या विनायकरावांना बोलावून जरा जादा गप्पा मारीत बसाल; पण बायकांना तसं साधत नाहीं. आईला म्हणावें वाचनालयाचं कामच जास्त वाढव व त्याच्याचतर्फेनें व्याख्यानें सुरू कर. मी मिस् अघारकरांना एकादें व्याख्यान द्यावयास घेऊन येईन. म्हणजे त्या निमित्तानें मलाहि यावयास सापडेल. खरंच दिवाळीच्या सुटीला अजून तब्बल साडेतीन महिने आहेत. आतांशी कुठें १५ दिवस झाले आहेत नाना, आईला एकदां घेऊन याल का हो?

असो—पत्र फार लांबलें, तेव्हां पुरें करतें. तीर्थरूप ('ती,' दीर्घ लिहिली आहे आं, नाहींतर म्हणाल— ) सौ. आईला साष्टांग नमस्कार कळवावा.

तुमची उभयतांची
इंदु."

पत्र वाचून झाल्यावर आम्ही दोघें कांहीं वेळ एकमेकांकडे नुसतींच पाहत बसलों. जशी कांहीं मालवलेली काळजी अजून पुरती निवायची होती! शेवटीं मींच म्हटलें, "झालं? आलं पत्र? आज आतां स्वयंपाक चांगला होणार ना? काल उगीचच रागावलीस ना? म्हणे रोज रोज कोथिंबीर कशाला आणायची? उन्हाळ्याचे दिवसांत पाण्याला वाळा, संध्याकाळचे वेळीं घराला धूप, कढीला कोथिंबीर, काकडीला हिंग, दौतींत भरपूर शाई, अश्या कांहीं कांहीं गोष्टी—मीं अगदीं पाहून ठेवलें आहे—अगदीं क्षुल्लक असतात, पण तेवढ्यांनींच जीवन कसं स्वादिष्ट बनतं! असल्या साध्या क्षुल्लक सुखांना स्वतःला मुद्दाम अंतरवण्यांत काय पुरुषार्थ आहे? अन् त्यांत ती येवढी काटकसर कशाला? तुला नाहीं हल्लीं सुचत, आणि भलत्याच गोष्टींवरून चिडतेस!"

"आतां मात्र खरोखरच चिडेन हां! लोकांच्या चिडी नी खोडी काढायची तुम्हांला भारी संवय!" दोघेहि मूळ पदावर येणार असें पाहून मीं तातडीनें विषय बदलला. "काय, फोटो काढायला कधीं येणार? इंदूला आपला ग्रूप हवा आहे ना? का तो लग्नांतलाच द्यायचा पाठवून? तुझं तें चंद्रकोर कुंकू, हिरव्या बांगड्या, हातांतलं कंकण—"

"अन् आपली ती झिरमिळ्यांची पगडी, करवतीकांठी धोतर, कपाळावरचं सारवळीचं गंध—"

एकमेकांची चेष्टा करता आल्यामुळें दोघांनाहि सारखंच हसूं आलं. तोच सूर पुढं कायम ठेवून मीं म्हटलं, "आणि तेव्हांपासून जी माझ्यामागें खुर्चीच्या पाठीला हात लावून उभी आहेस ती अजूनहि तशीच आहेस!" हें म्हटल्याबरोबर मात्र सौभाग्यवती खुर्चीला हात लावून मागें उभी होती ती पट्कन पुढें टेबलावर बसून बुबळं वर भिवयांकडे नेत किंचित् रुसल्यारखं पाहूं लागली! जशी कांहीं फोटोलाच बसली आहे! खिन्नतेचं मळभ जाऊन आज कितीतरी दिवसांनीं घरांत आनंदाचं उन्ह पडलं होतं!

"फोटोचं पाहूं पुढें, पण कॅरम् बोर्ड द्या ना घेऊन तिला, खरंच करमत नसेल पोरीला संध्याकाळीं. अन् तुमच्या त्या गौतमाबाईंना लिहावं, कीं अधेंमधें कांहीं खायलाप्यायला लागलं तर द्यावं. होईल थोडासा खर्च."

"खर्चाबद्दल कोण काय म्हणतो आहे? पण त्यांनीं ठरविलेल्या नियमांना किती अपवाद करायचे? आपल्याला आपली इंदु तेवढीच दिसते पण इंदू-सारख्या दुसऱ्या चाळीस मुलींना त्यांना वागवायचं आहे. प्रत्येकीला अश्या खास सवलती द्यायच्या म्हटलं तर मग नियम तरी कशाला?"

"तुम्हीच कां उगीच त्यांची बाजू घेऊन भांडतां? त्यांना म्हणूं द्या तसं, मग पाहूं. तुम्हांला नेहमीं लोकांचं बरोबर दिसतं."

"असं म्हणून कसं चालेल? सर्वांच्या सोयीकरितां केलेले नियम प्रत्येकजण पाळतो किंवा नाहीं हें पाहणं प्रत्येकाचं कर्तव्य आहे. 'एकादा नियम मीं एकट्यानें पाळला नाहीं म्हणून काय बिघडलें? बाकीच्यांनीं पाळावा म्हणजे झालें' असें म्हणून कसें चालेल. शासनसंस्थेचे नियम, कायदेकानू प्रत्येक व्यक्तीकडून पाळवून घेण्यांत प्रत्येक नागरिकानें मदत केलीच पाहिजे."

शासनसंस्था, नागरिक, कायदेकानू, कर्तव्य वगैरे पुस्तकी शब्द व एकंदर बोलण्याची व्याख्यानी तऱ्हा पाहून सौभाग्यवती हसून हळूच म्हणते,

" आमच्या वाचनालयांत एक व्याख्यान देतां का 'नागरिकांचीं कर्तव्यें' या विषयावर ? नाहींतरी इंदूनें लिहिलें आहेच व्याख्यानें करवीत जा म्हणून."

" माझ्याऐवजीं मग इंदूच्या त्या अधारकर बाईनाच बोलवीनास ? इंदु अगदीं खूप झालेली दिसते त्यांच्यावर."

" अहो, तो पहिला पहिला भर आहे. एकाद्याबद्दल पहिल्यांदाच मत चांगलं झालं, कीं तें मनुष्य अगदीं सर्वगुणसंपन्न–प्रतिदेवच– वाटूं लागतं. मी नव्हतें का सरोजिनीबाईची उपासक बनलें ? आणि तुम्हीहि नव्हता का अगदीं टिळकभक्त बनलां ? एक अंगरखाच काय तो अंगावर चढायचा राहिला होता. कांहीं दिवस गांधीटोपीहि डोक्यावर बसली होती. आतां मात्र यांत काय आहे, अन् त्यांत काय आहे असं म्हणतां."

सौभाग्यवतीला माझी चेष्टा करायची होती तें सोडून देऊं. पण तरुणांच्या पौगंड मानसशास्त्रांतील केवढें एक महत्त्वाचें तत्त्व तिच्या तोंडून न कळत बाहेर पडलें ! त्या वयांतील प्रत्येक व्यक्तीनें मनांत कोणी ना कोणी 'हीरो' योजिलेला असतो. त्याचे गुणानुवाद गाणें, त्याचें अनुकरण करणें, तो आपलें जीवित-ध्येय म्हणून डोळ्यांपुढें ठेवणें वगैरे गोष्टी या वयाला अगदीं स्वाभाविक आहेत. तेव्हां इंदूचे मनावर सध्यां तिच्या मिस् अधारकर बाईची पकड बसत असून ती त्यांची एक भाविक भक्त बनत असल्याचें पाहून आम्हांला फारसें आश्चर्य वाटलें नाहीं. या गंभीर विचारानें बोलणें तेथेंच थांबलें, आणि आम्ही आपआपल्या उद्योगाला लागलों.

---

— २२ —

कदंबपूर

चि. इंदूस अनेक आशीर्वाद, वि.

तुझें पत्र पोंचलें. तुझें चांगलें चाललेलें ऐकून दोघांनाहि बरें वाटलें. तुझ्या आईची प्रकृति खरोखरच चांगली आहे. दुसऱ्याला उगीचच काळजी लागूं नये म्हणून मनुष्य एकादे वेळीं जरी खरें लिहीत नसला तरी नेहमींच तो खोटें लिहील असें नाहीं.

कॅरम् बोर्ड अवश्य आणवावा. मात्र बाईंची परवानगी असली पाहिजे. ही सरोज अय्यर कोण? कोणी मद्रासी आहे वाटतें? खोलींतल्या बाकीच्या दोन मुली पंजाबी आणि बंगाली असाव्या! म्हणजे चांगलाच संच जमला! बाकी त्यांत कांहीं वाईट नसून भावी हिंदुस्तान असंच बनलं पाहिजे. उगीचच आपण एकमेकांना पारखीं झालों आहों. प्रवासाचीं साधनें नव्हतीं तेव्हां निराळें वाटणें स्वाभाविक होतें. पण आतां डोंगरांची, नद्यांची भिजास चालूं देतां कामा नये.

आम्हां उभयतांचा एकत्र फोटो काढण्याची कल्पना तुझ्या आईलाच तितकीशी आवडलेली दिसली नाहीं. तरुणपणचे ढंग आतां या वयांत शोभत नाहींत असं तिचं म्हणणं. तिचा एकटीचा फोटो आहे तो तिला चोरून पाठवीत आहें. फ्रेम करून तो टेबलावर अवश्य ठेवावा. तुला तुझ्या आईबद्दल—कदाचित् तिला डिग्रया वगैरे कांहीं नसल्यानें—विशेष कांहीं वाटत नसेल. अतिपरिचयामुळें असेंच व्हायचें. ती लोकांना तितकीशी सुशिक्षित वाटत नसेल; पण ती खरी सुसंस्कृत आहे. तिच्यासारखी ध्येयवादी, विचारी, निःस्वार्थी व कर्तव्यदक्ष बाई हजारांत सांपडणार नाहीं. आपणच आपल्या माणसाबद्दल असं म्हणायचं नसतं; पण तळची आंच जास्त झाली, कीं केव्हांतरी उतूं यायचेंच!

पिंगपॉंगचें शाळेंतून जमलें तर ठीकच. नाहींतर तुझ्या आईचे नांवानें दहा रुपयांपर्यंत खुशाल दे. योग्य गोष्टींत पैसा खर्च करायचा नाहीं तर तो मिळवायचा तरी कशाकरितां?

स्त्रियांना आर्थिक स्वातंत्र्य पाहिजे असें जें तुझ्या मिस् अघारकरांना वाटतें तें हल्लींची परिस्थिति लक्षांत घेतां योग्यच आहे. त्यांच्या शिकवणुकीचा तुझे

मनावर बराच परिणाम झालेला दिसतो; पण आपण पैसे कसे मिळवायचे यासंबंधींचा विचार आतांच पडावयास नको. पैसे कसे मिळवायचे याचा विचार पडण्यापेक्षां सध्यां मार्क कसे मिळवायचे याचा विचार तुला पडल्यास मला जास्त आवडेल. तुझ्या ध्येयांवर व आकांक्षांवर मी पाणी ओततों आहें, असें मानून कष्टी किंवा निरुत्साही होऊं नकोस. पण ध्येयाध्येयांत सुद्धां आजचें कोणतें, उद्यांचें कोणतें असा विवेक करावयास आपण शिकलें पाहिजे. त्यांतूनहि एव्हांपासूनच पैसे मिळवावेसें वाटत असल्यास एक मार्ग सुचवितों, पहा पटल्यास. हल्लीं मासिकांतून स्त्रियांच्या लेखांना मागणी असते, आणि त्यांबद्दल त्यांना पुरुषांचे मानानें मोबदलाहि बरा मिळतो. (पुरुष स्त्रियांचीं नांवें घेऊन कां लिहितात याचें उत्तर तुला हवें होतें ना ? पुष्कळसे हेतु असतात, त्यांपैकीं कांहीं कांहीं वेळां हाहि एक असतो.) तेव्हां स्त्रियांसंबंधींचाच एकादा विषय घेऊन, त्याचा चांगला अभ्यास करून त्यावर लिहावें. मिस् अघारकरांचीहि या बाबतींत तुला पुष्कळच मदत मिळूं शकेल. पहिल्यापासून पैशाची अपेक्षा करूं नकोस. तुला स्वतःला ज्या प्रश्नाबद्दल तळमळ वाटत असेल, तोच घेऊन त्यांत स्वतःचे खरे अनुभव ओतून लिहिलेंस म्हणजे लेख उत्तम होईल. विद्वत्तेचा, किंवा उपदेशाचा किंवा भाषेचा खोटा आव आणूं नये. स्वानुभूत व स्वाभाविक लिहिण्याचीच केव्हांहि काय किंमत असते. तेव्हां अशा रीतीचा प्रयत्न करून पाहावा.

मिस् अघारकरांची शाळेचें मासिक काढण्याची कल्पना असेलच. स्वतःचें मासिक असल्या दृष्टीनें फार उपयोगीं पडतें, विचारून पाहा. मिस् अघारकरांचा फारच आग्रह पडल्यास वक्तृत्वोत्तेजक मंडळाचा सेक्रेटरी होण्यास हरकत नाहीं; पण आपल्या कोणत्याहि कृतीनें आपण अधिकाऱ्यांच्या पुढें पुढें करून त्यांची मर्जी संपादण्याचा प्रयत्न करीत आहों असें इतरांना चुकूनसुद्धां वाटूं देऊं नकोस; आणि स्वतःचीहि फसवणूक करून घेऊं नकोस. माणसाला पुष्कळ वेळां वाटतें, कीं आपण सगळं निर्हेतुक करीत आहों, पण तें स्वार्थी असण्याचाहि तितकाच संभव असतो. त्यांनीं नुसती तुझी जास्त विचारपूस केली, तरी सुद्धां इतर मुली 'आहेऽऽऽब्बुवा' म्हणूं लागल्या याची आठवण असूं दे. असो, उपदेश फार झाला. पण तूं मोकळेपणानें विचारतेस म्हणून स्वतःला काय वाटतें तें तितक्याच मोकळेपणानें सांगावेंसें वाटतें.

आम्ही खरोखरच खुशाल आहों. विनायकराव हल्लीं नेहमींपेक्षां जरा जास्त

येतात हें कांहीं खोटें नाहीं, पण ते तुझी खुशाली ऐकण्याकरितांच येतात. त्यांना तुझें पत्र फारच आवडलें. कळावें, हे आशीर्वाद. तुझ्या आईचेहि तुला अनेक आशीर्वाद.

—नाना.

**ता. क.** तुझें पत्र आतांच हातीं पडलें. येवढ्या लवकर तुझें दुसरें पत्र आल्याचें ऐकून घाबऱ्या घाबऱ्या व लोण्यानें बरबटलेल्या हातांनींच सौभाग्यवती बाहेर धांवत आली. तूं सेक्रेटरी झालीस हें चांगलें केलेंस. Congratulations! तूं पत्रांत लिहिलेला पुण्याच्या बाईच्या व्याख्यानाचा सारांश सोबत पाठवीत आहें. पण तेवढाच सारांश वर्तमानपत्रांत देऊन चालायचें नाहीं, तो जास्त वाढविला पाहिजे. शिवाय सारांशाबरोबरच व्याख्यान चालू असतांना त्याचा परिणाम श्रोत्यांवर कसकसा होत होता, मधून मधून टाळ्यांचा कडकडाट किंवा 'Hear', 'Hear'चा मारा कसा होत होता हेंहि घातलें पाहिजे. व्याख्यानाला झालेल्या गर्दीचेंहि थोडेंसें रसभरित वर्णन केलें पाहिजे. आणि शेवटीं 'इंदु आगाशे, चिटणीस' असाहि ओझरता उल्लेख आला पाहिजे. स्वतःचें नांव छापून आलेलें पाहून माणसाला पहिल्या पहिल्यांदा तरी भारी आनंद होतो. Congratulations again, buck up my dear child.

Yours affectionately
Nana.

मी इंदूलाच पत्र लिहीत आहें हें सौभाग्यवतीनें पाहिलें असल्यामुळें अर्थातच तिनें तें वाचून दाखविण्याबद्दल मला सांगितलें. मींहि भान न राहून वाचावयास सुरुवात केली. पण जेव्हां तिच्यासंबंधींचा मजकूर लागला तेव्हां भानावर येऊन मी एकदम अडखळलों; व तो भाग सोडून एकदम पुढच्या पॅरिग्राफाला सुरुवात केली. पण माझी उडालेली तारांबळ तिच्या दृष्टींतून थोडीच निसटणार होती! शेवटीं ती जेव्हां लोण्यानें बरबटलेल्या हातानें तें पत्र मजजवळून हिसकावून घेऊं लागली तेव्हां मीच तो गाळलेला मजकूर तिला वाचून दाखविला. अर्थात् तिला तो आवडला नाहींच. तिनें फाडून टाकण्यास सांगितला, पण मी कांहीं ऐकेना. शेवटीं हो ना करतां करतां मी तो खोडून टाकायला कबूल झालों, व मी तो तिच्या देखत खोडून टाकावा या अटीवर तीहि कबूल झाली! व मीं जेव्हां तो खरोखरीच खोडला

तेव्हां तिचें समाधान होऊन ती घरांत निघून गेली! भाबडी बिचारी! या ना त्या रीतीनें फसलीच शेवटीं! खोडलेला मजकूर कोणाला वाचता का येत नाहीं? उलट त्याच्याचकडे आपलें जास्त लक्ष जातें. उगीचच आपल्याला खोटें समाधान वाटत असतें आपण तो खोडला आहे म्हणून! रात्रीं तिच्या तें एकदम लक्षांत येऊन ती म्हणते, " चांगलेच आहांत कीं हो! सकाळीं माझी छानच समजूत केलीत! मीच मूर्ख, तुम्हांला काय म्हणायचं?" पत्र अगोदरच पोस्टांत पडल्यामुळें गोष्ट हसण्यावारी नेण्यापलीकडे बिचारीला कांहींच करतां येईना.

मला वाटते बायकांची जातच भाबडी व फाजील विश्वासु! मीं किती वेळां तरी तिला अश्या रीतीनें चकविलें आहे! बऱ्याच वर्षांपूर्वीची गोष्ट. एकदां तिनें मोठ्या कौतुकानें कोंवळी काकडी चिरून व हिंगमीट लावून मजकडे आणली. फोड तोंडांत घातल्याबरोबर ती इतकी कांहीं कडू लागली, कीं एकाद्यानें ती ताबडतोब थूः थूः करीत थुंकून टाकली असती! पण माझे मनांत कलि संचारल्यामुळे 'आपण तर फसलोंच आहों, पण तिलाहि फसविलें पाहिजे, म्हणजे झालेलें दुःख भरून येईल' असें वाटून मी ती काकडी भिटक्या मार मारीत खाण्याचा बहाणा केला! एरवीं तिनें कदाचित् खाल्ली नसती; पण माझ्या भिटक्या पाहून व माझ्या आनंदांत भर घालण्याच्या सद्हेतूनें तिनेंहि एक सबंध फोड निःशंकपणें एकदम तोंडांत घातली! पुढें ती कशी चिडली, त्या भरांत तिनें हातांतली बशी माझेकडे कशी भिरकावली, व शेवटीं स्वतःच कशी मोठ्यांदा हसली वगैरे गोष्टी सांगण्याची कांहीं जरूरी नाहीं. गोष्ट पोरकटपणाची आहे, आणि केलेली थट्टा कांहीं डोक्याची नाहीं; पण तीवरून तिचा मजवर असलेला नितान्त विश्वास मात्र दिसून येतो. आणि मी तिच्या त्या विश्वासाचा वेळीं-अवेळीं गैरफायदा घेतों याची माझी मलाच लाज वाटूं लागते. मला थट्टेचें हें व्यसनच जडलें आहे. थट्टा कधीं कधीं अप्रासंगिक होऊन माझ्या इष्टमित्रांचें मनहि मजसंबंधीं वाईट होतें; आणि तसें तें झालें म्हणजे माझें मलाच वाईट वाटूं लागतें. पुढें दोनचार दिवस मी अगदीं गंभीर होतों; पण या कृत्रिम गंभीर-पणाचाहि दुसऱ्यांना त्रास होतो. तेव्हां हसणें-खेळणेंच बरें, त्यानेंच कोणाचें काय नुकसान होईल तें परवडलें असें वाटूं लागतें. जाऽऽऽऊं द्या झालें! 'स्वभावो दुरतिक्रमः' हेंच शेवटीं खरें!

सेवाश्रम विद्यार्थिनीवसतिगृह शाखा ४,
गिरगांव, मुंबई.

'वंदे मातरम्'

ती. नाना यांसी कृ. शि. सा. न. वि. वि.

तुमचीं दोन्हीं पत्रें पोंचलीं. मीं महिन्याभरांत पत्र पाठविलें नाहीं म्हणून तुम्हांला काळजी लागणें स्वाभाविक आहे.

मी १०-१२ दिवस थोडीशी आजारी होतें. हिंवाच्या ३-४ पाळ्या आल्या होत्या. आतां किंचित् अशक्तता मात्र राहिली आहे. बाकी सर्व ठीक. काळजी नसावी. बरें वाटल्याबरोबर पत्र लिहायचें, पण नंतर एक चमत्कारिक प्रसंग घडून आल्यामुळें पत्र लिहिण्यास मनच होईना.

आमच्या खोलींत चंद्रा मोरे म्हणून एक मुलगी आहे. वस्तु हताळण्याची तिला खोड असल्याचें आमचे तिघींचे लक्षात मागेंच आलें होतें. हातरुमाल, पिना, कोरे लिफाफे, अश्या क्षुल्लक वस्तु चोरून ट्रंकेंत ठेवण्याची तिला भारी वाईट खोड आहे. मी, सरोज अय्यर, मीनाक्षी देशपांडे वगैरे तिच्या मैत्रिणींनीं तिला किती समजावून सांगितलें; पण तिला तो मोह कांहीं आवरत नाहीं. वस्तु क्षुल्लक आहेत, आणि आपल्याच खोलींतली मुलगी आहे असें म्हणून आम्हीं ही गोष्ट कोणालाहि कळूं दिली नव्हती; पण तिनें एक दिवशीं निराळ्याच एका मुलीचा कंगवा चोरला!

नाना, असली कसली हो ही खोड? वास्तविक ती मुलगी इतर दृष्टींनीं किती हुशार व सालस आहे म्हणून सांगूं? तिच्या घरची मंडळीहि चांगली सुखवस्तु असून तिला खर्चायला पैसेहि कांहीं कमी येत नाहींत. एरवीं बोलाचालायला मुलगी किती गोड आहे! एकाद्याला चुकूनसुद्धां वाटायचं नाहीं, कीं हिच्या हाताला कांहीं अभद्र वाण जडला आहे.

कंगवा नाहींसा झाल्याचा बोभाटा सर्वत्र बोर्डिंगभर होऊन ती गोष्ट गौतमाबाईंचे कानांवर गेली; झालं! अगोदरच तारं त्यांतून शिरलं वारं! आपली येवढी कडक शिस्त असतां, अन् आपण रोज प्रार्थनेच्या वेळीं घसा फोडफोडून येवढा उपदेश करीत असतां, आपल्याच बोर्डिंगांत आपल्याच राजवटींत असें घडतें म्हणजे काय? चोवीस तासांत चोरानें स्वतः पुढें येऊन आपला गुन्हा कबूल केला पाहिजे अशी त्यांनीं एक धमकीची नोटीस काढली. आम्हां तिघींना चंद्रा मोरेचा संशय येत होता. त्याप्रमाणें आम्हीं तिला विश्वासांत

घेऊन विचारलेंहि. नेहमीं कबूल करणारी मुलगी ज्या अर्थीं आज नाहीं म्हणून म्हणते त्या अर्थीं तिनें तो कंगवा चोरलाच नसेल असें आम्हांलाहि वाटलें. संध्याकाळीं प्रार्थनेच्या वेळीं गौतमाबाईनीं सबंध बोर्डिंगमधल्या मुलींना बोल-बोलून घेतलें. 'तुम्हांला सत्याची चाड नाहीं, तुम्हांला चोरीची चीड नाहीं, तुम्हां सर्वांचेंच त्याच्यांत अंग असलें पाहिजे, तुम्ही गुन्हा छपवून ठेवून जाणून-बुजून गुन्हेगाराला लपवून ठेवतां आहां, तुम्ही न्यायाला मदत करीत नाहीं,'– एक नी दोन– हजार प्रकारें त्यांनीं सगळ्यांना बोलून घेतलें. शेवटीं गांधीजींची ऐट आणून त्या स्वतःलाहि नाहीं नाहीं तें बोलल्या; सगळ्या मुलींना उपाशी ठेवण्याची व स्वतःहि उपास करण्याची धमकी घातली ! स्वतः चोर पुढें येत नसेल तर दुसऱ्या मुलींनीं तरी चोरीचा तलास लावला पाहिजे; निदान आपला वहीम कोणावर आहे हें तरी सांगावें. तिला कांहीं बक्षिस देण्यांत येईल. नाहींतर सगळ्यांच्याच पालकांना कळवून दंड करण्यांत येईल. साम, दाम, दंड, भेद वगैरे सगळ्या उपायांची भाषा त्यांनी बोलून पाहिली, व रागारागानें त्या निघून गेल्या. त्यांच्या एकंदर वागण्यानें सगळ्या मुलींना राग आला आणि चोर आपण होऊन पुढें येण्याऐवजीं किंवा दुसरें कोणी त्याची माहिती देण्याला तयार होण्याऐवजीं उलट एकादीला पत्ता असला तरी तो लागूं द्यावयाचा नाहीं असा जणूं सर्वांनीं कट केलेला दिसला !

चार-पांच दिवस सगळ्यांचेच मोठ्या कष्टाचे गेले. प्रत्येकजण वरून आठरलेली अन् आंतून ताठरलेली होती. हो-नापेक्षां जास्त बोलणें नाहीं, थट्टा नाहीं, विनोद नाहीं, खेळ नाहीं, अभ्यास नाहीं ! पण प्रत्येकजण जणूं आपआपल्या व्यवसायांत चूर होऊन गेलेली होती. प्रत्येक मुलीला खोलींत बोलावून धाकदपटशा दाखविण्याचें काम चालूंच होतें. कोणी म्हणून स्वतः कबूल होईना, दुसऱ्या कोणाचें नांवहि सांगेना. शेवटीं यमू काळेनें बक्षिसाचे लालचीनें चंद्रा मोरेचें नांव भीत भीत सांगितलें! गौतमाबाईना तेवढेंच पुरून त्या आमचे खोलींत आल्या. आम्हां सर्वांना त्यांनीं जंग जंग पछाडलें. पत्रें पाठवून पालकांना कळविण्याची, त्यांना तारेनें बोलावण्याची, आमची रात्रीं धिंड काढण्याची, आमच्या शाळांतून कळविण्याची– काय वाटेल तें करण्याची त्यांनीं आम्हांला भीति घातली. आम्ही कोणीच– चंद्रा मोरेहि– बधेना. त्या फारच चिडल्या ! आम्ही आपण होऊन संध्याकाळपर्यंत कबूल झालों नाहीं, तर त्यांनीं आमची सर्वांसमक्ष झडती

घेण्याचें ठरविलें व त्याप्रमाणें वाट पाहून आम्हां चौघींना वहिमी गुन्हेगारां-प्रमाणें निराळे उभे करून सर्वांचे देखत दोन-चार मुलींकडून आमचें सर्व सामान धुंडाळवलें! चंद्राचें सामान तपासण्यास सुरुवात झाली तसा आमचा तिघींचा जीव खालींवर होऊं लागला! येऊं नये तें नशिबीं येणार! होऊं नये ती छीः-थू होणार! स्वतः चोरी केली नसली तरी चोराच्या संगतींत राहण्याचा ठपका अंगावर येणार! मग तुम्ही विचाराल आम्ही खरं सांगून मोकळ्या कां नाहीं झालों? नाना, खरंच सांगूं? गौतमाबाईनीं पहिल्यापासून प्रेमळपणाचं व खेळमेळीचं धोरण स्वीकारलं असतं, आणि त्यांची वृत्ति क्षमेची दिसली असती तर आम्हीहि हें लपवाछपवीचं निंद्य काम करायला तयार झालें नसतों. पण त्यांची ती दडपशाहीची चटक पाहून आम्हांलाहि जरा चेवच चढला! तीं दहा मिनिटें माझीं कशीं गेलीं असतील याची कल्पना, नाना, तुम्हीच करा. नुकतीच तापांतून उठलेली मी. रात्रीं मला पुन्हा सडकून ताप भरून दुसरे दिवशीं सकाळीं माझा चेहरा उतरलेला दिसला. चंद्राच्या नेहमींच्याच काव-याबाव-या दृष्टींत चोरटेपणा स्पष्टच दिसूं लागला. किती झालं तरी ती मुलगीच. अन् नाना खरं सांगायचं म्हणजे ती हेतुपुरःसर चोरी करणारी बिलंदर चोर नाहीं हो. सराईत चोरासारखें शेवटपर्यंत अगदीं ढिम्म चेहरा ठेवण्याचें तिला कसें साधणार!

आम्हा दोघींचे उतरलेले चेहरे गौतमाबाईचे नजरेस आल्यावांचून राहिले नाहींत. माफीचा साक्षीदार बनून यमू काळेनें जें कांहीं खोटंनाटं सांगितलं होतं त्यामुळें सर्व बोर्डिंगवरचा संशय उठून तो आमच्या खोलीवर येऊन दाखल झाला होता. आणि आतां तर खोलीवरचा उठून तो आम्हां दोघींनाच चिकटला होता. गौतमाबाईनीं आम्हांला पुनः छेडलें. शेवटीं आम्ही शाळेंत गेल्यावर त्यांनीं मिस् अधारकरांना पत्र लिहून झालेला सगळा प्रकार कळविला; व त्यांनाहि या प्रकरणांत चौकशी करण्याबद्दल विनंति केली. चंद्रा मोरे ही माझ्या वर्गांत नसली तरी आमचेच शाळेंत आहे. मिस् अधार-करांनीं मला मधल्या सुटींत बोलावून सगळा प्रकार समजावून घेतला. संध्या-काळीं शाळा सुटल्यावर पुन्हा खोलींत बोलावून व माझे पाठीवरून हात फिरवून त्यांनीं मला माहीत असलेलें खरें खरें सांगण्याची जवळ जवळ विनंतीच केली. त्यांच्या हाताच्या, त्या प्रेमळ स्पर्शानें, मऊ आवाजानें, पण भेदक दृष्टीनें मी अर्धवट विरघळून व भांबावून जाऊन रडूं लागलें; व

हुंदके देत देत चंद्रा मोरेच्या उचलेपणाच्या सगळ्या गोष्टी त्यांचे कानावर घातल्या! 'मला तुझा संशय नव्हताच, थोडासा होता तो तिचाच होता.' असें सांगून त्यांनीं माझी ताबडतोब बोळवण केली. मला सगळ्यांत जास्त वाईट वाटलं असेल, तर त्या वेळच्या त्या ताबडतोब बोळवणीचें! नाना, मिस् अधारकरांनीं आजपर्यंत मला असें कधीं झिडकारल्यासारखें केलें नव्हतें. वक्तृत्वोत्तेजक सभेची चिटणीस म्हणून, मासिक किंवा पिंगपाँग काढण्या-संबंधींची बोलणीं करण्याकरितां म्हणून कितीतरी वेळां मी त्यांचेकडे हल्लीं जात येत असतें. आणि प्रत्येक वेळीं कामाच्या बोलण्याव्यतिरिक्त आणखी जास्त कांहीं त्या बोलल्या नाहींत असं कधींच घडलं नव्हतं. संध्याकाळीं त्यांनीं माझेचबरोबर गौतमाबाईंना एक बंद केलेला लखोटा दिला. आंतील पत्र वाचून झाल्यावर गौतमाबाईंनीं मजकडे जरा चमत्कारिक रीतीनें पाहिलें, पण त्या पाहण्यांत सकाळचा जहरी कडवेपणा नव्हता.

दोन-तीन दिवस गेले. एके दिवशीं रात्रीं,—मला वाटतं चांगला एकचा सुमार असावा,—आम्ही सर्वजणी झोंपल्या आहोंत असें पाहून टॉर्चच्या उजेडांत चंद्रा आपली उशी उसवीत असलेली मला दिसली. मी अस्थिर झालें, व अर्थातच गाढ झोंपेचा बहाणा करण्याचा प्रयत्न करीत असूनहि मी जागी असल्याचा तिला संशय आला. चंद्रानें मला हळूच उठविलें, व डोळ्यांत पाणी आणून सांगितलें, कीं 'मी उद्यां घरीं जाणार, हा कंगवा मिस् अधार-करांना देऊन माझ्यातर्फे त्यांचे पाय धर. मी जाण्यापूर्वी त्या यमू काळेलाहि माझें नांव कळवून तिला तें १० रुपयांचें बक्षिस मिळवून देतां आल्यास दे. बिचारीला पैशाची ददात दिसते!' ती पुढें स्वस्थ निजल्यासारखी पडली. मी बराच वेळ अस्वस्थ होतें. पण पहांटे माझा डोळा लागला, तेवढ्यांत चंद्रा-आपलें जरूरीचें सामान घेऊन बाहेर पडली. मुख्य दारावरील शिपायाला तिनें अगोदरच मथवून ठेवलेला असावा. त्याशिवाय तिला असें गुपचूप जातां आलें नसतें. १।२ दिवसांत कोणाला कांहीं न कळवतां तो शिपाईहि पसार झाल्याचें समजलें. दुसरे दिवशीं तिनें सांगितलेलें सर्व कार्य उरकून मी मोकळी झाल्यें! मिस् अधारकरांनीं पुनः एक लिफाफा व तो कंगवा मजजवळ देऊन ते गौतमाबाईंना देण्यास सांगितलें. गौतमाबाईंनीं पुनः एकदां मजकडे पाहिलें. माझ्याबद्दलचा त्यांचा संशय नाहींसा झाला असावा, पण 'आपल्या हातून चोर निसटला, ही मोठी नामुष्कीची गोष्ट झाली' याचें त्यांना अतिशय वाईट

वाटलेलें दिसलें. स्वतःच्या फजीतीचें रूपांतर माझ्यावरच्या रागांत झालें असून त्या वेळेपासून त्या माझ्याशीं तितपतच बोलतात—सवरतात. मिस् अघारकरांचें माझेबद्दलचें मन जोंपर्यंत बदललें नाहीं तोंपर्यंत मी गौतमाबाईच्या रागाला तितकीशी जुमानणार नाहीं.

नाना, गेल्या महिन्या-दीड महिन्यांत या दोन बायकांच्या स्वभावांतील फरक चांगलाच दिसून आला. गौतमाबाईनीं जिवाचें काय रान केलें व काय थैमान घातलें हें मला प्रत्यक्ष माहीत आहे. मिस् अघारकरांनीं मात्र काय करून चंद्राचा गुन्हा तिचे तोंडून कबूल करून घेतला असेल हो? त्या दिवसांत त्या वर्गांत कधींहि रागावलेल्या वगैरे दिसत नव्हत्या. सगळं नेहमींप्रमाणं सुरळीत चाललं होतं. आणि मजा अशी, कीं शाळेंत अजून कोणाला यासंबंधीं फारसें समजलें नाहीं. चंद्रा निघून गेल्याचें कळल्यावर मात्र त्या फारच हळहळल्या!

नाना, या असल्या गोष्टी चालू असतांना मला पत्र लिहायचें कसें सुचेल? आतां त्यांतून सहीसलामत बाहेर पडल्यामुळेंच इतकें लिहिलें आहे. तुमचें पत्र काय आलें याचें भानहि नव्हतें. मी आतां अगदीं खुशाल आहे—मनानें व शरिरानेंहि. तुम्हांला—आईला या सर्व गोष्टींचें काय वाटेल कोणास ठाऊक! झालं तसं अगदीं खरं खरं लिहिलं आहे. अगदीं शपथ घेऊन सांगत्यें. जास्त लिहवत नाहीं. आईला म्हणावं लिहिल्यापैकीं अक्षरन् अक्षर खरं आहे. तिला नमस्कार.

तुमची दोघांची
इंदु.

— २३ —

कदंबपूर

चिरंजीव इंदूस सप्रेम अनेक आशीर्वाद वि.

तुझें पत्र वाचून फार दिवसांची चिंता नाहींशी झाली. एकदमच व अगदीं स्पष्ट सांगून टाकतों, कीं तूं जें जें लिहिलें आहेस त्यावर आमचा उभयतांचा पूर्ण विश्वास आहे. तूं करशील एक अन् लिहिशील दुसरेंच असें आम्हांला कालत्र्यींहि वाटणार नाहीं. तेव्हां त्यासंबंधीं निर्धास्त अस. चोरीच्या आरोपां-तून तूं मुक्त झालीस हे ऐकून जीव खालीं पडला. नुसता वहीम का होईना पण तो आला हें कांहीं तितकेंसें चांगलें झालें नाहीं. चंद्रा मोरेचा चोरटेपणा तुझ्या लक्षांत आल्याबरोबर तूं तावडतोब तो गौतमाबाईचे कानांवर घालून मोकळे व्हावयास पाहिजे होतेंस, म्हणजे तिच्या नशिबीचं होणारं जरी टळलं नसतं तरी तुझी जी मधल्यामधें निष्कारण बदनामी झाली ती झाली नसती असं तुझ्या आईचं म्हणणं पडलं. आणि निवळ न्यायाच्या आणि लौकिकाच्या दृष्टीनं पाहतां तिचं म्हणणं कांहीं खोटं नाहीं. पण न्यायाच्या आणि लौकिका-च्या दृष्टीपेक्षां जास्त उच्च अशी दयेची आणि ध्येयवादाची दुसरी दृष्टि आहे, आणि त्या दृष्टीनं पाहतां तूं आणि तुझ्या मैत्रिणींनीं चंद्राला सुधारण्याचा आणि तिच्या दोषांवर पांघरूण घालण्याचा शेवटपर्यंत प्रयत्न केला तेंच चांगलें केलेंत असें मला स्वतःला तरी वाटतें. लोकांचे दृष्टीनें त्यामुळें तुझी थोडी नाचक्की झाली असली, तरी मित्रकार्य करण्याचा जो कांहीं उच्च आनंद तुला लाधला त्यापुढें त्या नाचक्कीची इतकीशी मातबरी नाहीं, असें मी म्हणेन. माझ्या-वरहि एकदां एक असाच प्रसंग आला होता.

१९०८–९ चे ते दिवस होते. राजकीय चळवळीला अगदीं बहर आला होता. विद्यार्थ्याना व्याख्यानांना वगैरे जाण्याची सक्त मनाई होती; आणि असं असूनहि माझा एक मित्र–( हा माझेच वर्गांत असून तो आपल्याकडे वारानें जेवत असे.) व मी चोरून एका व्याख्यानाला गेलों. मी शाळेंत दार विद्यार्थी असल्यामुळें व माझे वाडिलांनीं माझेबद्दल रदबदली केल्यामुळें मी कसातरी निसटलों. पण हेड-मास्तरांनीं माझ्या मित्राला तो नादार असल्यामुळें चांगलेंच धारकशी धरलें. तो व्याख्यानाला गेला असल्याची साक्ष देण्याकरितां हेडमास्तरांना एक साक्षी-दार पाहिजे होता; आणि तें काम मीं करावें असें त्यांनीं परोपरीनें सुचाविलें.

व शेवटीं 'तसें न केल्यास तुलाहि शाळेंतून घालवून देईन, याद राख.' अशी धमकीहि घातली ! पण मी त्या वेळीं अगदीं तुझ्यासारखाच वागलों. त्या माझ्या वागण्याची थोडीबहुत झळ जरी मला माझ्या पुढच्या आयुष्यांत लागल्यावांचून राहिली नाहीं, तथापि मित्रकार्य केल्याचा सात्त्विक आनंद जो मला मिळाला, व अजूनहि मिळत आहे, त्यापुढें झालेल्या नुकसानीचें मला कांहींच वाटत नाहीं. ध्येयवादाचा आत्यंतिक आनंद मिळवायचा तर लौकिक नुकसानीच्या रूपानें त्याला जी कांहीं किंमत पडेल ती द्यायला माणसाची तयारी असावयास पाहिजे. ध्येयवादाचा आनंद मिळवूं आणि इतर व्यावहारिक सुखेंहि मिळवूं असें म्हणून कसें चालणार ? ऊंस खाण्याचें सुख पाहिजे, तर तो गमाविण्यासहि तयार असावयास पाहिजे. दोन्ही साधणें शक्य नाहीं. तेव्हां मला झालेल्या प्रकाराबद्दल फारसें वाईट वाटलें नाहीं; आणि त्याबद्दल तूंहि कष्टी होऊं नयेस येवढेंच मला सांगायचें आहे.

चंद्रा मोरेनें वास्तविक असें अचानक निघून जाण्याचें कांहीं कारण नव्हतें. तिनें मिस् अघारकरांपाशीं जसा आपला गुन्हा कबूल केला तसाच तो गौतमाबाईपाशींहि केला असता तर तिला आतांच शिक्षणाला मुकावें लागलें नसतें. ती मुलगी फारच हळव्या मनाची दिसते. पण, तूं म्हणतेस तसें गौतमाबाईच्या क्षमाशीलतेवर तिचा विश्वास असता, तर तिनें कदाचित् तसें केलें नसतें. आपलें शिक्षण बुडणार या विचारापेक्षां आपल्या सबंध जन्माचें मातेरें होणार हा विचार तिला फार जाचला असेल. एका अर्थानें ती मुलगी मोठी मानी असली पाहिजे. गौतमाबाईनींहि तिला शाळेंतून काढूनच टाकली असती असें नाहीं. पण प्रत्यक्ष भीतीपेक्षां काल्पनिक भीतीचा परिणाम केव्हांहि जास्त होतो. गौतमाबाईनाहि आपल्या मुलीनें चोरी केली याचें वाईट वाटण्यापेक्षां आपला अधिकार मुलींनीं झुगारून लावला व आपला स्वतःचा उपमर्द केला या अहंकाराच्या भावनेनें जास्त वाईट वाटलेलें दिसतें. अधिकाऱ्यांनीं आपल्या स्वतःच्या सत्तेचें डोळ्यांत तेल घालून रक्षण करण्यापेक्षां आपल्या हातांखालच्या माणसांच्या हिताची तळमळ वाहिली तर कितीतरी बरें होईल. मिस् अघारकरांनीं चंद्रा मोरेचा अपराध तिच्याच तोंडून कसा कबूल करून घेतला असेल या प्रश्नाचें उत्तर मी देण्याचें कांहींच कारण नाहीं. तें तुझ्याच हातून तुला न कळत अगोदरच बाहेर पडलें आहे. दुसऱ्याचें हित करण्याची खरी सदिच्छा व सहानुभूति, अन्योन्य विश्वास, आणि कोणतीहि गोष्ट घोळ

न घालतां शिताफीनें पार पाडण्याची अक्कल व तडफ इतक्या गोष्टी माणसांत असल्या म्हणजे असे प्रश्न सहज व सुखासमाधानानें सोडवितां येतात. 'सत्ता का सहानुभूति', 'अहंकार का परोपकार' हा झगडा प्रत्येकाचे मनांत चालू असतो, आणि या दोहोंपैकीं ज्याला म्हणून आपण बळी पडूं त्या मानानें आपण निंद्य का वंद्य हें जग ठरवीत असतें.

असो—या वेळचें पत्र मी लांबवीत नाहीं. एक तर तूं यापुढें या प्रश्नाचा विचार आजिबात करूं नयेस असं मला वाटतं; आणि दुसरं असं, कीं मीं कांहीं जास्त लिहिलं तरी त्यासंबंधीं विचार करण्याच्या मनःस्थितींत तूं अद्याप आली आहेस का नाहींस कोणास ठाऊक !

अजूनहि बारीक ताप किंवा मरगळ वगैरे वाटत असल्यास Atebrin म्हणून एक औषध मिळतें तें घ्यावें. बाटलींत १५ वड्या असून दोन्हीसांज जेवणानंतर एकेक वडी घ्यावयाची असते. किंमतहि फारशी नाहीं. येथें १ रु. १३ आणे पडले. पण तेथल्या डॉक्टरांनाच अगोदर विचारावें. नाहीं-तर मी उगीचच अव्यापारेषु व्यापार केल्यासारखें होईल. बाकी डॉक्टर तरी काय, असलींच पेटंट औषधें सांगतात. चहानें पित्त होत असल्यास कांहीं दिवस दूध घेत जा असें आईनें सांगितलें आहे. बसल्या पानीं नेहमींप्रमाणें जेवण जात नसल्यास मध्यंतरीं फळें वगैरे खात जा. खरेंच—आपले पांढरे बटाटे घेण्याचें जमलें तर बघ. अशक्तपणा एकदम नाहींसा होईल.

आम्ही दोघेहि खुशाल आहों. आमचा तुजबद्दल केव्हांहि गैरसमज होणार नाहीं याची खात्री असूं दे. या वेळीं पत्र मात्र लौकर आलें पाहिजे. कळावें, हे आशीर्वाद.

**नाना.**

**ता. क.**—प्रकृतीला जप आं.

तुझी आई
**सौ० सुशीलाबाई.**

सौभाग्यवतीनें पत्र वाचून व शेवटीं स्वदस्तुरचा ताजा कलम घालून तें बंदहि केलें; पण तिच्या चर्येवरून तें तिला फारसें आवडलेलें दिसलें नाहीं. मी पत्रांत सगळ्यांचे दोष दाखविले, पण इंदूचे दोष दाखवून त्याबद्दल तिला जितकें चापायला पाहिजे होतें तितकें चापलें नाहीं असें तिचें म्हणणें. " तुमच्या या उदारपणाचा भलताच अर्थ होण्याची फार भीति आहे. मुलीच्या

स्वैर वागण्यास बापाची नुसती संमतीच नव्हे तर अगदीं फूस आहे असें वाचणाराला वाटल्यास नवल नाहीं. ध्येयवादाच्या दृष्टीनें उच्च कोणतें, नीच कोणतें हें समजण्यापूर्वीं व्यावहारिक दृष्टीनें फायद्याचें कोणतें, नुकसानीचें कोणतें, हें मुलांना प्रथम समजलें पाहिजे. मुलांना वाटेल तसें वागायला काय होतें ! त्यांच्या आईबापांना तें निस्तरावें लागतें ना ? तुम्ही तुमच्या मित्राला वांचविण्याचें श्रेय घेतलें; पण बिचाऱ्या मामंजींना नाकदुऱ्या काढाव्या लागल्या असतील त्याची वाट काय ? विद्यार्थिदशेंत असलं कांहीं उपयोगी नाहीं." वगैरे कितीतरी गोष्टी ती तेवढ्यांतल्या तेवढ्यांत बोलली.

"किती ग तूं अगदीं पावलापुरतं पाहणारी आहेस ! मनुष्यानं जरा तरी पुढचं व वरचं पाहवं कीं ! Women above thirty are cowards असं कुणीसं म्हटलं आहे तें कांहीं खोटं नाहीं. इंदूचा याच वयांत काय जो ध्येयवाद असेल तो असेल. पुढं लग्न होऊन मुलंबाळं होऊं लागलीं आणि ती संसाराला जुंपली, कीं ध्येयवाद आपोआप ओसरेल. तूंच नव्हतीस का प्रथम लग्न करूं नये या मताची ? तें मत बाजूला जाऊन लग्न झालं. नंतर कांहीं दिवस सार्वजनिक काम करणारांना मुलं होतां कामा नये हा विचार डोक्यानं घेतला होता. देवाच्या कृपेनें म्हण—अवकृपेनें म्हण—एक नाहीं दोन मुलं झालीं. 'एकाद दुसरं मूल चालेल पण लेंढार उपयोगी नाहीं' असें पुढें कांहीं दिवस चाललें होतें. नाहीं म्हणायला देवानें ती इच्छा पुरी करून पुढची फजिती टाळली ती गोष्ट निराळी. मला म्हणायचें काय, कीं मनुष्य प्रसंगानें पुढें व्यवहारवादी व्हायचाच असतो. विद्यार्थिदशेंतच थोडेंबहुत ध्येयवादित्व असतें, आणि म्हणून तेंहि नाहींसें करण्याचा आपण मुद्दाम प्रयत्न करूं नये.

---

सेवाश्रम विद्यार्थिनी-वसतिगृह,
शाखा ४, गिरगांव, मुंबई.

ती. नानांना कृ. शि. सा. न. वि. वि.

तुमचें पत्र वाचून किती आनंद झाला म्हणून सांगूं? आपल्या मुलांच्या बोलण्यावर इतका विश्वास ठेवणारे आईबाप फारच थोडे निघतील. आणि माझे आईबाप त्या तसल्या थोड्या आईबापांपैकीं एक आहेत ही देवाची मजवर केवढी दया आहे! तुमची खुशामत करण्याकरितां म्हणून मी हें लिहीत आहें असें नाहीं. सरोज अय्यर आणि मीनाक्षी देशपांडे यांनींहि झालेला सर्व प्रकार आपआपल्या वडिलांना कळविला होता, आणि त्यांचींहि उलट पत्रें आलीं आहेत. त्या पत्रांतून त्यांनीं आपल्या मुलींना पुष्कळच दोष दिला असून त्या असल्या फंदांत पडल्याबद्दल त्यांनीं त्यांचे चांगलेच कान उपटले आहेत. अन् मजा अशी, कीं मीनाक्षीच्या बापानें तर मला चांगलाच ठपका दिला असून 'असल्या उडाणटप्पू व भलत्याच गोष्टींत पडणाऱ्या मुलीच्या संगतीला तूं लागूं नकोस. अधिकाऱ्यांच्या विरुद्ध काम करायचें म्हणजे काय! मीं असें कधीं केलें असतें तर आज सुखाचें पेन्शन् मिळतें आहे तें मिळालें असतें काय?' असा बराच मजकूर लिहिला आहे. ते पिढीजाद सरकारी नोकर आहेत येवढें लक्षांत ठेवलें म्हणजे त्यांना अधिकारी व अधिकार यांचा येवढा पुळका कां हें आपोआप समजेल. स्वतःच्या मुलीला ते वाटेल तें बोलते तर त्याला माझी ना नव्हती; पण त्यांनीं मधल्यामधें मला उडाणटप्पू म्हटलें याचें मात्र मला वाईट वाटतें व थोडा रागहि येतो.

नाना, मी खरोखरच उडाणटप्पू आहे का हो? तुम्हांला तरी तसें वाटूं देऊं नका. तुम्ही मला तुमच्या मागील पत्रांत लिहिल्याप्रमाणें मी हल्लीं इतर कांहीं विचार करीत नसून मार्क कसे मिळवायचे याच विचारांत असतें. कंगवाप्रकरणानंतर पांच-सात दिवस मी खिन्न व अस्वस्थ होतें. अभ्यासाकडे मन मुळींच लागेना; अर्थातच आठवड्याच्या गणिताच्या परीक्षेंत नापास झालें. मिस् अघारकरांच्या हें लक्षांत येऊन त्यांनीं मला आपल्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें एकीकडे बोलावलें, आणि अभ्यास करण्यासंबंधीं इशारा दिला.

मला थोडें वाईट वाटलें, पण त्यांनीं मला वेळींच जागें केलें याबद्दल मी त्यांचे आभार मानले.

नाना, खरंच कीं, मी वक्तृत्त्वोत्तेजक सभेची चिटणीस झाल्याबद्दल तुम्हीं माझें मोठें अभिनंदन केलें होतें, नाहीं ? अभिनंदनाबद्दल उलट आभार मानायचे असतात तें मी विसरलेंच कीं हो ! हिला कांहीं मॅनर्स नाहींत असें तर तुम्हांला वाटलें नसेल ना ? ती वेळच असली होती, कीं असले रीतिरिवाज पाळण्याकडे माझें लक्षच नव्हतें. तुमचा, बाकी, असल्या औपचारिक गोष्टींवर फारसा विश्वास नाहीं. एकदां कोणत्याश्या प्रसंगानें तुम्ही म्हणाल्याचें मला आठवतें, कीं माणसानें आभार बोलून दाखविण्यापेक्षां तें आभारी दिसून दाखवावें; आणि प्रत्यक्ष कृतीनें आभार मानणें तर सर्वांत उत्तम.

इतरांना औपचारिक वाटणाऱ्या गोष्टींवर मिस् अघारकरांचा मात्र कांहीं कांहीं बाबतींत भलताच कटाक्ष असतो. कोणीं कांहीं दिलें तर घेणारानें ताबड-तोब मान लवधून thank you म्हणून म्हटलेंच पाहिजे. कोणीहि शिक्षक वगैरे वर्गांत शिरल्याबरोर मुलींनीं Good morning sir, किंवा Madam म्हणून म्हटलेंच पाहिजे. कोणीहि कोणाशीं बोलतांना तोंडाशीं हातरुमाल धरलाच पाहिजे. इकडून तिकडे जातांना चालणारानें चवड्यावर चाललेंच पाहिजे. नेहमींच्या वागणुकींत त्या अगदीं घरगुती पद्धतीनें वागतील; पण असल्या रीतिरिवाजांच्या गोष्टींत अगदीं अडून बसतील. पहिल्यापहिल्यांदा आम्हांला हें त्यांचें तंत्र कांहीं जमायचें नाहीं. प्रथम सराव नसल्यामुळें जेथें thank you म्हणायला पाहिजे तेथेंहि म्हणत नसूं व पुढें फारच सराव झाल्यामुळें जिथें तसें म्हणायला नको तिथेंहि म्हणत असूं. एकदां वर्गांत त्या अतिशय रागावल्या, व त्या भरांत त्यांनीं एका मुलीला वर्गांतून चालते होण्यास सांगितलें. ती मुलगी नेहमींच्या संवयीप्रमाणें एकदम thank you म्हणाली. असा कांहीं हशा पिकला वर्गांत ! मिस अघारकर येवढ्या रागावले-ल्या पण त्याहि मोठ्यांदा हसूं लागल्या ! दुसरें कोणी असतें तर त्यानें त्या thank you चा भलताच अर्थ करून त्या मुलीच्या या उद्दामपणाबद्दल अधिकच शासन केलें असतें. पण मिस् अघारकरांनीं त्या मुलीला परत बोलावलं व या तिच्या thank you चा अर्थ कसा निराळा होतो हें प्रत्यक्ष समजावून दिलं. आपण पहिल्यांदा कशाकरितां रागावलों होतों हें सुद्धां आतां विसरून जाऊन त्यांनीं त्या मुलीला वर्गांतच बसविलें !

मिस् अघारकरांच्या स्वभावाची, नाना, हीच तर मजा आहे. वेळ आली, कीं त्या सपाटून रागावतील; पण ती गेली, कीं लगेच त्या हसायलाहि लागतील! याच्या अगदीं उलट गौतमाबाईंचें. कोणावर त्यांचा राग झाला म्हणजे तो कायमचा होतो. आतां हेंच पहा ना, कंगवा सापडला, चंद्रा मोरे निघून गेली, मुलींच्या मनाचा तो ताण कमी होऊन त्या जरा ओशाळलेल्या दिसताहेत, वास्तविक सगळं कांहीं विझलं आहे; पण यांचा राग अजून आंतल्या आंत धुमसत असून मधून मधून टोपलींत कोंडून ठेवलेल्या नागाप्रमाणें झांकण बाजूला करून डोकं वर काढतोच आहे! मनांतलं भूत अजून कांहीं सोडीत नाहीं. त्यांनीं त्या दिवसापासून जास्तच कडकपणा दाखविण्यास सुरुवात केली आहे. जाणाऱ्या येणाऱ्या पत्रांची देखरेख जास्तच कसून चालवली आहे. (तुम्ही दुसऱ्याच खेपेपासून परस्परच शाळेचे पत्त्यावर पत्र पाठविण्याची चांगलीच युक्ति काढलीत अन् मलाहि सुचवलीत! ही साधी युक्ति इतर कोणाच्या कशी अद्याप लक्षांत येत नाहीं?) मोरे प्रकरण होऊन वास्तविक कितीतरी दिवस झाले आहेत; पण कालच गौतमाबाईंनीं येथील सगळ्या अधिकाऱ्यांची एक बैठक भरवली. आम्ही मुली पाहातच होतों. अगदीं दारं लावून रात्रीं १२-१ पर्यंत बोलणीं चाललीं होतीं! The Trial of Seven Bishops हा धडा आमचा वर्गांत चालू आहे. आम्हांला त्या ज्यूरीचें वर्णन अगदीं प्रत्यक्ष अनुभवायला सापडलें! बैठक संपल्यावर एकेकजण किती गंभीर रीतीनें बाहेर पडत होता! जणूं काय त्यांनीं एकमतानें आम्हां सर्वांना फांशींच देण्याचें ठरविलें होतें! सभेंत खरें काय ठरलें देवाला ठाऊक! मुलींच्या पत्रांवर जास्त लक्ष द्यावयाचें, कोणावर काडीचाहि विश्वास ठेवायचा नाहीं, मुलींना एके ठिकाणीं मिळूंमिसळूं द्यावयाचें नाहीं, रात्रीं फार वेळ जागूं द्यावयाचें नाहीं हेंच ठरलें असेल, दुसरें काय! नाना सगळ्या गोष्टींची सगळ्यांनाच कशी चीड आली आहे!

पण मी आज भलतीकडेच वाहवलें आहें. अजून योजलेलें लिहायचें तर राहिलंच आहे. पण आतां निजलंच पाहिजे. कुणी जागतं आहे कीं काय हें पाहायला मेट्रनबाई निघालेल्या दिसतात! बिचारी हुकमाची चाकर! हो त्यांचींच तीं पावलं.

नाना तुम्हा दोघांस नमस्कार. तुमची

इंदु

कदंबपूर

चि. इंदूस सप्रेम अनेक आशीर्वाद वि.

माझ्या दोन्ही पत्रांना तुझें उत्तर नाहीं म्हणून आम्हांला अतिशयच काळजी लागली होती. तुझी आई तर तार करा म्हणूनहि सारखी म्हणत होती. इतक्यांत तुझें पत्र येऊन व तूं खुशाल असल्याचें वाचून काळजी दूर झाली. इतके दिवस पत्र न लिहिण्याला कारण काय, तर म्हणे 'लिहायला बसलं म्हणजे भान राहात नाहीं आणि मनांत येईल तें भरकटत सुटतें.' भान राहात नाहीं तर भान ठेवणें हा त्याला उपाय, का मुळींच पत्र न लिहिणें हा उपाय ? रोग एक, आणि औषध भलतेंच ! डोळे दुखतात म्हणून ते अजिबात काढून टाकण्यासारखाच आततायीपणाचा हा प्रकार नव्हे काय ?

खरं बोलायचं म्हणजे मेरिप्रकरणापासून तूं जरा चिडखोर झालेली दिसतेस. (का आणखी कांहीं कारण आहे कोणास ठाऊक !) नाहीं तर बोर्डिंगच्या गणेशोत्सवांत कांहींतरी पुढाकाराचा भाग घेतल्यावांचून तूं राहिली नसतीस. तूं म्हणतेस अभ्यास फार होता अन् वेळ उगीच फुकट जातो. हें सगळें खरें असेल; पण असल्या गोष्टींत घालविलेला वेळ फुकट गेला असें तुला खरोखरच वाटतें का ? मला नाहीं तसें वाटत. गणित, इतिहास, भाषा वगैरे विषयांचा अभ्यास म्हणजेच कांहीं सगळें शिक्षण नव्हे. संसारांत कराव्या लागणाऱ्या व्यवहारांची थोडी-फार ओळख होणें हेंहि शिक्षणांतच मोडतें. उत्सवासमारंभांच्या निमित्तानें निरानिराळ्या खेळांचे सामने झाले, कलाकुसरीच्या कामाच्या ज्या चढाओढी झाल्या, जे कांहीं नाट्यप्रवेश, संभाषणें वगैरे झालीं, जें प्रदर्शन भरलें त्यांत तूं भाग घेतला असतास तर त्यानें तुझें नुकसान न होतां फायदाच झाला असतां. या गोष्टी करण्याचा एरवीं कधीं प्रसंग येणार आहे ? गौतमाबाई तुला सेक्रेटरी हो म्हणून म्हणत असतांना तूं सेक्रेटरी तर झाली नाहींसच, पण दुसरीं कामेंहि अंगाबाहेर टाकलींस हें, खरें सांगायचें म्हणजे, मलाचसें काय पण तुझ्या आईलाहि तितकेंसें आवडलें नाहीं. झाल्या गेल्या गोष्टी विसरून (किंवा विसराव्या म्हणून) त्यांनीं तुला एखादी गोष्ट आपलेपणानें करावयास सांगितली तर तूंहि तितक्याच आपलेपणानें ती करावयास पाहिजे होतीस. तुला वाटत असेल मी त्यांची भली खोड मोडली; पण बाई ग, एकट्यादुकट्याच्यानें सत्ताधारी अधिकारी माणसांची कधीं तरी खोड मोडली जाईल का ? आणि

मोडता आली असती तरी एकमेकांनीं एकमेकांची खोड मोडीत बसणें हेंच का ध्येय आहे.? तूं सेक्रेटरी झाल्यानें बरोबरीच्या मुली, वरचे अधिकारी, हाता-खालचीं गडीमाणसें, बाहेरचे पाहुणेराउळे अशा निरनिराळ्या प्रकारच्या, निरनिराळ्या अधिकारांच्या माणसांशीं निरनिराळ्या नात्यांनीं वागतांना जो कांहीं प्रत्यक्ष अनुभव तुला आला असता त्याची शिक्षणाच्या दृष्टीनें कांहींच का किंमत नाहीं ? सर्वांशीं योग्य प्रकारें वागून प्राप्त परिस्थितींतून नीटपणें बाहेर पडतां येणें याचेंच नांव नीतिशिक्षण; आणि हें नीतिशिक्षण असल्याच प्रसंगांनीं मिळवायचें असतें. इतर सर्व मुली उत्साहानें आणि उल्हासानें कामें करीत असतांना तूं अभ्यासाची सबब पुढें करून एकटीच एका बाजूस बसलीस; पण या तुझ्या वागण्यानें तूं व्यावहारिक शिक्षणाला, व एका चांगल्या आनंदाला विनाकारण अंतरलीस आणि ज्या अभ्यासाकरितां तूं हें सर्व केलेंस असें म्हणतेस तो तरी कितपत झाला असेल याची मला खरोखरीच शंका आहे. मनांत उगीचच दुःखीकष्टी आणि हिरमुष्टी होऊन बसली असशील झालं !

मी इतकें कडक कधींच लिहीत नाहीं, आणि आतांहि या एकाच गोष्टी-वरून मी इतका पाल्हाळ करावयास नको होता; पण हल्लीं तुम्हां मुलांत एक प्रकारची नको ती वृत्ति उत्पन्न होऊं लागली आहे याचें वाईट वाटतें. यंदा येथल्या शाळेंतील मुलांनींहि शाळेंत गणपति वगैरे बसविला नाहीं; आणि कारण काय, तर म्हणे त्यांना सहामाही परीक्षा नको होती, आणि हेडमास्तर तर त्याला कबूल नव्हते. परीक्षेंत इतर दृष्टींनीं फारसा अर्थ नसला तरी त्या निमित्तानें झालेल्या विषयांची उजळणी होते, लिहिण्याची संवय लागते, विषयाकडे पाहण्याची निराळी दृष्टि येते, या गोष्टी तर कांहीं खोट्या नाहींत ना ! मग त्यांच्याविरुद्ध कांगावा करण्यांत काय अर्थ आहे ? शिवाय असें कीं, उत्सवाचे फायदे आहेत ही गोष्ट जशी लक्षांत असावयास पाहिजे तसेंच उत्सव नैमित्तिक आहेत त्यांनीं नित्याच्या कार्यक्रमांत खंड पडतां कामा नये हीहि गोष्ट लक्षांत ठेवावयास नको काय ? एक अभ्यास तरी करूं नाहीं तर उत्सव तरी करूं असें न म्हणतां आपणांस दोन्हींहि साधावयास पाहिजेत असें मुलांना वाटलें पाहिजे. आम्ही फक्त एक कांहीं तरी करूं अशी हेकट-पणाची व अडवणुकीची भाषा मुलें बोलावयास लागलीं म्हणजे आम्हां जुन्या माणसांना मोठं वाईट वाटतं. अर्थात् अधिकाऱ्यांचं थोडंसं चुकत असेलच, त्याशिवाय अशा थराला गोष्टी सहसा जात नाहींत हें खरें, पण त्यामुळें

मुलांचें मुळींसुद्धां चुकत नाहीं असें थोडेंच आहे ? असो. सर्वसामान्य रागाचे भरांत या वेळीं मी तुला जरा उणेंअधिक बोललों त्याचा राग मानूं नकोस. इंदे, प्रेमानें म्हण किंवा दुसऱ्या कशानें म्हण, तूं चांगली निघावीस—नुसत्या वर्गांतल्या अभ्यासांतच नव्हे, तर जगांतल्या वागण्यांत सुद्धां—आणि जें आम्हांला होतां आलें नाहीं तें तूं व्हावेंस असं सारखं वाटतं, म्हणूनच कधीं कधीं तूं जरा चमत्कारिक वागलीस म्हणजे मनांतून राग येतो. बाकी राग येणेंच चांगलें नाहीं का ? पण तो मला, तुला येतां कामा नये !

आतां तुमचीहि सहामाही परीक्षा असेल ना ? वर नंबर येईलच. इतर मुलांचा वेळ वाया गेला तसा तुझा गेला नाहीं आहे. येऊनजाऊन 'गणोबा'ची भीति; पण त्याचीहि शिकवणी आहेच. असो, आम्ही दोघे खुशाल आहों. दिवाळी कधीं येते आहे हें तुझी आई पंचांगांत पाहत आहे. कशाकरतां पाहत आहां असं विचारलं असतां 'नाहीं, उगीचच तयारीला लागाय-करतां म्हणून' असं ती तोंडानें म्हणत आहे. नुसत्या तयारीकरतां ती पाहत असेल असं तुला वाटतं का ? दिवाळीला मुली सासरहून कधीं येताहेत असं आयांना सारखं वाटत असतं. हल्लीं लहान मुलींना सासरं नाहींत तर बोर्डिंगं आहेत ! थट्टा जाऊं दे. सुटी झाल्याबरोबर तूं ताबडतोब निघून ये हं. काय ग, तुझ्या बाईंना आणि त्यांच्या भावालाहि इकडे बोलावलं तर— तीं येतील का ? त्यांना फार उद्योग असतील नाहीं ? आणि आपलं गांव तरी काय ? मुंबईच्या माणसांना इथं थोडंच करमणार आहे ! पण गोष्ट तर काढ. तुझ्या आईची फार इच्छा आहे तुझ्या मिस् अघारकरांना पाहण्याची.

कळावें, हे आशीर्वाद. नाना.

पत्र वाचून झाल्यावर सौभाग्यवती माझेकडे पाहून म्हणते, "अगोदर इतके रागावलांत कां, अन् मग इतकी सारवासारव कां केलीत ? तिचं वागणं जर तुमच्या मतं चुकीचं होतं तर नीट रागावून कां घेतलं नाहींत ? रागावर पाणी ओतल्यानं तिला तरी वाईट कसं वाटावं, व तिच्यांत सुधारणा तरी कशी व्हावी ? तें कांहीं नाहीं; तुम्हांला पुरतं रागावणं जमत नाहीं हेंच खरं. आणि तिला बरं वाटावं म्हणून तिच्या बाईंना अन् त्यांच्या भावाला बोलवायचं सोंग केलंत ! अजून पुरती ओळख देखील झाली नाहीं, तोंच तीं आपल्याकडे कशीं येतील ? आणि इतक्यांतच त्यांनीं यावं अशी माझीहि इच्छा नाहीं. उगीच माझं नांव पुढं केलंत झालं."

तिचें तें बोलणें ऐकून मी जरा खजीलच झालों. तिनें मला पुरतें ओळखलें होतें. कितीहि बतावणी करा, कांहीं म्हणून छपून राहात नाहीं ! बाकी एकमेकांपासून कांहीं देखील छपून न राहणें हेंच प्रेमळ जोडप्याचें लक्षण नव्हे काय ?

---

## -- २५ --

माझ्या मागील पत्राचें उत्तर इंदूनें न पाठवितां मिस् अघारकरांनींच पाठविलें होतें. "आपण आपलेपणानें केलेल्या निमंत्रणाला नाहीं म्हणवत नाहीं; चिरंजीव मधुसूदनाची परीक्षा जवळच आल्यामुळें त्यालाहि अभ्यासाला जरा निवान्त सापडेल, व माझीहि या मुंबईच्या भगभगींतून जरा सुटका होईल. जमल्यास इंदूचा अभ्यासहि करून घेण्याची इच्छा आहे, पण त्यासंबंधीं येवढ्यांतच नको—" वगैरे मजकूर त्या पत्रांत होता.

आमच्या आपलेपणाचा इतक्यांतच इतका परिणाम होऊन तीं दोघें बहीण-भावंडें याच सुटींत आमचेकडे येण्याचें ठरवतील असें आम्हां कोणास वाटलें नव्हतें, व त्यामुळें तीं येताहेत हें ऐकून जसें थोडेंसें आश्चर्य वाटलें तसेंच त्यांच्या साध्या घरोब्याचें कौतुकहि वाटलें. इंदु व पाहुणे मंडळी ठराविक दिवशीं बरोबर येणार अशी आम्ही वाट पाहत होतों; पण शेवटीं दाराशीं गाडी थांबून एकटी इंदूच सामान काढीत गाडीबाहेर पडली. मिस् अघारकरांचें एकदम कांहीं जरूरीचें काम निघाल्यामुळें तीं दोघें ४-५ दिवसांनीं मागाहून येणार असल्याचें समजल्यावर इंदूचे आईला जरा बरें वाटलेलें दिसलें. साहजिकच आहे. कोणी पाहुणेराउळे नसतांना आपल्या माणसांशीं आपल्याला जितकें आपलेपणानें वागतां येतें तितकें कांहीं ते असतांना येत नाहीं. इंदूला स्वतःचे हातानें नाहूंमाखूं घालणें, तिला कुशींत घेऊन तिच्याशीं गुजगोष्टी करणें, तिच्या खाण्या-पिण्याच्या हौसी पुरविणें या सगळ्या गोष्टी तिऱ्हाइतांदेखत कश्या साधणार!

इंदूला गेल्याला कांहीं फार दिवस झाले नव्हते, तथापि तिच्यांत आतां पुष्कळच फरक पडलेला दिसला. अंगापिंडानें तर ती आतां आपल्या आईच्या बरोबरीनें दिसत होती. तिला पाठमोरी पाहून शेजारणीपाजारणी 'अगबाई, इंदु, तूं का? मला वाटलं सुशीलाबाई' असं शारदा नाटकांतल्याप्रमाणें ओरडणार अशी भीति मला वाटत होती. तिचे हात-पाय वगैरे अवयव चांगले उफाडलेले व रसरशीत भरलेले दिसत असून नाकडोळे नीटस व पाणीदार दिसत होते. तिच्या अंगच्या काळेपणांतहि तारुण्याची तकाकी मारीत होती लहानपणीं मांजराच्या काळ्या पिलाप्रमाणें हडकुळी, बेडौल आणि वेडीविद्री दिसणारी माझी इंदू मोठेपणीं म्हणजे इतकी गोंडस, सुंदर आणि नीटनेटकी

दिसेल असें माझें मला सुद्धां कधीं वाटलें नव्हतें. आणि अशा अर्थाचें मीं जेव्हां तिच्या आईपाशीं बोलून दाखविलें, तेव्हां ती जरा आश्चर्यानेंच म्हणते "तुमचं आपलं सगळंच मुलखावेगळं असतं! मुली आपल्या पणांत आल्या म्हणजे अश्या दिसायच्याच!" तिच्या त्या बोलण्यानें एका सुभाषिताची आठवण झाली; आणि हा सगळा त्या 'प्राप्ते तु षोडशेवर्षे'चा परिणाम होय असें मनांत येऊन मी निसर्गाच्या योजनेचें कौतुक करूं लागलों!

तिच्या पोशाखापेहरावावर मुंबईच्या वागणुकीची पुष्कळच छटा दिसूं लागली होती. पिना, आंकडे, साबण, पावडरी, स्नो वगैरे शोभादायक व सौंदर्यवर्धक कितीतरी नवीन वस्तु तिच्या ट्रंकेंत मला आढळल्या. पूर्वीचीं साधीं, खादीचीं पोलकीं जाऊन त्या ठिकाणीं तलम रंगीबेरंगी चिटाचे ब्लाऊज्, जंपर, गार्टर्स, हातरुमाल वगैरे फॅशनेबल कपडे आले होते. नेसण्यासवरण्याच्या पद्धतींतहि पूर्वींचा सरळ-साधेपणा जाऊन त्याऐवजीं आतां शहरीं सुधारले-पणा दिसूं लागला होता. बोलण्यांत पूर्वींचाच सरळपणा असला तरी भांगांत बराच वांकडेपणा आला होता! आणि मन मोठं होत असलं तरी कुंकू बारीक होत चाललं होतं!

कांहीं म्हणा, वास्तविक या सर्व गोष्टी माझ्या डोळ्यांवर येऊं नयेत; पण तश्या त्या आल्या, व नुसत्या डोळ्यांवर आल्या येवढेंच नव्हे, तर थोड्याश्या डोळ्यांत सलल्याहि! असें चालायचेंच असें मी वरकरणीं कितीहि बोललों तरी 'हे चाळेच नवीन, का माझे डोळेच जुने' ह्या विचारानें मन कांहीं वेळ तरी अस्वस्थ झाल्यावांचून राहत नसे. शरिरांत फरक होणें स्वाभाविक आहे, पण हा कपडे वगैरेंतील फरक कसा पडतो? कांहीं नाहीं, तिला सर्व गोष्टी स्पष्टपणें समजावून देऊन आपल्या पूर्वींच्या साधेपणानें वाग-ण्यास बजावावें असा एक विचार मनांत येई. पण तिच्या वयाच्या इतर सर्व मुली तसेंच करीत असतांना, तिला मात्र तूं निराळ्या रीतीनें वाग असें सांगणें कितपत इष्ट आहे, व मला सांगणें इष्ट असलें तरी तिला त्याप्रमाणें वागणें कितपत शक्य आहे, असाहि दुसरा विचार मनांत येई. इंदूच्या बोलण्या-चालण्यांतहि बराच फरक पडूं लागला होता. पूर्वींचें तें नाचत-उडत चालणें आतां जरा संथ व स्थिर झालें होतें; पण अजूनहि मधूनच ती एकादी टुण-दिशी उडी मारी! बोलण्यांतला मूळचा मूलपणा जाऊन तें आतां पोक्तपणाचें होत होतें. पण त्यांतहि अजून कधीं कधीं शब्दांचा व उच्चारांचा धांदरटपणा

डोकावत असे. एकादें वाक्य बोलून गेल्यावर आपलं कांहीं चुकलं तर नाहीं ना अशा विचारानें ती Excuse म्हणून म्हणायची, किंवा आपलं म्हणणं जास्त स्पष्ट करण्याकरितां 'I mean' असें म्हणून पुढें सांगूं लागायची ! बोलतांना कोट्या करण्याची व स्वतःच मोठ्यांदा व लवून हसण्याची नवीनच लकब तिला लागलेली दिसली. कितीतरी नवीन नवीन गाणीं ती तोंडानें गुणगुणत असे.

मिस् अघारकर व त्यांचा भाऊ ३-४ दिवसांनीं येणार तेव्हां त्यांचा येथील मुक्काम मोठ्या मजेंत व आनंदांत जावा म्हणून त्या दोघी मायलेकींची मोठी धडपड चालली होती. तिची आई स्वयंपाकघर, माजघर वगैरे स्वच्छ व साफसूफ करण्यांत व पुढें करावयाच्या जेवणाखाणाच्या पदार्थांना लागणारी तयारी करण्यांत दंग झाली होती. बैठकीची जागा, पुस्तकांच्या शेल्फ्स, कपाटें वगैरे माझे मतें नेहमींप्रमाणें स्वच्छच होतीं; आणि एरवीं तीं विशेष स्वच्छ करण्याची कोणास आवश्यकताहि भासली नसती; पण बाईंचा भाऊ तेथें आतां बसणार, अभ्यास करणार या विशेष भावनेनें इंदु स्वतः तीं विशेष स्वच्छ करावयास लागली ! खालची फरशी धुणें, वरची सतरंजी उन्हांत टाकून ती ब्रशानें झाडणें, शेल्फा-वरील पुस्तकें काढून, तीं झाडून-झटकून पुन्हा नीट रांगेनें लावून ठेवणें, भिंती व त्यांवरील फोटो, तसबिरी वगैरे पुसणें, वरचा कडीपाट झटकणें, टेबला-खुर्च्यांवरचे पहिले अभ्रे व रुमाल बदलून नवीन घालणें वगैरे कितीतरी गोष्टी इंदूनें स्वतः केल्या ! पूर्वींसुद्धां या गोष्टी ती करीत असे, नाहीं असें नाहीं; पण त्या करण्याबद्दल मला सांगावें लागत असे, व ती त्या स्वतः करण्याऐवजीं मोलकरणीकडून करवून घेत असे. या सर्व गोष्टी स्वतः करण्याचा जो आपले-पणा व जी आस्था आतां दिसून आली ती पूर्वी दिसत नसे. इंदूची व तिच्या आईची ती गोड गडबड अन् धांदल पाहून मला मनांतून मोठी मजा वाटत होती; व मी त्या दोघी करीत असलेल्या गोष्टींकडे 'आपल्याला त्यांचें कांहींच सुखदुःख नाहीं' अश्या तटस्थ वृत्तीनें पाहत होतों. माझी ही तटस्थवृत्ति पाहून शेवटीं ती म्हणाली सुद्धां, " आम्ही दोघी कोण मर-मर मरतों आहों, अन् तुम्ही असे कसे स्वस्थ निवांत " ?

" तुम्ही मरमर मरतां आहां तें ठीकच आहे ! तुम्हांला मिस् अघार-करांकडून सुगृहिणी म्हणून म्हणवून घ्यायचें आहे, अन् इंदूला मधुसूदन-

रावांवर इंप्रेशन मारायचें आहे ! हें मी उघड म्हणणार नव्हतों पण तुम्हींच गोष्ट काढलीत म्हणून सांगतों. वाईट कांहींच नाहीं. उलट चांगलं आहे. पण आपली गोष्ट सांगितली. बिचाऱ्यांच्या मनामध्यें खरोखरच प्रेमभाव उत्पन्न होऊं पाहत असेल, आणि त्या प्रेमाची परिणति विवाहांत होणार असेल तर काय सोन्याहून पिवळं झालं. लोक लग्नानंतर दिवाळसण देतात आपण लग्नापूर्वी दिल्यासारखं होईल."

'तुमचं आपलं काहींतरीच' असं ती नेहमींप्रमाणं म्हणेल असं मला वाटलं होतं. पण ती कांहींएक न बोलतां गप्पच बसली. तिच्याहि डोळ्यांना इंदूंत पडत असलेला फरक दिसला असावा, व माझं म्हणणं पटलं असावं असं दिसतं.

ठरल्याप्रमाणें पाहुणेमंडळी आली. प्रवासाची दगदग, जागेचा नवखेपणा, माणसांचा अनोळखीपणा वगैरे नाहींसे होण्यांत २-३ दिवस गेले; व आतां सर्व मंडळी घरोब्याच्या नात्यानें वागूं लागली. लाज वाटतच असली कोणाची, तर ती मी मोठा म्हणून माझीच वाटूं लागली ! तिऱ्हाइत मालक बनले म्हणजे मालक तिऱ्हाइत बनणारच ! पहिले एक-दोन दिवस मधुसूदनरावांचा चहा बैठकीच्या खोलींत आला, पण मग तेच माजघरांत जाऊन झोपाळ्यावर चहा घेऊं लागले. पहिल्या पहिल्यांदा चहा, विडा वगैरे पदार्थ इंदूचे हातांतून मधुसूदनरावांचे हातांत जातांना त्यांना माझे हाताचा आश्रय करावा लागे; पण नंतर माझ्या मध्यस्थीचें कारण न उरून घेण्यादेण्याचे सर्व व्यवहार थेट व परस्परच होऊं लागले ! सर्व दिवसभर इंदूनें मधुसूदनरावांच्या दिमतीला व तिच्या आईनें मिस् अघारकरांच्या दिमतीला, (मी सौभाग्यवतीच्या, अन् माझ्या मात्र कोणीच नाहीं !) असावयाचें असा जणूं संकेतच पडून गेला ! लग्नानंतरचा एक काळ असा होता, कीं सौभाग्यवतीनें माझी मर्जी संपादन करायची ! नंतर तो काळ उलटून मी सौभाग्यवतीची मनधरणी करण्याचा काळ आला. इंदूचे जन्मानंतर आम्हीं उभयतांनीं तिची मर्जी संभाळण्याचा प्रयत्न केला. आणि आतां असा काळ आला होता, कीं इंदु एका तिऱ्हाईत तरुणाची मर्जी संपादन करूं पाहत होती ! प्रेमाच्या आणि आराधनाच्या विषयाचीं हीं स्थित्यन्तरें पाहिलीं म्हणजे मोठी मजा वाटते ! सर्व कांहीं काळावेळाला धरूनच होत असतें.

पाहुण्यांना स्नानाला पाणी देणें, धूतवस्त्रे स्नानगृहांत ठेवणें वगैरे कामें

पहिल्यांदा मोलकरीण करीत असे; पण 'ती पाणी कधीं कोंबटच देते, कधीं कढतच देते' अश्या निरनिराळ्या सबबींवर या सर्व कामांचा चार्ज इंदूनें स्वतःकडेच घेतला. सकाळच्या पोस्टानें येणारें ताजें वर्तमानपत्र मी होऊनच मधुसूदनरावांचे बैठकीचे खोलींत टाकीत असें; पण तेथल्या जुन्या वर्तमान-पत्रांचा ढीग इंदु माझे टेबलावर काय म्हणून आणून टाकीत असे हें मला कळत नसे! आल्यानंतर पहिले २-३ दिवस इंदु माझे पंक्तीला जेवायला बसत असे; पण आतां आईला काम करूं लागण्याच्या निमित्तानें ती मागा-हून बायकांबरोबर बसूं लागली. वाढतां-सवरतांना पहिल्यांदा जरी ती थोडीशी अवांकत व घोटाळत असे तरी पुढें ती चांगली धिटाईनें वाढीसवरी. तिसऱ्या प्रहरचा चहा तिनें आपलेकडे घेतला. एकदां दोनदां तर रात्रीचा स्वयंपाकहि तिनें स्वतःच केला, आणि तो पाहुण्यांना आवडलाहि! सांगायचें तात्पर्य असें, कीं पूर्वीं जी मुलगी—लहान म्हणून म्हणा, लाडानें म्हणून म्हणा, करतां येत नाहीं म्हणून म्हणा, किंवा स्वतः करण्यांत विशेष कांहीं वाटत नसे म्हणून म्हणा—कामाला आपण होऊन सहसा हात लावायची नाहीं ती आतां निर-निराळ्या कारणांनीं बऱ्याचश्या गोष्टी स्वतः करूं लागली होती! आतांच ही बुद्धि व प्रेरणा कोठून व कशी झाली!

खुद्द दिवाळीचे एक-दोन दिवस सोडले म्हणजे आमचे बाकीचे दिवस अगदीं रोजच्यासारखे गेले. विशेष पाहुणचार, मेजवान्या किंवा इतर औप-चारिक विधी वगैरे कांहींच नव्हते. आलेले पाहुणे निव्वळ विश्रान्तीकरितां किंवा मजेकरितां असे आलेच नसल्यामुळें त्यांचा बहुतेक वेळ ठरलेल्या व्यव-सायांतच जात असे. नाहीं म्हणायला चहाच्या, जेवणाच्या व फिरायला जाण्याच्या वेळीं मात्र मनसोक्त गप्पा, थट्टाविनोद वगैरे होत असे. मी मधून मधून सगळ्यांनीं मिळून पत्ते वगैरे खेळण्याचे प्रसंग मुद्दाम घडवून आणीत असें. मला स्वतःला म्हणजे खेळण्याची फार हौस होती असें नाहीं; पण मनांतील एक उद्देश असा, कीं त्या निमित्तानें इंदु व मधुसूदनराव यांना एकत्र बोलण्याबसण्याला, थट्टाविनोद करण्याला राजरोसपणें अवसर मिळावा व तेणेंकरून रुजूं घातलेल्या कोमल भावनांना अंकुर व पालवी फुटून त्या योग्य दिशेनें वाढाव्या. शिवाय आपल्यालाहि मधुसूदनरावांच्या स्वभावाचें, त्यांच्या सज्जनपणाचें, बारकाईनें पण त्यांना न कळत, निरीक्षण करतां यावें हाहि एक दुसरा हेतु होता. माणसाचा स्वभाव तो स्वतःला

विसरून वागत असतांना जितका चांगला कळतो तितका कांहीं ता त्याला जागता ठेवून कळत नाहीं. मधुसूदनराव खेळांत भिडू कोणाला घेतात, दाक्षिण्य व खिळाडू वृत्ति कितपत दाखवितात, थट्टाविनोद कशा प्रकारचा करतात या सर्वांवरून त्यांच्या अभिरुचीच्या व स्वभावाविषयींच्या कितीतरी गोष्टी पाहणाराला कळण्यासारख्या होत्या. आम्हीं नेहमींच्याच पद्धतीनें मधु-सूदनरावांना पाहावयाचें ठरविलें असतें तर आम्हांला या त्यांच्या खऱ्या स्वभावाची कांहींच पारख करतां आली नसती. आम्हीं त्यांचा फोटो पाहिला असता, फार तर ते नटून-थटून बसले असतांना आम्हीं त्यांना पाहिलें असतें. त्यांच्या डिग्ऱ्या पाहून त्यांच्या पुस्तकी पांडित्याचा अदमास केला असता. पण या पोषाखावरून व डिग्ऱ्यांवरून त्यांच्या अभिजात स्वभावाची कशी काय पारख झाली असती? बाह्य पोषाखावरून माणसाच्या अंतरंगाची पारख जशी होणार नाहीं तशीच त्याच्या पुस्तकी पांडित्यावरून त्याच्या सौजन्याचीहि खरी कल्पना येणार नाहीं. पुष्कळ वेळां सौजन्य आणि पांडित्य यांचें एकमेकांना वावडेंच असलेलें दिसतें. आणि एका तत्त्वज्ञानें म्हटल्याप्रमाणें पांडित्य ओसरलें म्हणजेच सौजन्य बहरूं लागतें.

या एकंदर प्रसंगीं इंदूची स्थिति मात्र मोठी कींव करण्यासारखी होत असे. स्वाभाविक आणि लौकिक किंवा कृत्रिम यांचा झगडा पदोपदीं पडून तिच्या वागणुकींत एक प्रकारचा घाबरटपणा आला होता. खेळतांना मधुसूदन-रावांच्या बाजूचें व्हावेंसें वाटे; पण तसें वाटणें बरें नव्हे– आणि होणें तर त्याहूनहि वाईट– याची जाणीव होऊन ती त्यांना मुद्दामच टाळी. त्यांच्याशीं उघडपणानें व प्रत्यक्ष बोलण्यासवरण्याची, किंवा त्यांनीं केलेल्या थट्टेला उलट थट्टेचा जबाब देण्याची लाज तर वाटे, पण लाज वाटतां कामा नये, आणि वाटलीच तर ती लोकांना तर मुळींच दिसतां कामा नये अशा जाणीवेनें ती धीटपणाचा आविर्भाव आणी. पण असला हा खऱ्याखोट्याचा चोरखेळ माझ्या बेरकी डोळ्यांना दिसल्यावांचून राहणें शक्य नव्हतें. आणि मीं तिच्या-कडे पहायचें नाहीं असें कितीहि ठरविलें तरी जेव्हां जेव्हां म्हणून आमची दृष्टादृष्ट होई तेव्हां तेव्हां ती पोर एकदम खजील व ओशाळी होई! हें सर्वच दृश्य इतकें हृद्य होतें, कीं अजूनहि त्याच्या गोड आठवणींतून मनाला बाहेर पडावेंसें वाटत नाहीं; पण केव्हां ना केव्हां तरी त्या आठवणींना बाजूला झाडून पुढें झटकलेंच पाहिजे.

आम्ही सर्वजण एके दिवशीं फिरावयास निघालों होतों. आमच्या जाण्याच्या रस्त्यावर किती तरी लहान लहान मुलें घोळक्या घोळक्यांनीं खेळतांना आमच्या दृष्टीस पडलीं. एकादें मोडकें फळकूट, एकादा चिंध्यांचा चेंडू, घराची पायरी, फुटका डबा किंवा केराची पेटी या स्टंपा अशा साहित्यावर क्रिकेटचे किती तरी मोठमोठे सामने मोठ्या जोसानें चाललेले होते! त्यांचा तो उल्हास, जाणाऱ्या-येणाऱ्या गाड्या-घोड्यांबद्दल वाटणारी बेपर्वाई वगैरे गोष्टी पाहून आम्हांला अतिशय आश्चर्य वाटलें!

"काय हा खेळण्याचा सोस! घरांना मागें पुढें बंदिस्त अंगणें नसल्यामुळें बिचारीं रस्त्यावर खेळूनच आपली तृप्ति करून घेताहेत! स्वतः अर्धपोटीं राहून मुलांना पोटभर खाऊं घालणें हें जसें आईबापांचें कर्तव्य आहे, तसेंच आपण संकुचित जागेंत राहून त्यांना खेळायला भरपूर जागा पुरविणें हेंहि त्यांचें कर्तव्य नाहीं काय?" मधुसूदनराव जरा गहिंवरून म्हणाले.

"अरे, बिचारे आईबाप काय काय करणार? कुटुंबांतील माणसांना जिथें उठाबसायला जागा नाहीं तिथें मुलांच्या खेळण्याच्या जागेकडे त्यांना कितपत लक्ष देतां येणार! खेड्यांतील लोक धंद्याच्या निमित्तानें शहरांतून गोळा होऊं लागले, आणि आपटे म्हणतात त्याप्रमाणें 'ग्रामीणांचें पौरीभवन' होऊं लागलें म्हणजे हें असेंच चालायचें." मिस् अघारकरांनीं भावाचें समाधान करण्याचा प्रयत्न केला. त्यांच्या त्या तार्किक पार्श्वभूमीवर मधुसूदनरावांचा प्रेमळ हळवेपणा फारच खुलून दिसला.

"हल्लींच्या दिवसांत प्रत्येकाला स्वतःचें घर व घराभोंवतीं अंगण असणें शक्य नाहीं. येवढ्याकरितां वास्तविक पाश्चात्य देशांतल्याप्रमाणें म्युनिसिपालिटीनें गल्लोगल्लीं खेळण्याकरितां मोकळ्या जागा राखून ठेवल्या पाहिजेत. पण बिचाऱ्या म्युनिसिपालिट्या तरी काय करणार! नागरिकांच्या साध्या गरजा भागवितां भागवितां त्यांच्या नाकीं नव येतात." मी पोक्तपणाचा आव आणून म्हणालों.

"तुमचं हें नानासाहेब नेहमीं असंच चालायचं! असल्या सुधारणा आस्ते आस्ते अन् गोडी-गुलाबीनें कधींच होत नसतात. त्याला मुसोलिनी किंवा हिटलेरसारखा एकादा दडप्या झोटिंगच पुढें यावा लागतो. किंबा

त्याहिपेक्षां खरं म्हणजे जिकडे तिकडे सोशॅलिझम झाला पाहिजे. भांडवल-शाहीच्या राजवटींत गरिबांच्या जरूरीपेक्षां श्रीमंतांच्या सुखसोयींकडेच जास्त पाहिलं जाणार!"

सोशॅलिझम्, गरीब लोक, त्यांचे हक्क वगैरे प्रश्न निघाले म्हणजे मिस् अघार-करांच्या चेहऱ्यावर एक प्रकारचा जोम व बोलण्यांत चेव येत असे. या वादांचा कधींच निकाल लागायचा नाहीं, आणि शिरा ताणताणून बोलण्याचा त्रास मात्र पदरीं पडायचा हें जाणून मी विषयान्तर करण्याची संधि पाहूं लागलों; आणि माझ्या सुदैवानें तशी संधि थोड्याच वेळांत मिळालीहि.

शहरातून बाहेर पडतो न पडतों तोंच एका बंगल्याकडे बरीचशी रहदारी लागलेली दिसली. काय आहे म्हणून पाहण्याकरितां आम्ही बंगल्यांत शिरतों तोंच 'आहे झालं मूर्खपणा; पोरांच्या अभ्यासाचं खोबरं व्हायचं, दुसरं तर कांहीं नाहीं' असे करमरकर मास्तरांच्या तोंडचे ओझरते उद्‌गार कानांवर आले. पाहुणे मंडळी वास्तविक बंगल्यांत यावयाची नाहींत; पण 'पोरांच्या अभ्यासाचं खोबरं' हे शब्द ऐकल्याबरोबर मात्र मिस् अघारकरांनीं आंत जाऊन पाहून येण्याचें ठरविलें. बंगल्यांतील मुलांनीं किल्ल्याचा देखावा केला असून खुद्द किल्ला व त्याच्या अनुषंगानें त्यांनीं केलेले इतर लहान लहान देखावे खरोखरच फार चांगले होते. किल्ल्याचे तट व बुरूज, मधला बाले-किल्ला, त्याभोंवतालचा तो खंदक, खंदकावर टाकावयाचा पूल, किल्ल्याच्या चौक्यांवर उभे केलेले संत्री-शिपाई, किल्ल्यांतील मुख्य दिवाणखान्यांत बसलेले शिवाजीमहाराज व त्यांचे अष्टप्रधान वगैरे गोष्टी कौतुकानें पाहण्यांत मिस् अघारकर गढून गेल्या होत्या; तर किल्ल्यापुढचें आगगाडीचें स्टेशन, आग-गाडी, रूळ, तारांचे खांब, स्टेशनमास्तर व त्याची मडम बागेंत चहा पीत असल्याचा देखावा वगैरे गोष्टी पाहण्यांत मधुसूदनरावांना मजा वाटत होती. तेथें इतर प्रेक्षकांची गर्दी असल्यामुळें किल्ला पाहून सुचलेले विचार उघडपणें बोलून दाखविणें इष्ट नव्हतें. किल्ला पाहिल्यावर आम्ही तेथून पुढें झटकलों व सर्वजण गप्पा मारण्याचे 'मूड'मध्यें आलों.

"ताई, शिवाजीमहाराजांच्या वेळींहि हिंदुस्थानांत चहा व आगगाडी होतीं असं दिसतं! आणि शिवाजीमहाराजांनाहि चहा आवडत असला पाहिजे. नाहींतर ज्याला गोवध बंद करतां आला त्याला चहाबंदी करणें कांहीं कठीण गेलें नसतें!"

कालविपर्यासाचें उदाहरण म्हणून दाखविण्याचे हेतूनें मधुसूदनरावांनीं वरीलप्रमाणें हसत हसत भाषण केलें.

त्यांच्या बोलण्यांत आपणहि भाग घ्यावा या उद्देशानें मी म्हणालों, " अहो, तो पूर्वपश्चिमांचा संगम झाल्याचें त्यांनीं दाखविलें आहे. किप्लिंग का दुसरे कोणी खुशाल म्हणोत, कीं 'The twins will nevr meet.' आमच्या भावी पिढीनें त्याला दिलेलें हें उत्तर आहे."

मिस् अघारकर म्हणाल्या, " शिवाजीसारख्या कट्टया देशाभिमान्याला देखील आपल्या डोळ्यांदेखत सर्रास चालू असलेल्या परदेशी चहाला आणि आगगाड्यांना मज्जाव करतां आला नाहीं. एक वेळ ब्रिटिश राज्य हिंदुस्थानांतून जाईल, पण चहा अन् आगगाडी जाणार नाहींत. एक वेळ तख्त फुटेल, तलवार तुटेल परंतु तागडी कायम राहणार याचें तें प्रतीक आहे ! "

" काय हो, मघांशी तो पोरांच्या अभ्यासाचं खोबरं म्हणणारा गृहस्थ कोण आहे ? कोठल्यातरी हपोसांतला कारकून असला पाहिजे." मिस् अघारकरांनीं मजकडे वळून विचारलें.

" अहो, ते कारकून नाहींत. येथल्या शाळेंतील एक चांगल्यापैकीं शिक्षक आहेत. त्यांचा म्हणे त्या मुंबईतील शिक्षकांच्या कॉलेजांत पहिला नंबर आला होता."

" काय ! ते शिक्षक, आणि Trained ! आणि असं असून त्यांना हें सगळं निरर्थक आणि नुकसानीचं वाटतं ! उगीचच बिचाऱ्यानें Project Method, Dalton Plan वगैरेंवरील पुस्तकें वाचलीन् ! नानासाहेब, या दिवाळीच्या किल्ल्यासारख्या प्रसंगांतून शिक्षण द्यावयाचंच म्हटलं तर कितीतरी देतां येईल. आतांच पहा ना, त्या मुलांनीं कितीतरी निरनिराळ्या प्रकारचीं कामं मनांत एक विशिष्ट योजना धरून केलीं होतीं. बांधकाम, लाकूडकाम, मातकाम, कागदकाम, इत्यादि प्रकारच्या हातकामांचा समावेश त्या एका देखाव्यांत झाला आहे. तरी त्या मुलांनीं किल्ल्याच्या पायथ्याशीं झोपड्या व त्यांच्याभोंवतीं थंडीच्या दिवसांतलीं पिकें खरोखरचीं उगवलेलीं दाखविलीं असतीं, तसेंच शिवाजीच्या व स्टेशनमास्तराच्या अंगावर खरोखरचे कपडे वगैरे चढविले असते, व या सर्व गोष्टी प्रेक्षकांना समजावून द्यावयास आपल्यापैकींच कांहीं मुलें आळीपाळीनें उभीं केलीं असतीं तर शेतीचें व जुन्या नव्या कपड्यांचें त्यांचें ज्ञान वाढून बोलण्या-सवरण्याचा धीटपणाहि त्यांचे

अंगीं आला असता. वास्तविक त्यांनीं गांवांतील प्रतिष्ठित मंडळींना लेखी निमंत्रणें पाठवून व भाषणें वगैरे करून एक मोठा समारंभच करावयास पाहिजे होता. म्हणजे याच प्रसंगानें आणखीहि कितीतरी व्यावहारिक गोष्टी त्यांचे हातून झाल्या असत्या. अशा सर्व गोष्टी खेळण्याच्या रूपानें का होईना, केव्हां ना केव्हां करतां येणें हेंच खरें शिक्षण."

"ताई, तूं पाहिजे होतीस त्यांना सूचना द्यायला. अग, कोणाला सुचत नाहीं म्हणून का या गोष्टी होत नाहींत? त्यांना पैसा अन् वेळ लागतो." मधुसूदनराव जरा चेष्टेच्या स्वरानें म्हणाले.

"वेळ आणि पैसा लागतो हें कांहीं खोटें नाहीं. पण मला वाटतें आम्हां वडील माणसांना मुलांच्या शिक्षणासंबंधीं खऱ्या कल्पनाच नाहींत. आणि कांहींना असल्या, तरी त्या कृतींत आणण्याइतकी त्यांना हौस नाहीं. बरं तें असो. मिस् अधारकर, तुम्ही आपल्या शाळेंत या दृष्टीनें काय काय करतां?"

"तें बरीक विचारूं नका आमच्या ताईसाहेबांना. 'परस्पर हितसंवर्धक मंडळा'च्या त्या सभासद आहेत!"

"चेष्टा करून मला चिडविण्याचें आज तूं अगदीं मनावरच घेतलेलं दिसतं! तरी बरं तूंच तक्रार करतोस, कीं शाळेंत नेहमीं कसले ना कसले उत्सव अन् समारंभ चालतात म्हणून! नानासाहेब, माझे हातून फारसं कांहीं होत नाहीं हें खरं; परंतु गणेशोत्सव, शाळेचं वार्षिक संमेलन, पालकदिन, शाळेचा वाढदिवस, निरनिराळ्या देवाविभूतींच्या जयन्त्या वगैरेसारख्या प्रसंगीं सर्व कामें—नुसतीं कामेंच नव्हे,—तर त्यांच्या योजना, त्यांचे कार्यक्रम, त्यांचीं बजेटें वगैरे करून त्याप्रमाणें वर्गण्या बसविणें, नाट्यप्रवेश—भाषणें वगैरे तयार करणें, जाहिराती, रिपोर्ट देणें—इत्यादीसारखीं बौद्धिक कामेंहि विद्यार्थांचीं विद्यार्थीच करतात. याचा अर्थ असा नाहीं, कीं मी किंवा माझे इतर शिक्षक कांहींच करीत नसून अगदीं तटस्थ किंवा नामानिराळे राहतों. एरवीं विद्यार्थ्यांनीं जीं कामें केलीं नसतीं तीं आम्हीं आमच्या स्फूर्तीनें, सहानुभूतीनें, व उत्तेजनपर दृष्टीनें त्यांचेकडून करवून घेतों. आणि शिकवणें शिकवणें म्हणजे तरी काय नानासाहेब? Making them to do and learn असं नव्हे काय?"

"अहो ताईसाहेब, शिरलांत तुम्ही त्या शैक्षणिक प्रान्तांत! पुरें तें तुमचें प्रॉजेक्टपुराण! तुला सांगायचीच असली तर त्या डाल्टन् 'प्लॅट'ची गम्मत सांग नानासाहेबांना. म्हणजे माणसाच्या अज्ञानाचा व आपण अज्ञानी

आहों असें समजून आल्यानंतरहि आपल्याच म्हणण्याची तरफदारी करीत बसण्याच्या त्याच्या आग्रही स्वभावाचा एक नमुना नानासाहेबांना माहीत होईल." दुसऱ्या विषयाचें निमित्त करून कंटाळा आलेला विषय बदलण्याची मधुसूदनरावांना फार चांगली हातोटी साधलेली दिसली.

"खरंच, नानासाहेब, मोठी मजाच झाली बरं का!" मिस् अधारकरांनीं सांगण्याला सुरुवात केली. "एका शाळेवरचा एक बडा अधिकारी, अति कामसू; शाळेंत काय काय नवीन उपक्रम करायचे याचा विचार सारखा चाललेला; तसं वाचन-बिचन पाहिलं तर तेंहि चांगलं; पण वाचतां वाचतां नजरचुकीनें जी एक चूक डोळ्यांत म्हणा—डोक्यांत म्हणा—राहून गेली ती कायमची राहिली. गृहस्थ 'डाल्टन प्लॅन्'च्या ऐवजीं 'डाल्टन प्लँट्' असें धरून चालला! आणि ही चूक जेव्हां कांहीं प्रसंगानें त्याच्या नजरेस आणण्याचा मीं हिय्या केला तेव्हा त्यानेंच मला अडाण्यांत काढून तो शब्द 'प्लॅन्' नसून आपण म्हणतों त्याप्रमाणें 'प्लँट्च' आहे वगैरे गोष्टी मलाच मोठ्या सोपपत्तिक रीतीनें समजावून देण्याचा प्रयत्न केला. मी आश्चर्यचकित होऊन गप्प बसलें. येवढा मोठा तज्ज्ञ सांगतो तेव्हां तें चूक तरी कसें म्हणायचें!"

"तुम्हां बायकांना आत्मविश्वास नाहीं म्हणून म्हणतात तें असं. एकादी गोष्ट धडधडीत चुकीची वाटत असली तरी ती दडपून 'ठोकून देतों ऐसाजे'ची बेडर पुरुषी वृत्ति अंगीं असावयास पाहिजे. मग ती गोष्ट बरोबर असल्यावर तर बोलायलाच नको. मी पाहिजे होतों तुझ्या ठिकाणीं. म्हणजे लगेच 'प्लॅन्'मधल्या 'एन्'वर बोट ठेवून तो त्याच्या डोळ्यांत खुपसला असता, आणि आपलं सगळं स्पष्टीकरण त्या गृहस्थाला परत घ्यायला लावलं असतं." मधुसूनदराव जरा फुशारकीनें म्हणाले.

"पण तसं करण्यांत तरी काय मौज होती? त्या बिचाऱ्यालाहि आलीच असेल कीं आपली चूक समजून. त्याचे दांत त्याच्याच घशांत न घालतां जरा सबुरी दाखविण्यांतच शोभा होती. अर्थात् त्या गृहस्थानेंहि आपली चूक नजरेस आल्याबरोबर ती कबूल केली असती तर जास्तच सुंदर झालं असतं. बाकी, त्या गृहस्थाचा Plan का Plant येवढ्यासंबंधींचाच काय तो गोंधळ होता. माझ्यासारख्या लोकांना तर तो Dalton हि माहीत नाहीं, अन् प्लॅन का प्लँट् तेंहि माहीत नाहीं."

मिस् अधारकरांना नवीन हुरूप चढून त्या Dalton Plan म्हणजे काय

तें सांगायला पुढें सरसावल्या; पण मधुसूदनरावांना असल्या गोष्टींचा कंटाळा आलेला पाहून मींच त्यांना फारसें उत्तेजन दिलें नाहीं. तथापि अधारकरांनीं तेवढ्यांतल्या तेवढ्यांत शाळेंत मुलांनीं अभ्यास करायचा तो एका ठराविक वेळापत्रकाप्रमाणें करण्याऐवजीं कोणत्या विषयाचा, केव्हां, किती वेळ करायचा हें सर्व त्यांच्या मर्जीवर व इच्छेवर सोंपवायचें; शिक्षकांनीं अमुक एका दिवसांत प्रत्येक विषयाचा इतका इतका अभ्यास झाला पाहिजे असें नेमून द्यायचें, व तो तसा झाला आहे कीं नाहीं हें पाहून व इतर रीतीनेंहि– पुस्तकें वगैरे देऊन– विद्यार्थ्यांकडून तो भाग पुरा करून घ्यावयाचा वगैरे डाल्टन् प्लॅन्च्चीं मुख्य तत्त्वें मला समजावून दिलींच.

"मुख्य म्हणजे, शक्य तों विद्यार्थ्यांचें विद्यार्थ्यानें व आपल्या इच्छेप्रमाणें शिकायचें, हेंच कनीं!" असें म्हणून मीं विषय तेथेंच संपविला. कोणतीहि शैक्षणिक बाब निघो, मिस् अधारकरांना ती दुसऱ्यांना समजावून देण्याची भारी हौस!

---

—२७—

दिवाळीचा सण दिवाळीला साजेशा काव्यशास्त्रविनोदांत पार पडून मिस् अघारकरांचा जाण्याचा दिवस जवळ येऊं लागला. पर्वतेश्वराची सहल व विनायकरावांच्या घरचा चहा येवढाच कार्यक्रम शिल्लक राहिला. दिवाळीच्या उरलेल्या करंज्या-कडबोळ्यांनींच पाहुण्यांची बोळवण करण्याच्या विनायकरावांच्या बेताची आम्हीं खूपच थट्टा केली व आम्ही याच वेळीं येत नाहीं असें अघारकरांनीं त्यांस कळविलेंहि. पण विनायकरावांचा व विशेषतः लक्ष्मीबाईंचा आग्रह पडल्यामुळें आम्ही सर्वजण त्यांचेकडे चहाला गेलोंच. मेजवानी व्हायची त्याप्रमाणें झाली. चहा व पचडी जरा पाणचट व पचपचीत झाली होती; पण चहासोबतच्या गप्पा मात्र बऱ्याच सकस व भरीव अशा झाल्या. आणि गंमत ही, कीं बहुतेक गप्पागोष्टी जरी पुरुषी आणि शैक्षणिक व सामाजिक विषयांच्या होत्या तरी त्यांत सौभाग्यवतीनें व विशेषतः लोकांत अशिक्षित गणल्या जाणाऱ्या लक्ष्मीबाईंनीं बराच भाग घेतला होता.

लक्ष्मीबाईंना इतर लोक जितक्या अशिक्षित समजतात तितक्या त्या नसल्याचें माझें मत फार दिवसांचें आहे. त्या आमच्या 'हि'च्यापेक्षां कमी इंटिलिजंट असतील, त्यांचें लेखनवाचन 'हि'च्यापेक्षां कमी असेल, उच्च प्रकारचा विनोद साधावयास लागणाऱ्या सम्यग्ज्ञानाचा व उदारवृत्तीचा अभाव त्यांचे ठिकाणीं जास्त असल्यामुळें त्यांना 'हि'च्याइतका मार्मिक विनोद साधत नसेल, सार्वजनिक म्हणून समजलें जाणारें काम त्यांचे हातून 'हि'च्याइतकें होत नसेल. पण एरवीं स्वतःच्या कुटुंबासंबंधींचीं सर्व कर्तव्यें व जबाबदाऱ्या त्या 'हि'च्यापेक्षांहि जास्त चांगल्या रीतीनें पार पाडीत असत. सुगृहिणी आणि सुमाता हीं विशेषणें त्यांचे बाबतींत अगदीं अन्वर्थक वाटत. 'बाईकर भटजीं'नीं आपल्या बायकोचें केलेलें वर्णन— कालमानपरत्वें थोडा फरक करून—त्यांना तंतोतंत लागू पडत असे. लहानसंच अन् भाड्याचं घर, पण त्यांनीं कसं आरशासारखं लख्ख ठेवलं होतं. दिवाळीचेच दिवस होते ती गोष्ट निराळी; पण इतर वेळींहि त्यांचें तुळशीवृंदावन व भोंवतालचें अंगण सारवून-सुरवून कसें निर्मळ असतें. विहिरीशेजारच्या आपल्या बागेंत त्या बारमहा घरापुरती भाजी व फुलें काढतात. त्यांचा आठ वर्षांचा बन्या सोडून दिला तर त्यांचीं बाकीचीं मुलें कशीं गुटगुटीत, नीटनेटकीं आणि चुणचुणीत असतात. घरांतलीं

सर्व कामं—धुणंपाणी, दळण-कांडण सुद्धां– त्या स्वतः करतात. केव्हांहि पहा, तिसरे प्रहरीं त्यांचें कांहीं ना कांहीं शिवणटिपण चाललेलं असतं. येवढा व्याप पुरा पडत नाहीं म्हणूनच कीं काय, त्यांनीं एक म्हैस बाळगली असून घराला पुरून उरणाऱ्या दुधांतून बाई वर्षाचे कांठीं शेंदोनशें रुपये सहज मिळविते ! सुइणीच्या कामावरही त्या थोडाफार स्वार्थ व परमार्थ साधतात. अश्या निरनिराळ्या प्रकारें घरांतला पैसा घरांत ठेवून शिवाय बाहेरची कमाईहि त्या करूं शकतात. कोणी बाई नवऱ्याला मदत म्हणून नोकरी करते असं त्यांनीं ऐकलं म्हणजे त्यांना तिची कींव येते व 'बिचारी पन्नास रुपये मिळवीत असेल, तर साठ रुपये घालवीत असेल' असें त्या म्हणतात. घरांतल्या रोगराई-करितां बाहेरचा डॉक्टर आणणें त्यांच्या अगदीं जिवावर येतें. 'जीव गेला तरच डॉक्टराकडे जाईन' असा त्यांचा या बाबतींतला निर्धार! सांगायचें तात्पर्य असें, कीं विनायकरावांसारख्या साध्यासुध्या, भोळ्याभाबड्या, खर्चिक माणसाचा संसार चांगल्या प्रकारचा चालला होता तो लक्ष्मीबाईसारख्या दक्ष, काटकसरी आणि सुग्रण बायकोमुळेंच चालला होता यांत बिलकुल संशय नाहीं. आणि त्यांनीं माझ्यासारखी प्रत्येक खेपेला पाठीवर थाप मारून अन् मुक्त-कंठानें बायकोला शाबासकी न दिली तरी बायकोच्या या गुणांची जाणीव त्यांना अंतर्यामीं नव्हती असें नाहीं.

हें 'लक्ष्मी'पुराण बरेंचसें लांबलें खरें; पण त्यांचेबद्दल माझे मनांत वसत असलेली आदरबुद्धि या निमित्तानें एकदां व्यक्त झाली हेंहि बरेंच झालें. कारण लक्ष्मीबाईना माझ्याविषयीं नेहमी असें वाटत असतें,'कीं या माणसाला आपल्या-बद्दल कांहींच वाटत नाहीं.' असो.

चहाच्या ओघांत बन्याच्या जड आणि मागस बुद्धीसंबंधीं गोष्टी निघाल्या असतांना त्याच्या आईबापांचे चेहरे थोडेसे उतरलेले दिसल्यावांचून राहिले नाहींत. मुलाचें वय पाहिलें तर चांगलें बारा वर्षांचें असेल; पण पांच वर्षांच्या मुलाची अक्कलसुद्धां त्याला नव्हती. त्याचं तें लहानपणचं लाडं लाडं बोलणं, किंचाळा आवाज, आईच्या पदरापदराशीं असणं, तोंड उघडं ठेवून व हातपाय वेळवीत चालणं, अगदीं साध्या साध्या गोष्टींना हसणं वगैरे अगदीं लहानपणींच शोभून दिसणाऱ्या गोष्टी येवढ्या मोठ्या वयांतहि शिल्लक राहिल्या होत्या. आतां याच्या शिक्षणाचं करायचं काय अशी चिंता त्या पतिपत्नीला सारखी लागलेली असे. मी शिक्षणासंबंधीं थोडंबहुत वाचतों बिचतों, म्हणून माझ्याशीं

तीं दोघं नेहमीं यासंबंधीं बोलत असत. पण माझं वाचन किती झालं तरी तुटपुंजं असून प्रत्यक्ष शिकवण्याचा अनुभव तर बिलकुल नसल्यामुळें विनायक-रावांनीं साहजिकपणेंच तो विषय मिस् अघारकरांपुढें काढला. त्या म्हणजे त्यांतल्या मोठ्या व्यासंगी अन् दर्दी होत्या, अन् त्यांना म्हणजे एकादा उपाय ताबडतोब सांगतां आला असता असें नाहीं. पण आपलं दुखणं सगळ्यांच्या-पुढं मांडीत असावं, धन्वंतरी कोणाच्या रूपानं अवतरेल, अन् कोणाच्या मुखानं उपाय वदवील याचा कांहीं नेम नाहीं असं अधु जीवाला वाटत असतं झालं.

मिस् अघारकरांचें वाचन फार; पण तें त्यांना अद्याप व्यवस्थित रीतीनें जिरलें-पचलें नसल्यामुळें, व आहे त्यापेक्षां जास्त देखावा करण्याचा सामान्य स्त्रियांतील मोह त्यांनाहि मधून मधून न कळत होत असल्यामुळें बन्याच्या या एकाच प्रश्नाच्या निमित्तानें त्यांनीं कितीतरी अवांतर गोष्टी तेवढ्यांतल्या तेवढ्यांत सांगून टाकल्या! डॉक्टर मॉंटेसरीची पद्धति, माणसाचें वार्षिक वय व मान-सिक वय, बुद्धीनें आगसलेलीं मुलें अन् मागासलेलीं मुलें, बौद्धिक चांचण्या, सामुदायिक कसोट्या वगैरे कितीतरी लागू गैरलागू गोष्टी त्यांच्या सांगण्यांत येऊन गेल्या. अर्थात् 'एक धड ना भाराभर' असा प्रकार होऊन कोणाच्याच पदरांत फारसं कांहीं पडलं नाहीं. आतांचें संभाषण विशेषतः बन्यावरून निघालेलें असल्यामुळें विनायकराव व लक्ष्मीबाई यांना त्यांत विशेष जिव्हाळा वाटून संभाषणांतील बराचसा भाग त्यांनींच उचलला होता.

पहिल्यांदाच, डॉक्टर मॉंटेसरीचें नांव निघाल्याबरोबर 'त्या डॉक्टरांना तरी बन्याला दाखवावें' असें लक्ष्मीबाई अजाणपणें म्हणून गेल्या! उडालेला हशा जरा कमी झाल्यावर मिस् अघारकरांनीं डॉ. मॉंटेसरीबद्दल व त्यांच्या शिक्षण-पद्धतीबद्दल बरीचशी माहिती सांगितली. मॉंटेसरीबाईनीं प्रथम शाळा काढली ती आया कामावर गेल्या असतांना घरीं एकट्या राहिलेल्या मुलांना उपयुक्त कामांत गुंतवून ठेवण्याकरितां म्हणून कशी काढली, मग त्यांनीं मागासलेल्या मुलांना निरनिराळ्या उपकरणांच्या व साधनांच्या साह्यानें व विशेषतः त्यांच्या स्पर्शेंद्रियांचा उपयोग करून घेऊन नेहमींच्या मुलांच्या बरोबरीला कसें आणलें, आणि शेवटीं जी पद्धति त्यांनीं मागासलेल्या मुलांकरितां उपयोगांत आणली तीच सामान्य मुलांना लागू करून त्यांना अगदीं वरच्या दर्जाला अवश्य

नेतां येईल असें कसें सिद्ध केलें हें सर्व मिस् अघारकरांनीं समजावून सांगितलें.

वार्षिक वय व मानसिक वय यासंबंधीं त्या सांगत असतांना बरीच मजा उडाली. उदाहरण देण्याच्या हेतूनें त्या म्हणाल्या "आमच्या मधुसूदनाचें वय चोवीस आहे, पण त्याची आकालनशक्ति, ग्रहणशक्ति, विचारशक्ति वगैरे कदाचित् १२-१३ वर्षांच्या मुलांइतपतच असूं शकतील. म्हणजे तो वयानें जरी २४ वर्षांचा असला तरी बुद्धीनें अवघा १२ वर्षांचाच आहे असं म्हणायचं."

"आणि याच्या उलट आमची ताई साठ वर्षांची बुद्धी आहे असेंहि ठरायचें!"

बहिणीनें केलेली आपल्याबद्दलची चेष्टा—आणि तीहि इंदु व तिची आई यांच्या देखत केलेली!—मधुसूदनरावांना न खपून त्यांनीं वरील प्रकारचा टोमणा बहिणीला दिला.

नेहमीं शांत व सभ्य दिसणाऱ्या मधुसूदनरावांनीं सदभिरुचीला सोडून दिलेलें हें प्रत्युत्तर ऐकून इंदूला कसेंसेंच वाटलें. हमरीतुमरीवर आलेल्या गोष्टी कांहींतरी विनोद करून जरा निवळविण्याच्या उद्देशानें मी एकदम म्हणालों, "अरेच्या! हें जाणूनच बायकांना लोकांनीं आपलं वय विचारलेलं आवडत नाहीं, बरं का. किंवा विचारलंच तर त्या कमी सांगतात. परवांच टाइम्समध्यें एक गोष्ट आली होती. एक बाई साक्ष देत असतांना तिला न्यायाधिशानें तिचें वय विचारलें. तेव्हां ती म्हणाली, '१९ वर्षें अन् कांहीं महिने.' न्यायाधिशाला तिचें म्हणणें धडधडीत खोटें वाटून त्यानें तिला पुन्हा दरडावून विचारलें. 'तुम्हीं शपथ घेतली आहे, लक्षांत आहे ना? १९ वर्षें अन् वर किती महिने?' तेव्हां ती बिचारी घाबरून म्हणाली, '१२० महिने'!"

या गोष्टीमुळें सर्व वातावरण पुन्हा खेळीमेळीचें होऊन मिस् अघारकरांनाहि विनोद सुचूं लागला. सामुदायिक कसोट्यांसंबंधीं सांगतांना Collective Tests शब्दांचें भाषांतर एकानें 'गट-कसोट्या' असें कसें केलें, आणि तें भाषांतर कानाला वाईट लागून दुसऱ्या एका विनोदी माणसानें त्याचा उच्चार 'गटक-सोट्या' असा वर्णविपर्यासात्मक करून मंडळींना कसें हसविलें; तसेंच एका प्रोफेसरानें 'मास-सायकॉलजी' या

इंग्रजी शब्दांचें भाषान्तर 'झुंडीचें मानसशास्त्र' असें कसें केलें, आणि कितीतरी दिवस 'झुंडी' ही 'झंडु फार्मसीं'तल्या 'झंडू'सारखीच कोणीतरी व्यक्ति असावी असें विद्यार्थ्यांना कसें वाटत होतें वगैरे बऱ्याच गोष्टी त्यांनीं सांगितल्या.

गरम झालेलें वातावरण थंड झाल्याबरोबर मंडळींना उशीर झाल्याची जाणीव होऊन घरीं जाण्याची गोष्ट निघाली. त्याबरोबर विनायकरावांनीं आपल्या नेहमींच्या शिरस्त्याप्रमाणें नवीन विडी काढून शिलगावली. अर्थातच ती जळून खाक होईतों इतरांना बसावेंच लागलें. 'बऱ्याच्या बाबतींत सध्यां कोणालाच कांहीं करतां येत नाहीं, आतां ऐकलेल्या गोष्टी अद्याप प्रयोगावस्थेंतच आहेत, आणि त्यांपैकीं कांहीं सिद्ध झालेल्या असल्या तरी त्या आपल्या सामान्य माणसांच्या आवांक्यांतल्या नाहींत या निराशात्मक विचाराची छाया त्या पतिपत्नींच्या चेहऱ्यांवर सारखी दिसून येत होती; आणि आम्ही त्यांचे ऋणानुबंधी म्हणून आमच्यावरहि तिचा थोडाफार परिणाम झाल्यावांचून राहिला नाहीं. म्हणून दुसऱ्या दिवशीं पर्वतेश्वराला जाण्याबद्दल मधुसूदनरावांशिवाय दुसऱ्या कोणालाच फारसा हुरूप नव्हता. त्यांनीं मात्र असल्या सहलींचे होते नव्हते तेवढे फायदे सांगून बहिणीचें मन वळविण्याचा प्रयत्न केला, पण त्याचा फारसा उपयोग झाला नाहीं. आणि एकदां मिस् अधारकरांचे मनानें जायचें नाहीं असें घेतल्याबरोबर त्यांना मुंबईच्या जरूरीच्या कामांची आठवणहि भराभर होऊं लागली ! अर्थातच पाहुणे मंडळी व त्यांबरोबर इंदूहि दुसऱ्या दिवशींच जाण्याचें ठरलें.

सौभाग्यवतीचा सबंध दिवस इंदूची दुसऱ्या दिवशीची बांधाबांध करण्यांत गेला. रात्रींहि बऱ्याच उशिरापर्यंत ती निजली नाहीं. पण मीच तिला बळेनें निजवून आनंदानें झोपीं गेलों. रात्रीं कांहींतरी एक दीडचा सुमार असावा. सौभाग्यवती एकदम झोंपेंत मोठमोठ्यांदा रडूं—ओरडूं लागली. आम्हीं सर्वांनीं तिला जागें करून भानावर आणली. तासाभरांत पुन्हा सर्व स्थिरस्थावर होऊन व सगळ्या गोष्टी हसण्यावारी घालवून बाकीची मंडळी पुन्हा आपआपल्या जागीं जाऊन निजली. सौभाग्यवती मात्र अत्यंत अस्वस्थ व बेचैन होती. तिला कसली तरी हुरहुर लागली होती.

“ काय—झालं तरी काय ? भ्यायलीस का ! कांहीं फिटीबिटीचं तर लक्षण

नाहीं ना?" वगैरे किती तरी वेळां मीं परोपरीनें विचारलें. शेवटीं बऱ्याच वेळानें 'आतां सगळींजणं गाढ झोंपली' अशी मनाची खात्री करून घऊन ती माझ्या खोलींत आली, व भेदरलेलें लहान मूल आपल्या आईला अगदीं बिलगून बसतें तसें बसून ती मला चोरट्या आवाजांत सांगूं लागली:—

"मला कनी, मघाशीं एक अभद्र स्वप्न पडलं. इंदु शेवटच्या परीक्षेंत पास होऊन पुण्याच्या मेडिकल स्कूलमध्यें गेली आहे. मधुसूदनरावहि एमे पास झाले असून आणखी पुढचा कसलातरी अभ्यास करण्याकरितां पुण्यासच राहिले आहेत. मिस् अघारकर कोठेंश्या परदेशीं गेल्या आहेत. इंदु अन् मधुसूदनराव यांची मैत्री बरीच जडून ते तिची सर्व काळजी वाहताहेत,–"

"अरे वा: ! उत्तम झालं कीं! आपल्याला तरी आणखी काय पाहिजे? मग त्यांत भेदरण्यासारखं अन् घाबरण्यासारखं काय आहे? का तें आनंदातिरेकाचेंच रडूं होतें?" सौभाग्यवतीला मध्येंच थोपवून मीं विचारलें.

रडण्याची आठवण करून दिल्याबरोबर तिला पुन्हा भरतं आलं. आणि ती माझ्या खांद्यावर मान टाकून स्फुंदून स्फुंदून रडूं लागली. मी समजावणी अन् आर्जव करतों आहें, ती तशीच रडते आहे, अश्या स्थितींत कितीतरी काळ गेला. शेवटीं एकदांची रडं थांबवून ती आपलं स्वप्न पुढें सांगूं लागली:–

"एक दिवस इंदु आणि मधुसूदनराव बोटिंग् करण्याकरितां म्हणून संगमावर गेलीं. नाव चांगली संथ चालली होती; पण इतक्यांत काय झालं कोणास ठाऊक, ती नाव उलटली, आणि इंदु पाण्यांत पडली! तिला सावरतां सावरतां मधुसूदनरावहि पाण्यांत पडले; आणि इंदूनें त्यांच्या गळ्याला मिठी मारल्यामुळें म्हणा, किंवा आणखी कशानें म्हणा, ते तिला वर काढण्याऐवजीं तीं दोघेंहि तशींच गटांगळ्या खात राहिलीं! तुम्हांला हाक मारणार तों तुमचा तरी पत्ता कोठें होता!" इतकें सांगून ती पुन्हा ऊर भरून आल्यामुळें धापा टाकूं लागली!

"स्वप्न भयंकर तर खरंच! पण तें बोलूनचालून स्वप्नच! त्याचं तें काय इतकं मनावर घ्यायचं आहे? काल सबंध दिवस मनानें मुलीच्या लग्नाचीं मनोराज्यें रंगवीत बसली असशील, नाहींतर पोरीचं पुढं सगळं सुरळीत तर चालेल ना असली भित्री शंका मनांत घोळत राहिली असेल. अन् यांतलं कांहींच नसलं तर रात्रीचीं भजीं जास्त होऊन अजीर्ण झालं असेल. याशिवाय

असलं स्वप्न पडायचं दुसरं कांहीं कारण संभवत नाहीं." असं बरचसं सांगत व एकीकडे तिला हातानें थोपटीत मीं तिचें कसेंतरी तेवढ्यापुरतें समाधान केलें. झालं. ती रात्र तशीच गेली. पहांटे पहांटे इंदु माझ्या कुशींत येऊन निजली. पुढची सकाळ राहिलेली बांधाबांधी करण्यांत व जेवणाखाण्यांत गेली. पाहुण्यांची निघण्याची वेळ आली. दाराशीं गाडी आली. मुलीनें सजल नेत्रांनीं आईकडे पाहिलें. मीं हसण्याचा प्रयत्न केला पण--पण आतां पुरेंच.

.इतका वेळ सांगत असलेल्या खऱ्या गोष्टीचं स्वप्नांत रूपांतर होऊं लागलं आहे. तेव्हां मी तरी आतां कशाला झाल्यागेल्या गोष्टी मुद्दामच आठ-आठवून लिहीत बसूं? मीहि भविष्याकडेच पाहत बसतों! पण पडलेलं स्वप्न हें स्वप्नच ठरणार ना? का--!!!

---